गुणलुब्धाः स्वमयेव संपदः।

# महाराष्ट्र-कुटुंब-माला

## पुष्प ११ वें

# ऋणानुबंध



लेखक

श्रीयुत बाळकृष्ण नारायण पांडे.

( मातृपदीं, वरपाहिजे, या नाटकांचे कर्ते )

---

फेब्रुवारी १९२८

---

किंमत एक रुपया

संपादक—नारायण विनायक कुलकर्णी
प्रकाशक—विठ्ठल रामचंद्र खाडिलकर,
मालक, श्री दत्त एजन्सी, ३९१ नारायण पेठ, पुणें शहर

# महाराष्ट्र-कुटुंब-माला

तिसऱ्या वर्षाचें
चौथें पुष्प
मे १९२८ मध्यें
प्रसिद्ध होईल

CHECKED 1956
Checked 1963

मुद्रक—गणेश काशिनाथ गोखले,
सेक्रेटरी, श्री गणेश प्रिंटिंग वर्क्स,
४९५-९६ शनवार, पुणें शहर.



॥ श्रीरामसमर्थ ॥

# अर्पणपत्रिका

प्रियमित्र--

विनायक अनंत देवधर, हरकुंवर बाईची चाळ,
मुंबई.

दादा यांसी--

योगायोगानें गांठी पडल्यावर सहो-
दरत्वाच्यापेक्षांही जास्त वात्सल्यभावानें
मला आजन्म ऋणी केल्याचें स्मरण
म्हणून हा लहानसा ग्रंथ
तुला कृतज्ञतापूर्वक
अर्पण करीत
आहें.

बाबा पांडे

# प्रिय वाचकांस—



ऋणानुबंधाच्या धाग्यांची गुंतागुंत हा ईश्वराचा प्रत्यक्ष खेळ आहे. त्याला उकलायला जाणें कठीण खरें व माझ्यासारख्याला तें जडच वाटतें, तथापि मनोविनोदार्थ त्याची थोडीशी ओळख या लहानशा कथेच्या रूपानें करून घेण्याचा मी प्रयत्न केला आहे.

मी अजूनपर्यंत नाट्यविषयाच्या खालच्या कक्षेतील विद्यार्थी आहें. त्या बाजूनें मी कांहीं थोडाबहुत प्रयत्न केला असला तरी कादंबरीच्या प्रांतांत प्रवेश करण्याच्या धाडसाची मला त्याहूनही भीति वाटते. महाराष्ट्र-कुटुंब-मालेचे संपादक, रा. नारायणराव कुळकर्णी यांनीं धीर दिला नसता तर कदाचित हें काम मीं आजच हातीं घेतलें नसतें. कसेंही असो, धीर केला आहे, व हा प्रयत्न भक्तिपूर्वक प्रिय वाचकांपुढें नम्रपणें ठेवीत आहें.

सर्वांचे शुभमस्तु.

बऱ्हाणपूर
४-१-१९२७ इ.

वा. ना. पांडे



# ऋणानुबंधासंबंधीं—



ऋणानुबंध जोडून जमत नाहीं, तोडून तुटत नाहीं. ऋणानुबंध ही दैवी देणगी आहे आणि ही देणगी भाग्यानेंच द्यावी घ्यावी लागते. अशा तऱ्हेचा दृढ आणि दृढतर ऋणानुबंध महाराष्ट्र–कुटुंब–माला आणि तिचा प्रिय आश्रयदातावर्ग यांच्यामध्यें नित्यशः वाढत्या प्रमाणांत होत आहे. मालेच्या स्थैर्यासंबंधीं विश्वास, तिच्या कार्यासंबंधानें प्रेम, आणि तिच्या योगक्षेमाबद्दल एकप्रकारची अनाहूत आस्था, हीं सर्व जनतेमध्यें उत्पन्न झाल्याचा दाखला पटून मालेला आपल्या ऋणानुबंधीयासंबंधीं सादर अभिमान वाटत आहे आणि हा अभिमान व्यक्त करण्याची वेळ मालेची सदरहु " ऋणानुबंध " या नांवाची कादंबरी प्रसिद्ध होत असतांनाच आली आहे, ही विशेष लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट आहे.

" ऋणानुबंध " कादंबरी बऱ्हाणपूरचे श्री. बा. ना. पांडे यांनीं माले-करितां मुद्दाम लिहिली आहे. मालेचें ध्येय या कादंबरींत पुष्कळ अंशानें प्रतिबिंबित झाल्याचें दिसून येईल. तिसऱ्या वर्षाच्या आरंभीं ज्या ज्या साहित्य भक्तांची यादी दिली आहे, त्यांत श्री. बा. ना. पांडे आहेतच. त्या यादींतील दोन साहित्यभक्तांचीं पुस्तकें आलीं म्हणावयाचीं. मालेकरितां मुद्दाम पुस्तकें लिहावयाचीं असल्यामुळें व जसजशी सूचना होत जाईल तसतशी लेखनाची सुरुवात होत असल्यामुळें पुस्तक लिहून हातीं येण्यास थोडा फार उशीर होतोच होतो, असा अनुभव येत आहे. पण त्याला इलाजच नाहीं. पुस्तक मनासारखें व्हावयाचें तर माला लेखकाला घाई करूं शकत नाहीं, तशी आश्रयदात्याकडे उशीराबद्दल ' क्षमस्व ' म्हणण्यास चुकारपणा करीत नाहीं. ऋणानुबंध दृढतर आणि दृढतम करावयाचा तर असेंच करावें लागणार. ही गोष्ट आश्रयदात्यांनीं ध्यानीं धरून मालेवरील लोभ वृद्धिंगत केला म्हणजे ऋणानु-बंध सक्रीय झाला असें खास होईल.

माला नुकतीच एका प्राणघातक गंडांतरांतून सहीसलामत सुखरूप निघून ऋणानुबंधीयासंबंधीं अधिक कांहीं करावें या विचारास लागण्याचें वेळींच श्री. बा. ना. पांडे यांनीं 'ऋणानुबंध' ही मनासारखी कादंबरी लिहून मालेला ऋणाईत केलें आहे हें ऋण तसेंच वागविण्यांत माला भूषण मानीत आहे आणि उतराई होण्याच्या विवंचनेंत माला आहे असें ऐकण्यापेक्षां प्रथम मालेनें म्हटलें तें ऐकण्यांत श्री. बा. ना. पांडे यांना 'ऋणानुबंधा' संबंधानें अधिक आपलेपणा वाटणार, ही खात्री आहे. आणि म्हणूनच केवळ वरील बाबीचा उल्लेख येथेंच करावा लागला आहे. हा 'ऋणानुबंध' श्री. बा. ना. पांडे यांना, मालेला, आणि प्रिय आश्रयदात्यांना सारखाच सुखकर होवो. अशी श्री गुरुचरणीं नित्य प्रार्थना करितों.

सर्वांचा नम्र

**विठ्ठल रामचंद्र खाडिलकर**

महाराष्ट्र-कुटुंब-माला,
३९१ नारायण पुणें शहर.
ता. १०-३-२८.



बा. ना. पांडे, " ऋणानुबंध " चे लेखक.

# ऋणानुबंध



## प्रकरण १ लें

पावनपूर म्हणजे एक साधारण मोठ्यांतलें मोठें खेडें होतें. एका काळीं त्या गावाला अत्यंत महत्त्व होतें. नागपूरच्या भोसल्यांच्या ताब्यांतील सरहद्दीतील तें गाव असल्यामुळें, त्या ठिकाणीं भोसल्यांचे कांहीं सरंजामी अधिकारी असत. गावाला लागूनच वरदा नांवाची नदी वहात असून पलीकडे निजामाची सत्ता होती. या ठिकाणीं वरदेचें पात्र चांगलें मोठें असून, पलीकडच्या बाजूला एक विशाळ वालुकामय मैदान होतें. त्या पलीकडे काठाशेजारींच रणक्षेत्राप्रमाणें एक लांबचलाब जमिनीचा पट्टा असून त्यावर हल्ली मोठें बाभुळबन वाढलेलें दृष्टीला पडतें. नदीचे उतार संरक्षकांच्या माऱ्याच्या टप्प्यात येण्याकरितां तीन उंचवट्यावर संरक्षक-सेनेची टाणीं ठेविलेली होती. गावाच्या एका बाजूला मोठ्या उंचवट्याच्या ठिकाणीं एक लहानसा किल्ला होता. मध्यवर्ती टेकडीवर श्रीमहारुद्रेश्वराचें हेमाडपंती प्रचंड दगडी देवालय असून बाजूच्या टेकडीवर निरीक्षक सेनेची एक तुकडी रहात असे. आजला किल्ल्याचा अधोभाग जरी पूर्वीप्रमाणेंच वरदेच्या पाण्यांत आपले पाय धुवीत असला तरी वरचा सर्व भाग नामशेष झालेला असून, राणोजी पाटलांच्या पणजोबांनीं किल्ल्याच्या अवशेषाला जमेस धरून एक लहानशी मृत्तिकेची गढी बांधून त्याचें किल्ल्याचें स्वरूप कसेंबसें कायम ठेविलें होतें. गढीच्या आंत किल्लेदारांचा दोन मजली वाडा, किल्ला लढवीत असतांना कामास आलेल्या पाटलांच्या प्रतापी पूर्वजाच्या समाधीवर बांधलेलें लहानसेंच पण सुंदर शिवमंदीर, घोड्याच्या पागा, कचेरी व पाहुण्यांना उतरण्याचा बंगला वगैरे इमारती होत्या. आजला ह्या सर्व इमारती बऱ्याच जुन्या व कांहीं ठिकाणीं मोडकळीस आलेल्या दिसत होत्या. गढीच्या प्रवेशद्वारांत अर्ध्या दगडाच्या व अर्ध्या मातीच्या

कमानींत एक लहानशी बैठक काढली होती. तेथ एका जाजमावर लोडाशी टेकून, पाटलांचे थोरले चिरंजीव उदेभान पाटील बसले होते. दुसऱ्या एका लोडाशी एक वृद्ध गृहस्थ हुक्का पीत त्यांच्याशी बोलत बसले होत. सदरहु वृद्ध गृहस्थाचे नांव हरीहरपंत देशपांडे. हरीहरपंत ऊर्फ नानासाहेब हे जरी साठीच्या पलीकडे गेले होते तरी त्याना व्यायामाची आवड असल्यामुळे त्यांची देहयष्टी अजूनही पिळदार व कणखर होती. रुंद चौकोनी चेहरा, भव्य कपाळ, टप्पोरे डोळे, झुपकेदार भिंवया व भरदार गुलमिशा यांनी त्यांचा आविर्भाव मोठा रुबाबदार दिसत असे. पाटलांचा आणि त्याचा पूर्वापार घरोबा होता.

महाराष्ट्रांतील खेड्यातून ऐक्याचे, परस्पर प्रेमाचे व सौजन्याचे एक विवक्षित स्वरूप अजूनहि दृष्टीस पडते. जाति अगर वर्णविशेषाचा विचार न करिता सर्व लोक निरंतर एकोपा व प्रेमसाहचर्य राखण्याचा कसा प्रयत्न करीत असत, याचा शोध करायला गेले तर प्रामुख्याने एक गोष्ट नजरेला येते ती ही की, जातिविशेष न मानता लोक एकमेकाशी विवक्षित नाती जोडीत असत. व ती नाती पिढ्यानुपिढ्या अगदी जवळच्या नात्यातल्या माणसांप्रमाणें अत्यंत प्रेमानें पाळिली जात असत. परंपरेने राणोजी रायांच्या पत्नी कमळजाबाईशी नानासाहेबाचे बहिणीचें नातें होत व प्रतिवर्षी सणावारी त्या जीवंत होत्या तोवर त्याचे नानासाहेबांच्या कडील जेवणखाण, खणनारळ, भाऊबिजची ओवाळणी वगैरे भावबंधनाचे शिष्टाचार पाळले जात असत. नानासाहेब आणि पाटीलबोवा एके ठिकाणी बसले म्हणजे या मेहुण्यांच्या थट्टामस्करीला हास्याच्या मोठाल्या उकळ्या येईतोवर ऊत येत असे व त्यातून निघणाऱ्या गमतीच्या आरोपाचे निरसन कमळजाबाई किंवा नानासाहेबाचे कुटुंब याच्याकडून एखाद्या गमतीच्या वाक्यानें किंवा पेलाभर दुधानें होत असे. खेडेगांवांतील नात्यांचें हे गुंडाळे इतक्या मनोहर रीतीनें साधलेले असे की त्याच्या निर्माणकर्त्याबद्दल सकौतुक आदर उत्पन्न झाल्यावाचून रहात नाही. श्री महारुद्रेश्वराच्या वार्षिक उत्सवात मंदिराच्या पटांगणांत गावांतील लहानथोर मंडळी भक्तिपूर्वक भाग घेत व " पार्वतीपते हरहर महादेव " या गर्जनेंत जेव्हां सर्वांच्या एकसमयावत्सल पंक्ती उठत त्यावेळी प्रत्यक्ष श्रीमहारुद्रे-

-खरच ह्या सर्वांच्या निरंतर वात्सल्य-गांठी बांधताहेत किंवा काय असा पहाणाराच्या मनांत साभिमान विचार येई व " देवा ! हे तुझे तूं असेंच निरंतर चालीव " अशी करुणा अंतःकरणांतून भाकली जात आहे हे दर्शविण्याकरितांच की काय एकदम बघणाराचे दोन्ही हात सगद्गद वृत्तीनें परमेश्वराकडे जोडले जात. अस्तु !

" उदेभान " ! नानासाहेबांनी हुक्याचे तीन चार झुरके घेऊन हळूच हांक मारल्यासारखे केलें.

" मामा —" एवढेच शब्द उदेभानरावानीं उच्चारिले व त्याच्या डोळ्यातून झरझर अश्रुप्रवाह सुरू झाला. नेसलेल्या नागपुरी रुंद काठाच्या धोतराच्या पदरानें ते अश्रु पुसूं लागले. उदेभानराव तीस बत्तीस वर्षांच्या वयाचे होते. घरंदाज मराठा कुळांतील तरुणाला साजेल असाच त्यांचा चेहरा व अंगलट होती. राणोजीरावाच्या शिस्तीखालीं वागणें मोठें कठीण काम होतें. त्या करड्या तालमीत वाढल्यामुळें त्याच्या ठिकाणीं एक प्रकारचा मानसिक जोरकसपणा आला असला तरी या प्रसंगीं त्यांचा अश्रुप्रवाह त्याना थांबविता येईना. नानासाहेबांनी हुक्का बाजूला सारला व त्याच्या पाठीवरून हात फिरवून त्याना धीर देत म्हटलें— -

" उदेभान, धीर धर. प्रयत्न करून पाहूं. काय करूं रे! तेवढे तात्यासाहेब देशमुख जर आपल्या बाजूला येतील तर त्या पाजी माणसाला गप्प बसायला लावायला कितीसा उशीर लागेल ? पण आजकाळ दुर्दैव हे असं पाठीला लागलं आहे. गावातील ती पूर्वीची ऐक्याची भावना जवळ जवळ नाहींशी झाल्यामुळें चार दिवसापूर्वी आलेल्या या चोराना चागलंच फावलं आणि तुमच्या आमच्यासारख्या घरंदाजाची ही दुर्दशा झाली ! "

यावेळीं नानासाहेबांचा चेहरा बराच क्रोधयुक्त झाला होता. थोरल्या पाटलांचा काळ होऊन नुकताच एक महिना झाला होता. कांहीं वर्षांपूर्वी पाटलाच्याच देवडीवर प्रवासी म्हणून उतरलेला मोतीचंद आता सावकार झाल्यामुळें त्याच्या लेकरांवर कर्जानिमित्त फिर्याद गुदरण्याचा धाक घालतो हे पाहून नानासाहेबाचे पित्त खवळून गेलें होतें. ते गावातील भागीदार मालक जरी होते तरी पैशाच्या दृष्टीनें त्यांची ही स्थिति समाधानकारक नव्हती. तेही कालानुरोधानें मोतीचंदाचे रिणको होते. गावचा पाटलाचा

मालकीभाग मोतीचंदाच्या उदरात नुकताच गडप झाला होता. तात्यासाहेब देशमुख हे गावातील तिसरे मालक भागीदार होते. एरवीं सज्जन मनुष्य, आल्यागेल्यांचा, गरिबाचा, परामर्ष घेणारा दिलदार माणूस पण कांहीं क्षुल्लक कारणामुळें नानासाहेबांशीं तेढ उत्पन्न झाल्यामुळें त्याचा मलोखा नव्हता. देशमुख आणि पाटील यांचाही संबंध फार घरोब्याचा. पण पाटलाचा ओढा नानासाहेबांच्याकडेच जास्त आहे, अशी समजूत करून घेऊन तात्यासाहेब तिकडेही फार फिरकेनासे झालें होते. राणोजीरावाच्या आजारांत तात्यासाहेबांनीं अगदीं घरच्यासारखी खटपट करून नानासाहेबाना साथ दिली होती. पाटलाचा मृत्यु दोघांनाही सारखाच जाणवला होता, पण कां न कळे थोड्याच दिवसात देशमुख पाटलाच्याकडे येईनासे झाले होते. सायंकाळीं गावच्या नियमाप्रमाणें देवालयात बहुधा सर्वांच्या गाठी पडत, पण " काय उदेभान, उरकलं पाटलाचं उत्तरकार्य ! आता सगळा भार तुझ्यावरच पडला आहे, आहे तुला सूर्यभान मदतीला, वडिलाचं नाव राखून काम कर..." इत्यादि सामोपचाराचीं वाक्येच त्यांच्या तोंडून निघत. "देवाच्या दयेनं व आपल्या आशीर्वादानं सर्व कांहीं यथास्थित होईल." असे नम्रपणानं उदेभानरावाकडून त्याना उत्तर मिळे. उलट देवळांत देशमुख दिसले तर देशपांडे जर मारुतीला प्रदक्षिणा घालीत असतील तर दुसरं अकराचं आवर्तन पूर्ण करून त्याना टाळीत असत. आणि कदाचित् गाभाऱ्यात दोघांची गाठ पडलीच तर कोणी तरी एक जण देवाजवळ जठा मारून डोळे मिटून एक सबंध महिन्याचें आवर्तन उरकून घेई. गावातल्या पुढाऱ्याची आज ही अशी स्थिति होती व खरं पुढारीपण हल्लीं मोतीचंदाकडे असे. जवळजवळ अर्धा अधिक गाव त्याचा रिणको होता. बडी मंडळी तर जवळजवळ आशीर्ष त्याच्या ऋणांत बुडालेली होती. मोतीचंदाची वागणुकही त्यामुळे बरीच आढ्यताखोर झाली होती. केव्हां तरी सर्व गावचा मालक मीच होईन ही त्याची कल्पना खरी होणं दुरापास्त नव्हतं. वाढत्या नापिकीनं व कर्जेदलालीनं जमीनदारांचीं घराणीं कर्जफेड करण्यास असमर्थ झालीं होतीं व त्यांच्या खानदानी खर्चास लागणारी जबर रक्कम शेटजी खुशाल देत होते. बरीच गरीब कुलें अन्नान होऊन मजुरीनिमित्त गांव सोडून गेलीं होतीं. व शिल्लक

राहिलेलीं कशी तरी जीव संभाळून होतीं. गावचा पूर्वीचा मुंभ जळाला होता तरी त्याचा पीळ अजून कायम होता. कोरड्या हक्काकरितां व वास्तविक अविरोधी गोष्टींवर रणें माजून जमीनदारांत व त्यांच्या पक्षांतील इतरेजनात विनाकारण तेढ माजून राहिली होती.

" तात्याचा आणि माझा केवढा स्नेह. पण आम्हां दोघांत वितुष्ट आणावयाला हा मोतीचंदच कारण आहे. तात्या फार भोळा माणूस आहे. त्याला हा कर्जावर कर्ज देत असल्यामुळे व वेळप्रसंगी त्याची हांजी हांजी करीत असल्यामुळे, तात्याची त्याच्यावर बहाल मर्जी आहे. पण हा एखादे वेळीं त्याच्या टाळूवरून हात फिरवून त्याच्या मुलाबाळांना नुकमानीत आणील याची मला मोठी काळजी वाटते." नानासाहेब डोक्यावरील दुधीया रंगाची होडीवजा टोपी खालीं काढून ठेवीत म्हणाले.

" आमचीच स्थिति बघाना. आणि देवालाही आमची कांहीं करुणा येत नाहीं. सारखी सालांवर सालें नापिकीची जात आहेत. यंदा बैल तर अगदीं काम देण्यालायक राहिले नाहीत. आखाडात त्यांच्या कंबरा बसणा-रच. तेव्हां नवीन बैल घ्यायचे आणि हंगामापर्यंत घरीं बियाणें व शेतीची उस्तवारी कशाच्या भरंवशावर करायची हा मोठा प्रश्न येऊन पडला आहे मामा ! त्यांतून ह्या शेटचें देणें !—"

" बाळ ! मोठा शिवभक्त म्हणून तुझ्या बापाची कीर्ति होती. तूंही त्याचा सुपुत्र आहेस ! ईश्वरावर विश्वास ठेव, एवढंच मी तुला या वेळीं सांगतों. आलेली वेळ कशी तरी निघून जाईल. दुर्दैवानें माझी परिस्थिति तुला ठाऊक आहे. तरी पण कांहीं तरी खटपट केल्याशिवाय मी राहणार नाहीं. प्रथम या मोतीचंदाच्या निकडीच्या मागणीचा विचार करणें प्राप्त आहे. बरें येतों आतां मी " पुन्हा एकदा उदेभानरावाच्या पाठीवरून प्रेमानें हात फिरवून त्याना धीर देऊन नानासाहेब गढीच्या बाहेर पडले. उदेभानराव दारातच नदीकडे पहात उभे राहिले.

---

# प्रकरण २ रें



सूर्य अस्तास जात होता. नदीच्या पलीकडील बाभळबनांतील झाडाच्या शेंड्यावर मावळत्या सूर्याचे कोवळे किरण पडल्यामुळें जरतारी मंदील बांधून भिल्लाची पलटण त्या ठिकाणीं उभी आहे की काय असा भास होत होता. नदीच्या धारेवर सूर्याचे किरण तरळत होते. पलीकडील वाळवंटात गावातील तरुणाचा आट्यापाट्याचा खेळ जोरात आला होता व त्याचा ध्वनि लांबवर ऐकूं येत होता. गढीतील समाधिमंदिरावरील सोन्याचा कळस सूर्यप्रकाशानें तळपत होता. ज्येष्ठ महिन्याचे ते दिवस व तो प्रदेश प्रखर उष्णतामानाचा असल्यामुळे गांवांतील लोकाच्या झुंडीच्या झुंडी नदीवर स्नानाकरिता लोटत होत्या. कित्येक नदात स्नान करीत होते तर कित्येकाची तयारी होती. गावातील निरनिराळ्या जातीच्या स्त्रिया डोकीवर घागरी येऊन पाणी घेऊन जात होत्या. कित्येकींच्या बरोबर त्याच्या छोट्या मुली होत्या. त्या डोईवर लहानसं भांडं घेऊन त्याला अगदी मोठ्या घागरीप्रमाणे तोलून आपल्या आईच्या डोकीवरील भांड्याचा आविर्भाव आणून हळुहळ चालत होत्या. नियमाप्रमाणे देवदर्शनाची वेळ झाली असं समजून पाटलांनी खुंटीवर ठेवलेली आपली टोपी चढविली आणि ते गढीच्या दाराच्या बाहेर पडले. इतक्यात एक वीस बावीस वर्षाचा तरुण घोडेस्वार पटकन् गढीच्या दारात येऊन उभा राहिला. घोडीच्या टापा ऐकून एक म्हातारा नोकर बाहेर आला व तिला तो तिच्या ठाणावर घेऊन गेला.

" काय, झालं सगळं शेत नागरून ? " उदेभानरावांनी त्या तरुणाला विचारिलं.

" अशक्य आहे. चारबैली नागर जोडला तरी बैलाच्यांनी ओढवेना. बैलाची कंबर बसावयाला आली आहे. मोठ्या शिकस्तीनं निंबाकडचा कोपरा तेवढा पुरा करून घेतला. दादा ! कमीत कमी तरी तीन जोड्या जर मिळाल्या तर यंदा जमीन तयार होऊं शकेल, नाहीतर आपल्या या

बैलाच्याकडून काम रेटणें कठीण आहे. चार थेंब पडले की त्याच्या कंबरा बसल्याच म्हणून समजावं. ”

“ ती लाखी जोडी आणि तो हरण्या आणि जांबा जोडून बघितले होते काय नांगराला ? ”

“ सगळे करून पाहिलें. बैल आतां किती दिवस काम देतील दादा ? लाखी जोडी पाटलांच्या गाडीला आठ वर्षे चालली आणि चार वर्षे हल्लीं शेतांत काम देत आहे. त्यातून हा चाऱ्याचा तुटवडा. जांबा कांहीं बरा आहे, पण हरण्या अगदीं हाळून गेला आहे. कांहीं तरी सोय करावी लागेल लौकर बैलाची, नाहींतर निभाव लागणें अशक्य आहे. ”

उदेभानरावांनीं एक दीर्घ उसासा टाकला. त्यांच्या डोळ्यांत अश्रु येऊन उभे राहिले. “ उद्यां मी चलेन तुझ्याबरोबर शेतावर ” असें बोलून ते गढीची उतरण उतरूं लागले. तरुण आंत शिरला.

हा तरुण उदेभानरावांचा धाकटा भाऊ सूर्यभान होय. मोठा खुबसुरत, सरदारी रुवाबाचा, कसलेल्या शरीराचा आणि मानी मनाचा आमचा हा धाकटा पाटील होता. याला गाडीधमर्नांतील बसणें आवडत नसे. याला लहानपणापासून घोड्यावर बसण्याचा नाद होता. थोरल्या पाटलांच्या वेळीं या घराण्याची स्थिति कांहीं दिवस उत्तम असल्यामुळें त्यांच्या घरीं कमींत कमी दोन तरी घोडे नेहमीं असत. त्यांनीं आपल्या दोघांही मुलांना लहानपणापासून घोड्यावर बसण्यांत पटाईत केलें होतें. पण त्या दोघांमध्यें सूर्यभानाला घोड्यावर बसण्याची विशेष आवड असून तो बहुधा केव्हांही गाडींतून कुठेंही जात नसे. मकरसंक्रांतीच्या वेळीं आसपासच्या गावांतील घोड्यांच्या व बैलांच्या शर्यती पवनपुरास भरत असत त्यावेळीं घोड्यांची शर्यत बहुधा सूर्यभानच जिंकीत असे. केवळ त्याच्याकरितांच पडत्या काळीं सुद्धां पाटलांनीं त्याची आवडती बिजली घोडी पाळून ठेविली होती. सूर्यभानाचा घोडीवर मोठा जीव असे. ते मादवानही फार उमदं होतं. अरबी तऱ्हेचे अणकुचीदार कान, अकडबाज गर्दन, रुंद छाती, लांबट तोंड, टप्पोरे डोळे, विस्तृत नाकपुड्या, सडपातळ शरीर, बदामी वर्ण, कपाळावर जयमंगल, सुंदर लांबट पाय आणि जमिनीवर लोळणारी शेपटी यापैकीं एकेका गोष्टीचें वर्णन करून मागतांना सूर्यभानरावांना ऐकलें

म्हणजे त्यांचा तिच्याबद्दलचा जिव्हाळा चांगला प्रत्ययास येत असे. थोरल्या पाटलांना घोड्यांची फार चांगली परीक्षा होती. आज ८ वर्षे तें जनावर पाटलांच्या घरी होते. इतके चपळ आणि सुंदर जनावर कुठे असणें शक्यच नाही, असें सूर्यभानराव म्हणत. इतका त्यांना त्याच्या घोडीबद्दल लोभ वाटे. आंत गेल्याबरोबर ते प्रथम तबेल्यांत गेले. घोडीच्या मानेवर, पाठीवर, पुठ्यावर प्रेमानें हात फिरविला, तिचें तोंड अगदीं आपल्या गालाला लावून तिला कुरवाळले, आपल्या हातानें तिच्या तोंडांत चारा घातला आणि नोकराला उत्तम मालिश करावयाला सांगून सूर्यभानराव घरांत गेले.

वाड्यांत पागेकडच्या बाजूलाच त्यांची खोली होती. खोली लहानच पण फार नीटनेटकी होती. एका कोपऱ्यांत एक मोठा छप्पर पलंग ठेवला होता. त्याच्या जवळच एक जाजम घालून भिंतीशी एक लहान तक्या ठेविला होता. दुसऱ्या कोपऱ्यांत एक नुसती खुर्ची होती. भिंतीतल्या एका लहानशा आलमारीत कांही थोडी पुस्तकें होती व प्रत्येक खिडकीवर व दरवाज्यावर एक एक तसबीर टांगलेली होती. दरवाज्यांवरील तसबिरी देवांच्या होत्या व खिडकीवरील तसबिरींत फोटो होते. पलंगाजवळच्या खिडकीवरील तसबीर सूर्यभानराव आणि त्यांच्या कुटुंबाची होती. सूर्यभानरावांनी खोलीत आल्याबरोबर आपला पोशाख उतरला व ते जाजमावर अंमळ बसतात तोंच जिन्यात कोणाची पावलें ऐकू आली. सूर्यभानरावाचें लक्ष तिकडे नव्हतें.



# प्रकरण ३ रें



सूर्यभानरावांची पत्नी ताराबाई दुधाचा पेला घेऊन जवळ उभी होती, तरी त्यांचें तिच्याकडे लक्ष नव्हते. ते डोळे मिटून, एक हात मानेच्या पाठीमागे उशाशीं घेऊन वर छताकडे पहात असल्यासारखे बसले होते. त्यांच्या डोळयातून गालावर एक दोन अश्रु ओघळले होते. ताराबाईदेखील तें दृश्य पाहून अगदी श्वास दाबल्यासारखी निस्तब्ध उभी होती. आपल्या पतीला कसलें तरी दुःख होत आहे या विचारांत ती आपल्या हातातील दुधाचा पेलाही विसरण्याच्या बेतांत आली होती. तो पेला कदाचित तिच्या हातांतून खाली पडला देखील असता इतकें तिचें त्यावेळीं चित्त व्यग्र झालेलें दिसत होतें. तिनें एकदोन अस्फुट शब्द तशां-तही उच्चारले न उच्चारले तोंच सूर्यभानरावांनीं डोळे उघडले. ताराबाईनें तावडतोब दुधाचा पेला पुढें केला.

"तूं केव्हां आलीस? मला कळलें देखील नाहीं" सूर्यभानरावांनी पेला हातांत घेत घेत विचारले.

"रोजच्या सरावांतल्या गोष्टी विसरण्यासारखं आज काय झालं आहे तब्येतीला? कांहीं दुखतं बिखतं आहे का कुठं? मामंजींची आठवण का झाली?" तारेनें आपल्या डोळयांना पदर लावला.

"बाबांची आठवण कशी विसरेन! आमच्यावरचं छत्र इतक्या लव-कर जाईल असं आम्हांला कधीं वाटलं नव्हतं! परमेश्वराची मर्जी!"

आता त्यांच्या दोघांच्याही डोळयांतून अश्रूंचे ओघळ वाहूं लागले होते. दुधाचा पेला तसाच होता.

"देवाची इच्छाच तशी होती त्याला कुणाचा उपाय चालणार! तरी त्याची केवढी कृपा की दादासाहेबांसारख्या सज्जन भावाचं छत्र आपल्या-वर त्यानं दिलं आहे! हें मायेचं पांघरूण बहुमोल आहे बरं! उदंड आउक्ष देवो देवी अंबाबाई त्यांना नि आमच्या बाईंना. जसा कांहीं अगदी शंकर–पार्वतीचा जोडा!"

" मग तुला आम्हाला लक्ष्मीनारायणाचा जोडा म्हणून अनुसूया मामी म्हणत असत ती उपमा आज शोभते का आपणाला ? आपल्या आजच्या स्थितीचा विचार केला तर दादाची स्थिति शंकरासारखी कफल्लक झाली आहे खरी. पण आम्ही मात्र नांवाचेच लक्ष्मीनारायण ! ! देवादिकाची लक्षणं मनुष्यांच्या जोडयाना लावण्यांत बरेच वेळा अशी गडबड होते, नाही ? " सूर्यभानराव थोडे हांसत म्हणाले.

" दूध घ्यायचं प्रथम " तारेने पेला पुढें केला. सूर्यभानरावांनी चट-दिशी दूध पिऊन पेला बाजला ठेवला.

" आजची वेळ अवघड असली तरी मामीच्यासारख्या पुण्यवान माउ-लीचा आशीर्वाद कधी तरी फळाला आल्यावाचून राहणार नाही बर ! माझ्यात लक्ष्मीचे गुण नसले तरी इकडनं उद्योग करून नारायण झाल्यावर ती योग्यता माझ्यात सरळच येईल. " तारा उभ्याउभ्याच बोलली.

" या एवढ्याशा जीवात एवढा ज्ञानाचा साठा पाहून आम्हाला तशी आशा करायला निदान हरकत नाही. त्या उद्योगाची दिशा तरी सागा-यची होईल का ? "

" इश्श ! त्यातलं काय कळतं आहे मला ? अण्णा आले होते परवा. बोलत होते ते कायसंस बाईच्याजवळ की उद्योगाने मनुष्य नराचा नारायण होतो. किती तरी उदाहरणं देऊन त्यांनी त्या दिवशी आम्हाला हे समजावून दिलं. " बाबाच्या समाधीकडे बोट दाखवून ते म्हणाले, 'याच्या उद्योगानेच हे वद्य झाले. आपणालाही तसं करता येईल. ' " तारेने मंदिराकडे तोंड करून भक्तिभावाने हात जोडले. सूर्यभानरावाला हसू आलं.

" अण्णालाच खरं म्हटल तर काही उद्योग नाही. एकदा बोलायला लागला म्हणजे मग वाटेल त्याच्यापुढं आपलं ज्ञान पाघळीत असतो. स्थल–काळाचे त्याला भानच रहात नाही. अस्सं ! मी आतां अण्णालाच विचारतो म्हणजे झालं. अण्णा एक अजब वेडा आहे, असं मला वाटतं. करीत आहात यापेक्षा आणखी काय करायला पाहिजे हे नसेल त्यानं सांगितलं ? आपलं नुसतं ब्रह्मज्ञान ओतीत असतो झालं ! त्याच्याकडे जायचंच आहे मला, पण त्यानं परवां दिलेली पुस्तकं राहिली आहेत

वाचावयाची. ती वाचल्यावाचून गेलो तर खरडपट्टी काढायचा चांगली!"

"मलाही त्यानं एक पुस्तक दिलं आहे."

"हं? कोणतं तं?"

"बालरामायण."

"वाचायला येईल का तं पुस्तक? आम्हांला दाखवाल का वाचून?"

"दाखवीन केव्हा तरी. अण्णा दर चवथ्या दिवशी येत असतो शिकवायला. आतां चांगली घडघड वाचंत. मला शनिमहात्म आणि शिवलीलामृतही तो आणून देणार आहे!"

"मोठी शाळाच काढली आहे म्हणायची अण्णानं? ठीक आहे. आता जेव्हा तुमचा वर्ग भरेल तेव्हां मीहि त्यात आपलं नाव दाखल करीन. आमचा अण्णा एक महात्माच आहे."

तबेल्यांत घोडी फुरफुरली! सूर्यभानरावांनी तेथूनच "जीते रहो" म्हटले. दिवे लावण्याची वेळ झाली म्हणून तारा दुधाचा प्याला घेऊन खाली गेली. सूर्यभानरावही उठले व समाधीच्या व गढीच्या आंतच असलेल्या मारुतीच्या दर्शनाला जाण्याकरिता म्हणून विहिरीवर आले. त्यांनी आपले हातपाय धुतले मारुतीला नमस्कार केला व मंदिरांत जाऊन आपल्या पुण्यवान व पराक्रमी पूर्वजांच्या समाधीपुढे साष्टांग नमस्कार घातला.



# प्रकरण ४ थें



ते वद्य पक्षाचे दिवस. अंधार धुक्क पडला होता. उष्मा होतच होता. बाहेर नदीचें पाणी संथपणानें वहात होते. झाडें स्तब्ध होती. वरती आकाशांत तारागण विहार करीत होता. सूर्यभान समाधिमंदिराच्या पायऱ्यांवर तबेल्याकडे तोंड करून विचारमग्न स्थितींत बसला होता. घोडीला खरारा चालू होता. मधून मधून तिचें फुरफुरणें व पाय आपटणें चालू होते. मोतद्दाराच्या चुचकारण्याचा आवाजही येत होता. सूर्यभान सारखी आकाशाकडे टक लावून पहात होता. तारका हांसत होत्या आणि याच्या डोक्यांत विचारांचें काहूर माजलें होतें. देवाच्या सृष्टींत एकीकडे सुख तर दुसरीकडे दुःख, कोणी वैभवात तर कोणी व्यसनात, कोणी हांसत तर कोणी रडत असलेलें जें दिसतें त्याचें मूर्तिमंत दृश्य खालीं करुण खिन्न सूर्यभान आणि वरती आपल्या वैभवानंदांत विहार करणाऱ्या तारकाच्या रूपानें दृग्गोचर होत होतें. किती वेळ तरी तो त्याच स्थितींत बसला होता. त्याला खेरं म्हटलें असतां कोणत्याही गोष्टीची चिंता करण्याची संवय नव्हती. किंबहुना त्याच्या सज्जन वडील बंधूनें तसें कारणच पडूं दिलें नाहीं. पण आजच्या संध्याकाळच्या दोघांच्या संभाषणांत उदेभानरावाच्या चेहऱ्यावरची विषण्णतेची करुण छाया त्याच्या अंतःकरणात पुरी भेदून गेली. आपल्या एकंदर परिस्थितीचा चित्रपट त्याच्या नेत्रासमोर उभा राहिला. तो बेचैन झाला. तारेला जरी त्यानें आपली मनःस्थिति विशेष प्रकारानें दिसूं दिली नाहीं, तरी त्या मुलीच्या अंतःकरणाला त्याची थोडी बहुत जाणीव होऊन तिनेंही थोडासा निराळ्या प्रकारानें त्याला रंजविण्याचा प्रयत्न केला होता. तिच्या जिवाला वाईट वाटूं नये म्हणून त्यानींही थोडेंबहुत हांसण्याचें सोंग आणलें होतें. यावेळीं मंदिराच्या पायऱ्यावरील शांत निवात ठिकाणीं तो बसला होता, व आतां त्याच्या डोक्यांत विचारांचें चक्र फार जोरानें भ्रमण करीत होतें. मोतीचंदाची लागलेली नोटीस त्याला ठाऊक होती. नापिकीमुळें व इतर वाढत्या खर्चामुळें उत्पन्नाचा धरबंद सुटून घराण्याला आलेली हलाखी त्याच्या आजवर नजरेला

आली नव्हती असें नाहीं. पण लहान म्हणून आणि त्याच्यावर कोण-त्याही काळजीचा भार घालायचा नाहीं या उदेभानरावांच्या प्रेमळ वाग-णुकीमुळें, तो जरासा बेफिकीर होता. एवढीही अडचण होती तरी त्याची घोडी, त्याचें खाणेंपिणें, त्याची एकंदर सर्व व्यवस्था त्याच्या भावानें अगदीं आपल्या पूर्व दर्जाला अनुरूप अशीच ठेविली होती. त्याची माता त्याला दहा दिवसांचा सोडून गेली होती आणि त्याचा प्रेमळ पिता नुकताच स्वर्ग-वासी झाला होता. तें दुःख ताजेंच होतें. त्यातच उदेभानरावांच्या डोळयांत आज पाहिलेल्या अश्रूंमुळें सूर्यभानाचें मन फारच व्यग्र झालें. "माझ्या लाडक्या भावाचें दुःख हलकें करण्याकरिता मी काय करूं, काळजीनें आणि दुःखानें विदीर्ण झालेल्या त्याच्या हृदयाला सुख देण्याकरिता मी कोणतें दिव्य करूं, कोणता मार्ग आचरण करूं, कीं भगवंता ! माझ्या पितृतुल्य बंधूचें चिंताहरण होईल ?" हाच विचार या वेळीं त्याच्या डोक्यांत चालू होता. वर आकाशांत ईश्वराकडे तो याच भाविक बुद्धीनें पहात होता. तारका हासत खेळत होत्या, त्यांच्याकडे त्याचें लक्ष नव्हतें. त्याच्या आवडत्या घोडीचा खरारा बरोबर चालला आहे किंवा नाहीं हें तिच्या फुरफुरण्याव-रून याच ठिकाणीं बसून तो जें ठरवीत असे त्या विचाराकडेही त्याचें लक्ष नव्हतें. मोतीचंदाची नोटीस लागली. राहिलेले दोन जमीनीचे तुकडेही आता जाणार. कदाचित या प्राणापेक्षाही प्रिय असलेल्या गढीवरही--

सूर्यभानाच्यानें आतां विचारही करवेना ! त्यानें आपलें मस्तक आपल्या दोन्ही हातात घेतलें व तें घट्ट दाबून धरलें, जणूं काय तसें त्यानें केलें नसतें तर त्याच्या फाटून चिंधड्या झाल्या असत्या. आता त्या हृदयाचा बांध फुटून त्याच्या नेत्रांवाटे अश्रुधारा वाहूं लागल्या. त्यामुळें त्याचें धोतर ओलें होऊन गेलें तरी तें त्याला समजलें नाहीं. त्या वीस बावीस वर्षे वयाच्या सुखांत वाढलेल्या तरुणाला एकदम पुढें उभ्या राहिलेल्या भवि-ष्यकाळानें असें हैराण केलें यात आश्चर्य नाहीं. त्यांतल्यात्यात आपण आता वयात आलों असून सर्व काळजीचा भार आपल्या भावाच्या मस्तकावर पडावा व आपल्या हातून तो दुःखभार हलका करण्याची कांहीं शक्यता दिसूं नये याबद्दल त्याच्या जिवाला अत्यंत यातना झाल्या. इतक्यात संध्या-काळीं तारेनें सांगितलेल्या अण्णाच्या उपदेशाची त्याला आठवण झाली.

क्षणमात्र त्याने आपला दुःखावेग आवरून धरला. " उद्योग! 'नर करणी करे तो नरका नारायण हो जाय!' खरं आहे, पण मी कोणता उद्योग करूं? नोकरी करू? कोणती नोकरी मला मिळणार? शेतातला एक नोकर घालवून त्याच्या जागी मी शेतात काम करायला गेलो तर दादाच्यावरचा भार हलका होण्याला कांही मदत होईल काय? धंदा करावा म्हटला तर कोणता करावा व त्याच्याकरितां लागणारं भांडवल आणावं कोठून? आजच किती तरी निकडीच्या बाबी पुढं दत्त म्हणून उभ्या आहेत? बैल नाहीत, शेतीच्या उस्तवारीकरितां लागणारा पैसा नाही, आणि त्यातून या मोतीचंदाची डिक्री!!" पुन्हा विचारांचं चक्र सुरू झालं. उद्योगाची मात्रा लागू होईना. " हं नुसतं पंडितांचं पांडित्य आहे. शब्दच्छल आहे. हं एक विचारी-सूत्र आहे. बोलायला ठीक आहे, पण सर्वच वेळीं व सर्वच स्थळीं तं लागू होईलच असं नाही." या प्रकारची विचारमालिका त्याच्या डोक्यांत सुरू झाली. क्षणांत त्याची दृष्टि आपल्या तरवारबहाद्दर, प्रौढ व प्रतापी पूर्वजाच्या समाधीकडे गेली. तारेच्या बोलण्यांत त्याही गोष्टीची आठवण होती. पण-पण त्याही बाजूनं सूर्यभानरावाच्या समोर निराशाच उभी राहिली. " कुठं आहे तो काळ! हातांत तरवार घेऊन पुरुषार्थाचे पराक्रम करून नशीबाचं शिकंदर होण्याचा काळ कोठं आहे? महाभाग! आपला तो काळ कुठं आहे? चाकूनं बोट कापलं तर रडून गोंधळ घालणारे आम्ही आज कोणत्या स्थितींत आहोत! आपले वंशज म्हणविण्याची योग्यता तरी आमच्यात आहे काय? लष्करांत नोकरी केली तरी शिपायाच्या दर्जाच्या पलीकडे आज आम्हाला कोण जाऊं देतो? ती मोकळीं मैदानं, त्या बहाद्दराच्या नित्यशः तळपत असणाऱ्या तरवारी, तो मर्दानी लढवय्या मराठी बाणा, त्या गर्दीच्या घोडदौडी, ती हिरव्या जोंधळ्याची दुधाभरली कणसं, धावत्या झऱ्याचें ते निर्मळ पाणी,--अहाहा!! इतिहासा! मराठ्याच्या पवित्र इतिहासा! तुझ्या अमर थोरवीचं कुठवर वर्णन करूं? स्वतंत्र जीवनाचे तेजोमय वारं उत्पन्न करण्याचे सामर्थ्य या हतभाग्याच्या किंवा कुणाच्या तरी आज हातात आहे काय? समशेर पेलणारी ती मनगटं जाऊन आज ही बायकी मनगटं दुर्दैवानं नाचवावी लागत आहेत. अशा स्थितीत नशीब काढण्याचं नांव तरी कसं घेता येणार? शौर्याच्या

वाटा बंद आहेत, धैर्याची काळजें काळजीनें जर्जर झाली आहेत, काळाची क्रौर्याची नजर जास्तच तीव्र होत आहे, उद्योगाचा योग क्वचित् एखा-द्याच्या नशिबीं लिहिला आहे, जीवनाचें जीवंतपण अशा रीतीनें कमी कमी होत आहे अशा दुर्धर परिस्थितींत महाभाग ! मी आपणाला काय विनंति करूं ? आपल्या समाधीवर ठेवलेली ती भाग्यवान् तरवार, आमच्या रोजच्या पूजेतील ती करूळ महाशक्ती, आपल्या मर्दाईची ती महादेवी, आपल्या तेजस्वी जिभेनें कांहीं गुरुमंत्र देईल काय ? " सूर्यभान विचारांनीं बेफाम झाला होता. तो हळूंहळूं पायऱ्या चढून वर गेला. क्षणमात्र समाधीसमोर उभा ठाकला. त्यानें हातांत तें खडग घेतलें. घोडी फुरफुरली. त्याच्या अंगात विजेसारखा एक प्रकारचा आपादमस्तक झणझणाट उत्पन्न झाला. त्यावरील म्यान त्यानें बाहेर काढलें व त्या तरवारीला त्यानें घट्ट आलिंगन दिलें. तशा स्थितींत तो कांहीं वेळ तसाच निश्चेष्ट होता. त्याच्या डोळ्यांतून अश्रु-धारा वहात होत्या. तें जड खडग त्यानें आपल्या हातांत घेतलें. तो जरी फारसा शिकलेला नव्हता तरी अण्णानें त्याला इतिहासाचें मार्मिक ज्ञान करून दिलें होतें. त्या तरवारीच्या रूपानें उज्ज्वळ मराठी इतिहास त्याच्या डोळ्यापुढें उभा राहिला. एवढी जड तरवार पण त्या वेळीं त्यानें आपल्या हातानें पेलून धरिली. त्यावरील "जानोजी राजे शिर्के" हें खोदलेलें नाव त्यानें तेथें जळत असलेल्या समईच्या उजेडांत लख्ख वाचलें. त्या नावाचें स्थान नेमकें त्यानें आपल्या मस्तकावर लावलें. त्याला क्षणभर असें वाटलें कीं तें नाव आपल्या मस्तकावरील दुर्दैवाच्या रेषा पुसून काढीत आहे. घोडी पुन्हा फुरफुरली ! "जीते रहो" असा त्यानें आवाज दिला. मंदिराच्या घुमटांतूनही "जीते रहो" असा प्रतिध्वनि निघाला. सूर्यभानाच्या अंगा-वर भावनेचे रोमांच उभे राहिले. दिव्याच्या प्रकाशांत तळपणाऱ्या त्या पात्यानें त्याला भारून टाकलें. तो तिच्याकडेच सारखा पहात उभा राहिला. आपल्या दोन्ही हातांत त्यानें ती तरवार अगदीं नाकासमोर धरली. त्याच्या हृदयाचें स्पंदन जलद सुरू झालें व त्याच्या तोंडांतून वेदघोषाप्रमाणें शब्द प्रस्फुटित होऊं लागले. " शिर्केकुळवरदायिनी, महत्तेजप्रसारिणी, दौर्बल्यांधःकारविनाशिनी, जीवनानंददायिनी, महत्तेजप्रतापिनी, भगवती भवानी, आई मी काय करूं तें मला सांगशील का ? तुझी आम्ही अवहेलना

केली म्हणून तूं आम्हांवर रुष्ट झालीस काय? कुलदेवते! आम्ही काय करावें म्हणजे तूं आमच्याकडे पाहून समाधानानें हंसशील? आम्हांला आशीर्वाद देशील? कालाला कलाटणी देण्याचं तुझं सामर्थ्य आम्हां पामरांना आतां राहिलं नाहीं. आमची आतांची भक्तीची भाषा वृथा आहे. तें तेज काळाबरोबर लुप्त झालं म्हणून का तूं अशी हंसते आहेस? आतांचं युग निराळं आहे"— पुन्हां घोडी फुरफुरली. यावेळीं 'जीते रहो' हें नेहमींचे त्याचं वाक्य उच्चारण्याचं भान सूर्यभानाच्या ठिकाणीं नव्हतं. तो सारखा त्या तरवारीशीं बोलतच होता. दिव्याचा प्रकाशही मंद होत चालला होता. "कुळदेवी, तुझं हास्य मावळू लागलं. तुझी मुद्रा कठोर दिसायला लागली, या पातक्याच्या हातात तुझा वास तुला जड वाटू लागला का? या अशा भीषण स्वरूपांत माझ्यापुढं उभी टाकून तुला आणखी काहीं भीषण—" सूर्यभानरावाचे हात थरथर कांपूं लागले. त्या तरवारीचं वजन आता त्यांच्या हातात सहन होईनासें झालं. ती हातातून पडेल किंवा काय अशी त्याला भीति वाटली. मोठ्या धैर्यानं त्यानं तिला आपल्या उजव्या हातात उभी घट्ट धरली, डाव्या हातानं तिचं म्यान उचललं व कापऱ्या हातानेंच त्यानें तें पातें त्या म्यानात अर्धवट खोचलं. पुन्हां एकदा त्यावरील नाव त्याला दिसलं. यावेळीं तीं बारीक अक्षरं त्या दिव्याच्या मंद प्रकाशात त्याला फारच मोठीं दिसूं लागलीं. त्याचा हात जागच्या जागीं थबकला. त्याच्या मस्तकात वेदना होऊं लागल्या. अक्षरं टप्पोरीं दिसूं लागलीं. जणूं काय तीं विद्युल्लतेनं लिहिलीं आहेत, असली तेजाळ ती अक्षरमालिका त्याला भासली. "आजोबा, वीरवर! आपल्या या संदेशाचा मी काय अर्थ समजूं? मी कोणत्या रीतीनं वागून आपलं कुळ धन्य करूं?" आतां तीं अक्षरं अग्नीज्वाळेप्रमाणं लाल दिसायला लागलीं. सूर्यभानाचं देहभान हरपलं. त्या ज्वलत् तेजस्वी अक्षराकडं त्यानें मुहूर्तमात्र पाहिलं. क्षणभरच पण त्याच्या डोक्यांत आपण केवळ भुभार आहोंत अशी कल्पना चाटून गेल्याचा त्याला भ्रम झाला! त्याच्या चेहऱ्यावर निमिषात हास्य चमकलं. दिव्याची ज्योत कमी कमी होत होती. त्यानें झरदिशीं तें पातें पुन्हा बाहेर काढलें आणि निमिषांतच समाधीसमोर ठाण मांडून बसून "कुळाला, देशाला, धर्माला उर्जित करण्याला नालायक असलेला हा पातकी, हे महादेवी! पुन्हा तुझ्या इच्छे-

प्रमाणें तयार करून याला जन्माला घाल" असें शांत स्वच्छ शब्दांत बोलून ती तरवार त्यानें मानेवर टेंविली. तोंच त्याचा हात मागून कोणीसा धरला.

"सूर्यभान, हें काय करीत होतास? वेड तर लागलें नाहीं तुला!"

"अण्णा!" एवढेंच शब्द भानावर येऊन त्यानें उच्चारले व त्याच्या गळ्याला त्यानें घट्ट मिठी मारली. अण्णांनें त्याला कुरवाळताना त्याच्या मानेवरून हात फिरविला तों त्याच्या हाताला थोडेंसें रक्त लागलें. तें तीक्ष्ण पातें त्याच्या मानेला थोडेंसें चाटून गेलें होतें.



# प्रकरण ५ वें



सूर्यभानाच्या गळ्यांत हात घालून अण्णानें त्याला मोठ्या प्रेमाने घरांत आणलें. खोलींत पोंहचल्याबरोबर त्याने स्वतः बाटलीभर पाणी आणून प्रथम त्याची जखम पुसून तपासली. धार उगीच चाटून गेली होती, अर्थात् त्याबद्दल विशेष काळजी करण्याचें कारण नव्हतें, तरी त्यावर घरांतून जाऊन थोडीशी हळद आणून ती दाबली. हळद मागायला तो घरांत गेला तेव्हां गिरिजावहिनींनें ( उदेभानरावांच्या कुटुंबानें ) 'हळद कशाकरितां हवी' म्हणून त्याला विचारिलें.

" जरा चाकूने माझे बोट कापलें त्यावर दाबायला हवी " असें सांगून बहाणा केला. पण तो तिच्या पुढें टिकला नाही. पाटील आणि देशपांडे या घराण्यांचा पूर्वापार ऋणानुबंधच असा होता कीं त्यांचीं मानलेली नातीं सख्या नात्यांपेक्षांही बलवत्तर प्रेमबद्ध झालेलीं होतीं. गिरिजा आणि अण्णा सारख्याच वयाचीं. क्वचित् गिरिजा त्याच्यापेक्षां एखाद्या वर्षानें वडील असेल. अण्णा तिचा मानलेला भाऊ होता. अण्णाचें बोट कापल्याचें कळल्याबरोबर त्या माऊलीचा जीव कळवळला. श्रीकृष्णाचें बोट कापल्याचें कळल्याबरोबर द्रौपदीला जें वाटलें तेंच यावेळीं गिरिजेला वाटलें. तिनें ताबडतोब अण्णाचा हात धरला.

" बघु दे मला ते. कसला रे चाकूचा खेळ खेळत असतोस अण्णा तूं ? आता कांही अगदी पोर नाहीस. " कमळजाबाईच्यानंतर गिरिजेच्या ठिकाणी वडीलपणाचा मान आल्यामुळें व वयानेंही ती वडील असल्यामुळें अण्णांनी तिला स्वतःला बहुमानानें न संबोधण्याबद्दल सांगितलें होतें. उदेभानरावांनाही तो वडिलबंधूच्या समानच समजत असे.

गिरिजेच्या प्रश्नानें अण्णा गोंधळला. बाजू अंगावर येतें व सूर्यभानाच्या बारक्याशा जखमेच्या निमित्तानें मंदिरांतील सारी कथाच सांगावी लागणार कीं काय हा विचार मनांत येऊन तो थोडा जास्तच गोंधळला. वास्तविक उदेभानाची हकीकत कुणालाच कळूं नये, ही त्याची इच्छा होती.

गिरिजेनें ताबडतोब धांवत जाऊन पाण्याचा तांब्या आणला व बरोबर एक चिंधीही आणली.

" आण मी तुझा हात धुतें नि ही पट्टी बांधते. अगदींच बावळट आहेस झालं. चाकू घेतलास तर हात कापून घेतलास, तरवार घेतलीस तर काय करशील दिसतंच आहे ! तरी बरं आतां तरवारीला हात घालण्याचा मुळीं काळच नाहीं. आण हात. "

मुकाट्यानें गिरिजेच्या पुढें हात केल्यावांचून अण्णाला गत्यंतरच नव्हतें.

" काहीं मोठी जखम नाहीं. दिसेल न दिसेल अशी उगीच आहे पण वाटलं आपलं दाबावी थोडी हळद तिच्यावर ! आमच्या आईचं घरगुती औषध आहे तें ! "

अण्णानें हात पुढें केला. गिरिजेनें त्याचा तो हात धरून त्याला दिव्याजवळ ओढीतच नेलें.

" अण्णा, चारी बोटं कापलीं आहेत की रे ? कुठ होतं बाबा लक्ष तुझं त्या वेळीं ? बघ कसं रक्त निघत आहे त्यातून ? "

अण्णानें अत्यंत विस्मयानें आपल्या हाताकडे पाहिलें. त्याच्या डाव्या हाताच्या चारी बोटांवरून एक रक्त रेषा उमटली होती. तिच्यावर जागोजागीं रक्ताचें बिंदू थबकले होते व काहीं ठिकाणचें रक्त पुसून जाऊन त्याच्या बोटावर व तळहातावर त्याचे डाग पडले होते. अण्णा काहीं बोलला नाहीं. गिरिजेने त्याच्या हातावरील रक्त स्वच्छ पुसून काढलें व त्यावर हळद चांगली दाबली व आणलेली पट्टी तिनें चारी बोटांना धरून नेमकी बाधून काढली. पुन्हां असा वेडगळपणा न करण्याबद्दल तिनें त्याला बजावलें व सूर्यभानरावाकरितां पाट मांडायला तारेला हांक मारून सांगून तिनें तिथं असलेला एक पाट मांडला.

" बैस इथं, थोड दूध देतें तें पी. भावोजीनाही इथंज जेवायला पान मांडते. मी आणते बोलावून त्यांना ? तारा ! अण्णाकरिता चांगलं ऊन दूध तयार कर बरं लवकर ? आलेंच मी—" असें म्हणून गिरिजा सूर्यभानरावाच्या खोलीकडे जावयास निघाली.

" वहिनी मीच आणतों की जाऊन त्याला. तारा दूध ऊन करतेच आहे तोंवर मी घेऊन येतों. तुम्हीं करा की पाटपाणी. "

"बरं तसं कर जा लवकर! दूध ऊनच आहे. थोडी साखर घालून आटविलें म्हणजे झालं." असं म्हणून गिरिजा आंत गेली.

अण्णाचें अंतःकरण अत्यंत सद्गदित झालें. गिरिजा आत जात असतानाच त्यानें तिच्याकडे पाहून तिला हात जोडले व अत्यंत भक्तिपूर्वक त्यानें तिला नमस्कार केला. सुदैवानें तिथेंच पडलेली हळदीची पुडी त्यानें उचलली व तो तडक सूर्यभानाच्या खोलीकडे चालता झाला. त्याच्या मानेवर त्यानें हळद दाबली. जखम फार नसल्यामुळें व गार पाण्यानें तो भाग धुतला गेल्यामुळें रक्त वहाण्याचें बहुतेक बंद झालेंच होतें तरी पण त्यानें हळद दाबून काढली. अण्णा येईपर्यंत सूर्यभानानें तोंड वगैरे स्वच्छ धुवून केस नीट केले होते. पहिला सदरा काढून टाकून अगांत दुसरा सदराहि घातला होता. अण्णा आल्याबरोबर त्याच्या हाताला बांधलेल्या पट्टीकडे पाहून त्यानें त्याला 'हें काय'? म्हणून विचारिलें.

"बोटाना चाकू लागला आहे" हीच सबब त्यानें सूर्यभानाला सांगून त्याला भोजनाला खालीं आणलें व त्याचें जेवण होईपर्यंत त्यानेंहि आपलें दूध पिणं हळू हळू बोलत बोलत चालू ठेवलें. बोलताना त्यानें चिनांतील आपसातील युद्ध हा एक निराळाच विषय काढला होता. नेहमीप्रमाणें बायकांनीं बोलण्यात भाग घेण्यासारखा हा विषय नसल्यामुळें त्यांच्यापैकीं कोणी मामुली विचारपूस करण्यापलीकडे त्याच्या भाषणात बोलले नाहीं.

भोजनोत्तर सूर्यभानरावानीं कपडे चढविले व ते दोघेही मित्र गढीच्या बाहेर पडले. गढीच्या उतरणीवर त्याना उदेभानराव भेटले. अण्णानें त्याना अभिवादन केलं. उदेभानराव गढीत आले व अण्णा आणि सूर्यभान अण्णाच्या घराकडे चालते झाले.

---

# प्रकरण ६ वें



" भानू ! बैस या आरामखुर्चीवर. मला मोठी काळजी वाटतें तुझ्याबद्दलची. आज असं काय चमत्कारिक तुझ्या डोक्यात आलं ? अनर्थ केला असतास बाबा तूं ? "

" मला आता वाटायला लागलं की मोठा अनर्थ झाला असता, पण अण्णा, तुला खरंच सांगतो, मी त्यावेळीं अत्यंत बेभान झालो होतो. खरं विचारशील तर मी काय केलं आणि करीत होतो ते मला अगदीं नक्की जुळवून आताही सांगता येणार नाहीं. " भानूनं आपली टोपी काढून टेब-लावर ठेविली. खिडकींतून गार वारा येत होता. थोड्या वेळापूर्वी त्यानं पाहिल्याप्रमाणेच वर आकाशात तारका विहार करीत होत्या.

" भानू ! मला आता तुझ्यावर फार बारीक नजर ठेवावयाला हवी. तुझ्यासारखी माणसं मनानें फार सज्जन पण विचारानें फार अविचारी असतात. एखादी गोष्ट त्यांच्या मनाला लागली की लगेच पहिल्या विचा-राच्या उसळीचं टोक ते शेवटच्या विचाराच्या मर्यादेशीं क्षणांत नेऊन भिडवितात. तुझं मन क्रांतिशील आहे. असल्या माणसांना विवेकानं कार्य करण्याची संवय नसते म्हणूनच अनेक प्रसंगीं त्यांच्या कार्यांत अपयश येतें. इतकेंच नव्हे तर केव्हा केव्हा ज्या कार्याच्या सिद्धीकरितां त्यांचें मन जोराची उसळी मारून आपल्या शक्तीचा बेतोल प्रहार करतं. प्रहाराचा अग्नि वाय-बाराप्रमाणें निष्फळ ठरून उद्दिष्टकार्यालाही तो अडचण उपस्थित करितो. भानू ! मी तुला आजवर असल्या प्रवृत्तीचे कांहीं त्रोटक दाखले दिलेले आहेत. आज तुला एवढा त्रागा करावयाला काय झालं हे मला सांगशील काय ? " अण्णा एक खुर्ची घेऊन त्याच्याजवळ बसला. त्यानें प्रेमानें त्याच्या केसांतून आपली बोटं फिरविलीं आणि एखाद्या अर्भकाला थाप-टावें त्याप्रमाणें त्यानें त्याच्या डोकीवर हळूहळू थापटण्यास आरंभ केला. भानूच्या डोळ्यांत पुन्हां पाणी आलें. अण्णाचा हात त्याचें डोके थापटीतच होता. त्यानें हळूच वत्सलतेनें आपलें डोकें त्याच्या बाहूवर टेकलें. अण्णा गहिंवरला. " काय झालं आहे सांगशील तर ? " अण्णा बराच विचार

करूं लागला .पण त्याच्या आकलनात भानूच्या या मनःस्थितीचें प्रत्यक्ष कारण येईना. अण्णाला आजवर सूर्यभान कधींही असा मलूल दिसला नव्हता. सदासर्वदा हंसतमुख, केव्हांही कुठेंही निदर्शनास येणारी ओज-निर्मल–वृत्ति, लहान मुलाप्रमाणें कोणत्याही प्रकारची काळजी नसल्यामुळें दृग्गोचर होणारी आनंदी चचलता, ह्या गोष्टी अण्णाच्या परिचयाच्या होत्या. त्याचा भानू जरासा हूड, मानी आणि अन्यायाच्या प्रसंगीं प्रखर असल्याचेंही त्याच्या एक दोन प्रसंगीं निदर्शनास आलें होतें. पण आज जवळ जवळ आत्मघातास प्रवृत्त करण्यासारखें काय घडलें असावें याबद्दलचा कयास त्याला मुळींच करतां येईना.

" भानू, तुला काय होतं, मजजवळ सागणार नाहीस काय ? "त्याचा हात आपल्या हातांत घेऊन अण्णानें हळूच प्रश्न केला. साश्रुनेत्रांनींच सूर्यभानानें त्याला उत्तर दिलें.

" अण्णा, कोणतीही गोष्ट मी तुला सांगितल्यावाचून कसा बर राहीन ! माझ्या जीवाची गोष्ट सांगायला मला तुझ्यावाचून असं कोणतं मोकळं स्थान आहे ! पण अण्णा ! आजचं हे माझं दुःख माझ्या तोंडानें तुला सांगवतच नाही. तूं मला कदाचित् वेडा म्हणशील. म्हण. पण मला ज्यामुळें आज इतकं वाईट वाटतं त्याचं कारण मला इतक अकस्मात् जाणवलं की माझ्या हृदयाचा अगदी धरबंधच सुटला. "

" अरे पण काय झाल आहे हें सांगशील तरी. जगात अशी कोणतीही गोष्ट–अडचण–नाही कीं जिच्याकरितां कांहीं तरी उपाय नाहीं. मानवी बुद्धीच्या करामतीचे अनेक दाखले तुझ्या परिचयाचे आहेत. देवाच्या दयेनें तूं अनेक प्रकारचीं पुस्तकें वाचली आहेस. पुस्तकांतलें ज्ञान आणि त्यांतील करामती अगदीं तशाच्या तशाच तंतोतंत प्रत्येक परिस्थितीला लागू होतील असें माझें म्हणणें नाही. पण त्यापासून मनुष्याला योग्य तो उपदेश मिळून स्वशक्त्यनुसार परिस्थितीशी तोंड देतां येतें. "

" तूं मला आजवर दिलेल्या ज्ञानाचा लवलेशही मजजवळ शिल्लक राहिला असेल असें मला वाटत नाही. मी अगदी कोरडा ठणठणीत पाषाण झालों आहे असें म्हणेनास ! नाना काय सांगूं तुला ! आज सायंकाळी शेतावरून घरीं आलों. बैलांची स्थिति तूं पाहिली आहेसच.

पावसाळा अगदीं आंगाशीं आलेला आणि नांगरटीही अजून पुरी झाली नाहीं. बैलांच्या कंबरा लागून त्यांच्यानें आतां काम झेंपत नाहीं. आमची स्थिति अशी—" यापुढें सूर्यभानाच्यानें बोलवेना. त्यानें पुन्हां अण्णाच्या बाहूवर डोकें टेकलें. व त्यानें आपले डोळे घट्ट मिटून घेतले. अण्णानें आपल्या धोतरानें त्याचे डोळे पुसले व त्याचें डोकें थापटीत तो त्याला म्हणाला—

"भानू! व्यवस्था होईल रे सारी. दादा खटपट करीतच आहेत त्याबद्दल! तूं कां काळजी करितोस उगीच?"

"अण्णा! नाहींरे, खटपटीला यश येण्यासारखं कांहीं चिन्ह दिसत असतं, तर आमच्या दादांच्या नेत्रांत अश्रू दिसलेच नसते. दादांच्यासारखा धीराचा माणूस विरळा. त्याच्या डोळ्यांतील अश्रू—अण्णा! त्या अश्रूंनींच आज माझ्या हृदयाची पकड घेतली आहे. अण्णा, पाटलांना जाऊन नुकताच एक महिना झाला. माझा दादा एवढ्या संकटांत, त्यांतून त्या मोतीचंदाची नोटीस लागलेली—हाय हाय! मी एवढा बरोबरीचा भाऊ असून केवळ घरांत बसून खाण्यापलीकडे माझ्या भावाला माझा कांहीं उपयोग होऊं नये! ह्यापेक्षा दुर्दैव तें कोणतें? अण्णा खरंच सांगतों, माझं जिणं मला जड वाटूं लागलं आहे. दादांच्या डोळ्यांतले ते अश्रु आठवले म्हणजे माझ्या डोक्यांत बेफामपणा माजून मला कांहीं दिसेनासं होतं. आपल्या हातांत कांहीं नाहींच काय? हा विचार मुहूर्तमात्र येतो न येतो तों डोकें भ्रमण करावयास लागतें—"

तशाही स्थितींत भानूचें डोकें थापटीत अण्णा थोडासा हसला. त्याला त्याच्या मित्राच्या बंधुभक्तीबद्दल व मनाच्या टेवणीबद्दल मोठें कौतुक वाटलें. सूर्यभानानें वर पाहून म्हटलें—

"अण्णा! माझ्या दुःखांत तुला हंसायला येत काय रे? माझ्याबद्दल तुला अनुकंपा वाटत नसेल काय?"

"भानू! मला हंसायला आलं तें तुझ्या दुःखाबद्दल नव्हे! मी हंसलों तो तुझ्या वेडगळपणाबद्दल! भानू! काय म्हणूं तुला? तुला शहाणा म्हणूं, का वेडा म्हणूं, का माथेफिरू म्हणूं? एरवीं कोणत्याही मर्दुमकीच्या कामांत उफाळणारी तुझी छाती, अशा प्रसंगीं कशी कमकुवत झाली याबद्दल मला राहून राहून आश्चर्य वाटतें! संकट आहे, कबूल आहे. पण त्याला धैर्यानें

तोंड द्यायला हवे ना ? असे हात पाय गाळून कसें चालेल ? दादाला जर तुझी ही अवस्था कळली तर त्याचे हातपायच गळतील की नाही ? तुझा ईश्वरावर भरंवसा आहेना ? ''

'' त्याच्यावर भरंवसा नाही असे कसे होईल ? पण अण्णा तूं बघतोच आहेस. आज चार वर्षे झाली सारखी नापिकी चालू आहे. कर्जदारांच्या घरात एक पैसाही दिला गेला नाही. माझ्या लग्नाच्या कर्जात गावचा हिस्सा सावकाराच्या घरात गेला. धरित्रीमाता जशी कांहीं रुष्टच झाली आहे. कुळस्वामीनींनही पाठ फिरविल्यासारखं मला वाटत आहे. आमचेकडून काय अपराध झाला आहे म्हणून देव अजूनपर्यंत आमचा अंत पहातो आहे ?—''

'' देव दयाळूच आहे. तुझ्या पूर्वजाची पुण्याई आणि कुळस्वामीनींची दया तुमची पाठीराखी आहे. अरे संकटे येतच असतात. पण त्याच्या कृपेनें त्याचं निवारण झाल्यावाचून रहाणार नाही ही तूं खात्री समज. ''

'' सगळी सोंगे येतील पण अण्णा, पैशाचें सोंग आणूं म्हटलं तर कस येईल ! ''

अण्णाला त्याचे समाधान कसं करावं हे कळेना. भानूच्या हृदयावर निराशेचा अम्मल पूर्णपणे बसला होता. विषय बदलावासा वाटून त्याने त्याच्या आवडत्या घोडीबद्दल प्रश्न केला.

'' कदाचित् घोडी लवकर विकावी लागेल आम्हाला ! अण्णा ! पुन्हा असलं उमदं जनावर मिळेल का रे ? तूंच ठेऊन घेईनास ते आपल्याजवळ ! माझ्यासमोर माझी बिजली विकली जाण्यापेक्षा- '' अण्णाला घोडीबद्दल कोठून विषय काढला असें होऊन गेलं.

'' बरं बरं तशी वेळ आलीच तर घोडी माझ्या घरी बांधेन मी. जनावर तुझेंच राहील. पण त्या गोष्टी कशाला या वेळीं ? दादा तशी वेळच येऊं द्यायचे नाहीत. ईश्वर त्याना अवश्य साह्य करील, असा मला भरंवसा वाटतो. नाना खटपट करीतच आहेत. मीही तेवढ्याकरिताच आज देवगावास गेलो होतो. जुळेल हळुहळू. पण तूं जरा धीर धर आणि संभाळ अँ ! हें तुझं असलं निराश तोंड दादाच्या नजरेला पडूं देऊं नकोस. त्याना उगीच काळजीत टाकशील. तारा जरा काळजीतच होती. मी आज तुझ्याकडे आलो तेव्हा तिने तुला कसली तरी काळजी वाटत असल्याचें सांगितले. मी कदाचित् तुझ्या खोलीतच एखादं पुस्तक घेऊन बसलों असतो पण

तिनं प्रथम मला तुझ्याकडे पिटाळलं. कधी कधी ईश्वर स्त्रियांच्या मनात अशी काही प्रेरणा करितो की त्याच्यामुळे प्रसंगी अनेक अनर्थ टळतात. काय पोरीला वाटलं कुणाला ठाऊक, तिनं मला लगेच तुझ्याकडे मंदिरांत जायला सांगितलं! मला वहिनीशी सुद्धा बोलूं दिलं नाही! तूं तबेल्यात असशील म्हणून तिकडे गेलों. हसनचा खरारा चालू होता. इतक्यात मंदिराकडे नजर गेली. तूं पुन्हा आत शिरलास. तुझ्या प्रार्थनेत व्यत्यय येऊं नये म्हणून थोडा पायरीवरच थबकलों पण जेव्हा तू तरवार घेऊन आपल्या मानेवर ठेवावयास लागलास तेव्हा तर--शहाणा आहेस झाल? तारा तरी समजदार आहे तुझ्यापेक्षा!"

"तुझी शिकवणच तशी आहे! आमच्या येथल्या बायकांना अगदी पंडिता करून टाकणार आहेस वाटतं तू? अरे आमच्यासारख्या जवळ जवळ अशिक्षितांना कशा आटपणार बाबा ह्या?

सूर्यभानाच्या तोंडावर स्मित आलेलं पाहून अण्णाला आनंद झाला.

"तूं, मला वाटतं नुकतंच उद्योगावर त्याच्या पुढं व्याख्यान दिलंस. शब्दनशब्द अगदी तुझ्या तोंडचाच म्हणेनास—त्यानी आमच्यावर लोटला. आजचा हा सगळा तुझ्या व्याख्यानाचा परिणाम! अण्णा तुझ्या शिक्षणाची दिशा बदलशील तर बरं!"

"त्याच्या शिक्षणाची दिशा बदलण्याची आवश्यकता नाही. पण तुझ्या शिक्षणात मात्र मला फरक केला पाहिजे. तुला आता मी निराळी पुस्तकं देणार आहे. आज चांगली झोप घे. काळजी सोड, ईश्वरावर भरवसा ठेव. वेडेपणा करूं नकोस. झोपतोस इथ. सांगू अंथरूण घालायला?" हे त्याचं वाक्य संपतं न संपतं तोंच हसन कंदील घेऊन येऊन पोहचला. उदेभानरावांनी भानूला नेहमीपेक्षा जास्त उशीर लागल्यामुळं हसनला तो अण्णाकडेच राहणार आहे काय, हे बघायला पाठविलं होतं.

"हसन आलाच आहे. जातो आता मी, सकाळी ये अँ अण्णा!" सूर्यभानरावानं कोटटोपी चढविली. अण्णा त्याच्याबरोबर दारापर्यंत गेला. हसन आणि सूर्यभान निघून गेले. बराच वेळ अण्णा आपल्या स्नेह्याकडे पहात दारात उभा होता. "ईश्वरा माझ्या भानूवर तुझी दया असूं दे." अशी परमेश्वराला प्रार्थना करून तो आपल्या खोलीत आला व अंथरुणावर पडला. त्याला ताबडतोब झोप लागली.

# प्रकरण ७ वें



शिवराव हरिहर ऊर्फ अण्णा देशपांडे हा पहिल्या प्रकरणांत परिचित झालेल्या श्रीयुत हरीहरराव उर्फ नानासाहेब देशपांडे यांचा मुलगा होय.

बावीस तेवीस वर्षं वयाचा, सडपातळच, पण बंदिस्त बांध्याचा आणि उदार, निर्मल वर्तनाचा, हा तरुण नानासाहेबाचा एकुलता एक जीवन-विसावा होता. शिवरावापेक्षा एक वडील व एक धाकटी अशा त्याला दोन बहिणी होत्या. त्यांचीं लग्नं योग्य वेळीं व योग्य ठिकाणीं होऊन त्या आपल्या सासरीं सुखानें नांदत होत्या. त्याला एक सर्वांत वडील भाऊ होता. पण दुर्दैवानें पांच वर्षांपूर्वी गांवांत एकाएकीं वाख्याचा आजार उत्पन्न होऊन त्यानें आपल्या उदरांत त्याची व त्याच्या महामना मातुश्रीची आहुती घेतली होती. घरांत हल्लीं नानासाहेब, अण्णा व त्याच्या वडील भावाची विधवा स्त्री इतकींच माणसें होतीं. त्याच्या मातोश्रींचें नांव अनुसूयाबाई असें होतें. अनुसूयाबाई महान् ईश्वरभक्तीपरायण, गरीबांच्या कनवाळू, आपपर भावविरहित आणि मोठ्या उदार मनाच्या होत्या. त्या तेथील देशमुख घराण्यांतील असून त्या कालीं हीं दोन्ही घराणीं फार वैभवसंपन्न होतीं. पाटलाचें घराणेंही त्या काळीं कोणत्याही तऱ्हेनें थकलेलें नव्हतें. देशमुख आणि देशपांडे हे कांहीं प्रसंगीं वतनाच्या बाबतींत एकमेकाशीं विरोध करीत असले, तरी तेवढी बाब वगळून बाकीच्या गोष्टींत त्या दोन्ही घराण्यांचा सलोखा असे. बहुधा प्रत्येक पिढींत या दोन्ही मोठ्या आणि शाखाविस्तृत घराण्यामध्यें शरीरसंबंध झालेले होते. पाटलांच्या ठिकाणीं या दोघांचाही विश्वास असल्यामुळें त्यांच्या सौजन्ययुक्त मध्यस्थीनें कोणताही विरोध विकोपास जात नसे. पण काल पालटला. व्यय वाढता होऊन आयात घटत चालली. दरबारी थाटाचीं लग्नकार्यं व एकंदर खर्च व शेतीच्या नापिकीचीं वर्षें यामुळें आयव्ययांत महदंतर पडून कर्जानें घरांत ठाणें धरिलें. त्यांतच गांवांत व्यापार थाटून धनिक झालेल्या मोतीचंदाची

सावकारीच्या वाढीबरोबरच वाढणारी ग्रामप्रतिष्ठेची हांव आतां उफळू लागली होती. त्याचा ऋणको झालें म्हणजे त्याच दिवशी घरादारावर तुळशीपत्र ठेवल्यासारखें होय, असा त्याच्या सावकारीचा लौकिक साऱ्या गांवांत व आसपासच्या खेड्यांतून झाला होता. अनेक गरीब कुटुंबें आपल्या थोडथाबहुत जमीनजुमल्याला मुकून तेथून परागंदा झालीं होतीं. राहिलेले लोक कसेबसे कष्टानें काळ कंठीत होते. प्रतिवर्षी मोतीचंदाच्या जमीनीचें क्षेत्रफळ भराभर वाढत होतें आणि त्या वैभवास साजेसा मोठा वाडा बागबगीचे, बैलांच्या सुंदर जोडया इत्यादि थाटमाट त्यानें ठेऊन दिला होता. त्याच्या पागेंत त्याच्या मुलाकरितां म्हणून चार उमदे घोडे व निवडक बैलांच्या जोडया होत्या. पैशानें मोठा झालेला उपटसुंभ त्याच्या मनाच्या साहजिक प्रवृत्तीमुळें गावांतील जुन्या प्रतिष्ठीत व घरंदाज लोकांवर आपली पापी नजर वळवूं लागल्याचें प्रत्यंतर अगदीं दुामळच असतें असें नाहीं. निदान पवनपुरांत तरी तें प्रत्यंतर येऊं लागलें होतें. विपन्नतेमुळें लोक गरजू झाले. संपन्नतेमुळें मोतीचंद "रोखाधनी" होऊन वैभवसंपन्न झाला. समोर असलेल्या कुळाच्या दीनमुद्रेकडे पाहून व त्याचे केविलवाणे शब्द ऐकून शेटजींना आपली गादी म्हणजे राजगादीच वाटे. त्यांच्या चेहऱ्यावर करुणेच्या ऐवजीं एक प्रकारचें समाधानाचें हास्य विलसे. त्यांच्या मिशा फुरफुरूं लागत. त्यांच्या स्वच्छ तलम मलमलीच्या सदऱ्याखालील त्यांचें अंतःकरण स्पंदित होऊन त्याचे तालबद्ध मधुर टोके त्यांच्या कानांत त्यांचा त्या वेळेचा अधिकार केवढा मोठा आहे याची जाणीव करून देत आहेत कीं काय असें वाटे. त्यांच्या कानांतील मौल्यवान मोत्याची बिगबाळी जास्तच चमकत असे व उत्कृष्ट पॉलिस केलेल्या पितळी भांड्याप्रमाणें महादेवी लक्ष्मीच्या कृपेनें उजळलेला त्यांच्या चेहरा आणीकच तजेलेदार होत असे. हीं त्यांचीं "दर्शनें" ज्या मानाचें ज्या प्रतिष्ठेचें कुळ त्यांच्या समोर असे त्या मानानें कमी जास्त प्रमाणांत दिवसांतून अनेकवार दिसत असत.

शेटजी वयानें अदमासें ५० ते ५५ वर्षांचे होते. या गांवांत ते आले त्यावेळीं त्यांचा मुलगा माणकचंद हा वर्ष सहा महिन्यांचाच असेल. तो आतां पंचविशींत होता. या सरासरी २५ वर्षांत शेटजींनी एवढें वैभव

अगदी लहान भांडवलावर मिळविले होते. त्याच्या काटकसरीच्या राहणीची, त्यांच्या सोशिकपणाची व दीर्घोद्योगाची कथा आता जुनी झाली असली, तरी प्रस्तुतचे वैभव त्यांना आपल्या पराक्रमानें मिळविले असल्यामुळे त्यांना अंतस्थ फारच मोठें समाधान वाटत असे व क्वचित प्रसंगी त्याचा उल्लेख ते समजू लागल्यापासून उत्तम स्थितीच लाभलेल्या आपल्या मुलाला मोठ्या अभिमानानें सांगत असत. लोकांनी त्यांची केलेली निंदा एखाद्या वेळी त्याच्या कानी आली म्हणजे "मी कधींहि कुणाचा घातपात केला नाहीं" असा स्पष्ट जबाब ते आपल्या अंतःकरणाला देत व मोकळे होत. मनुष्य सरळ होता पण वाढती लक्ष्मी आपली जादुगारी फैलावल्यावाचून कशी राहणार? तिला वाटण्याची हौस आणि तिच्या कृपास्थानाचे डोळे तिच्या हौसेमुळें भरलेले, एवच मोतीचंद शेटजी हळूहळू आपण या गावचे सत्ताधारी कसे होऊं हा विचार करावयाला लागले. चार एकर जमीन आणि दोन रेमंडोके बैल बाळगणाऱ्याची मिळकतच नव्हे, त्याच्या जवळ राहिली काय आणि कुठेंहि राहिली काय सारखीच अशी त्यांची आज विचारसरणी होती.

"हे पहा बाबा, तुझ्याकडे एक हजार निघतात, आणखी मागतोस काय सांगावें? तुझी सारी मिळकत चार पांचशे किंमतीची. तुला सरळ सांगतो आमच्या घेण्यात तुझ्या जमिनीचें विक्रीपत्र करून दे आणि सुखानें रहा. तुझ्याकरितां केलं पाहिजे कांही तरी अशी आमची इच्छा आहे. आता पैसे मागू नकोस."

"शेटजी! गेल्या साली जमीन १५०० रुपयास मागितली होती. त्या ह्यांनी वाटलें पोराबाळाची भाकर आहे. यंदा कशीतरी दया कराल तर पिकावर आपला वसूल देईन. कराच एवढी मेहेरबानी." यावर शेटजी एक प्रकारचें कृपाहास्य करीत. त्याच्या अज्ञानाची त्यांना कींव आलेली दिसे. त्यांनी हंसतच उत्तर द्यावें "आता कसला चांगला काळ घेऊन बसला आहेस. अरे, हे कलियुग आहे, दिवसेंदिवस काळ वाईटच येत जाणार! बघतो आहेस ना गेली चार वर्षे! वेळीच सुधारावं म्हणजे झालं. वेळ गेली म्हणजे येत नसते. व्याज काय थांबून रहाणार आहे! व्याजाचा घोडा चालतच राहणार की नाहीं?"

कुळाला ही गोष्ट ताबडतोब पटावी. व्याजाच्या घोड्याच्या भरधांव टापेखाली आजवर किती तरी लोक चिरडले गेले आहेत, याची व तो स्वतः त्याच्या टांचेखाली यावेळी उभा आहे याची त्याला पूर्ण जाणीव होती. शेटजींचे म्हणणे योग्य आहे असे त्याला वाटे किंवा ते कबूल केल्यावांचून गत्यंतर नाही असे दिसून आल्यामुळे असो, पण अखेरीस शेटजींचाच विजय होत असे.

विजयोत्सवात आक्रमणप्रेरणा नसती तर कदाचित जगाची ठेवण निराळ्याच प्रकारची झाली असती. शेटजींना गावांतील सर्वोच्च प्रतिष्ठा मिळविण्याची लालसा उत्पन्न झाली होती. पण गावांतील तीन्ही जुनी घराणी व गावचे इनामदार यांचा स्नेहसंबंध इतका सलोख्याचा आणि दमदार असे की त्यांच्या बाबतीत हात घालण्याचा यत्किंचित् कोणाला जरी संशय आला तरी हात पोळेल ही भीति त्याला पडली होती. वरपागी सर्वांशी आनंदी सलोखा त्यांनी ठेविला होता, पण त्यांनी त्यांचे एक वर्म जाणले होते. ही जुनी घराणी पूर्वापार मातबर व गर्भश्रीमंत म्हणून प्रतिष्ठित असल्यामुळे खर्चाला यांचा हात मोकळा असे हें त्याला ठाऊक होते. केव्हा तरी हे मजकडे कर्ज मागायला येणार आहेत ही त्यांनी आपल्या मनाशी अटकळ बांधून ठेविली होती. त्यांच्या घरातल्या मुलामुलींची लग्नं शेटजींच्या डोळ्यासमोर दिसूं लागलीं. सहज प्रश्न निघाला तरी "घेऊन जा बघता येईल" अशी गोड भाषा शेटजी बोलत असत. एतावता कालांतराने पाटलाची इस्टेट त्यांच्या कर्जांत अडकली, देशपांड्यावरही बरेच कर्ज झाले व देशमुखही हळू हळू त्याच मार्गाला लागले. शेटचा हर्ष वाढूं लागला. पाटलाच्या गावच्या मालकीहिस्शाचें "लहान गहाण" न करिता किम्तबंदी करण्याबद्दलचें बोलणें तात्यासाहेबाच्याकडून करविण्यात आलें होतें. कारण शेटजी सर्वांत विशेष तात्यासाहेबास वचकत असत. तात्यासाहेबाची ही पुण्याई मोठी जबरदस्त असे. त्याच्यापुढे कोणीही आला तरी त्याच्यावर त्यांनी आपली भेदकदृष्टी एकवार रोखली की त्या वेळी तरी तो मनुष्य त्यांच्या दृष्टीला दृष्टि भिडवूं शकत नसे. सरकारी अधिकारी सुद्धा तात्यासाहेबाचा एक प्रकारचा आदरयुक्त अभिमान बाळगत असत. मोतीचंद शेटनी यावेळी निराळीच युक्ति योजली. नाना प्रकारच्या खोट्या-

नाव्या गोष्टी आपल्या गोड वाणीनें सांगून त्यांनां तात्यासाहेबांसारख्या पाचपेंच नसलेल्या साध्या मनुष्याचें मन बाकीच्या दोघांच्याबद्दल कलुषित केलें. तात्यासाहेब रस्त्यावरून जाताना दिसलेच की विडा घेण्यास शेटनीं त्याना हाक मारलीच. तात्यासाहेब फार विडा खात नसत हें जाणून अलीकडे त्यांनी गादीवर त्यांच्यासमोर सुंदर चिकण्या सुपारीचा एक ढीग, मुठभर भरीव वेलदोडे आणि मूठभर लवंगा ह्या तात्यासाहेबांच्या आवडत्या वस्तू ठेवण्याचा परिपाठ ठेविला होता. व तो सज्जन पुरुषही त्यांतील नाविन्य अगर वैशिष्ट्य ध्यानांत न घेतां त्या ढिगाचा फडशा उडवीत होता. तात्यासाहेब स्वतःप्रमाणेंच शेटजींनाही दिलदार समजत असले पाहिजेत ! असो. लवकर मात्रा लागू होऊन शेटजींच्या अपेक्षेप्रमाणें पाटल्यांच्या इष्टेष्टीसंबंधानें घडून शेटजी गांवचे एक तृतीयांश मालक झाले. त्याच रात्रीं राणोजीराव पाटलांना ताप भरला व त्यांतच नवज्वरानें त्यांचें देहावसान झालें ! !



# प्रकरण ८ वें



अण्णाच्या घरून आल्यावर सूर्यभान आपल्या खोलींत येऊन बिछान्यावर पडला. थोड्या वेळानें "हसनबापू, पहांटेला गर्गाचार्यांच्या मुहूर्तावर मी देवगांवाला जाणार आहे गाडी तयार ठेव" असा उदेभानरावांचा हुकूम त्याच्या कानावर आला. हसननें "बरें आहे" म्हटलें व वाड्यांत सामसूम झालें. सूर्यभानराव विचारांच्या तंद्रीतच बिछान्यावर डोळे मिटून पडला होता. तारा खालीच गिरिजाबाईजवळ झोंपली होती. गिरिजाबाईचाही डोळा लागल्यामुळें त्या तिला जागें करूं शकल्या नाहींत. तारा जवळ नसल्यामुळें सूर्यभानरावाला आज बरेंच वाटलें असावें. आपली मनःस्थिती कुणाच्याही ध्यानांत येऊं नये अशी त्याची इच्छा होती. हळुहळू विचारमग्न स्थितींतच खिडकींतून येणाऱ्या गार वाऱ्यामुळें त्याचा डोळा लागला.

इकडे हसननें आपली पथारी घातली, एकवार घोडीकडे जाऊन आला. तिच्या पायाखालची बिछाली त्यानें व्यवस्थित केली. चारा घातला. बालडीभर पाणी दाखविलें व " निज आता बेटा " असें म्हणून तिच्या मानेवर व पुठ्यावर थाप मारली. घोडीनेंही, त्याचा आशय समजला म्हणून किंवा काय एक हलकासा फुरफुराट केला. " जीते रहो " असें म्हणून हसन आपल्या घरात येऊन वळकटीवर बसला. अण्णाच्या घरून निघाल्यावर वाटेंत सूर्यभानराव त्याच्याशीं एक अक्षर देखील बोलले नाहींत. अंधार होता व तो कंदील घेऊन पुढें चालत असल्यामुळें त्यांच्या चेहऱ्यावरचे विकारही त्याला न्याहाळतां आले नाहींत तरी पण आपल्या छोट्या मालकाच्या अंतःकरणांत कसले तरी विचारांचें, चिंतेचें काहूर माजलें आहे असा अंदाज त्यानें केला. हसन म्हणजे त्या घरातला वडील माणसाप्रमाणे मान देण्यांत येत असलेला नोकर. खुद्द राणोजीराव त्याला भावाप्रमाणे मानत असत. त्याला पगार केवळ नावाखातर होता. त्याचें खाणेंपिणें कपडेलत्ते पाटलांच्या येथूनच पुरविले जात असे. वाड्याच्या दरवाज्याजवळील जुन्या हत्तीखान्याची जागा व्यवस्थित करून त्याला रहावयास दिली होती. हसनही या

घरण्याचा एकनिष्ठ भक्त होता. त्याचें वय साठीच्या पुढें होतें तरी तो अजून वाकला नव्हता. दाढी वगळली तर त्याचा चेहरा आणि अंगलट जवळ जवळ राणोजीरावाच्या सारखी होती. राणोजीरावाच्या वडिलांना मरताना "हसनला तूं आपल्या भावाप्रमाणें वागीव" असें त्याना सांगितलें होतें व त्याचप्रमाणें थोरल्या पाटलांनी व त्याच्या घरच्या सर्व मंडळींनी हसनला वागविलें होतें. हसन खरोखर कोण होता हें हसनशिवाय आज कोणालाहि ठाऊक नव्हतें. व कोणी त्याबद्दल माहिती करून घेण्याबद्दल प्रयत्नही केला नाही. त्याचें तादृश कारणही नव्हतें. पिढीजात नोकरी ही एक आमच्या खेड्यापाड्यातून अभिमानाची गोष्ट समजली जाई व मालकालाही तें एक मोठें भूषण वाटत असे. हसनची जात, कुळ विचारात न येता पाटलांनी याच भावनेनें त्याची बरदास्त ठेविली होती. हसनचा त्या घराण्यावरील लोभ अपूर्व असे. आज घरात असलेलीं सगळीं मुलेंबाळें त्याच्या आंगा-खांद्यावर खेळलेलीं होतीं इतकेंच नव्हे तर राणोजीरावापेक्षाहि तो सात आठ वर्षांनी वडील असल्यामुळें थोडा वेळ त्यानाही त्यानें खेळविलें होतें. लेकीबाळी त्याला बापूजी म्हणत असत आणि मुलें त्याला 'हसन बापू' अगर नुसतें 'बापू' या नावानें हाक मारीत असत.

हसन वळकटीवर बसला. आज धाकटा पाटील—नेहमीचा त्याचा आनंदी पाटील असा—मलूल का याचा त्याला अंदाज होईना. तो सदा सर्वदा आपल्या कामात असायचा. त्याला कुणी काम सांगावें लागत नसे. मालकाप्रमाणेंच स्वतःच काम पारखून असेल तें सारें काम तो उरकून घेत असे व हाक मारली तेव्हा पडेल तें काम करावयास तयार असे. शेतीवर बहुधा तो फिरकत नसे. क्वचित शेतीवरील खळ्यातून बैल वगैरे आणावयाचें झाल्यास केवळ तो तिकडे जात असे. तेव्हा पाटलांच्या घराण्यावर उगवलेल्या प्रस्तुत परिस्थितीची कल्पना त्याला नव्हती. पाटलाचा हिस्सा सावकारांच्या घरात गेला. त्यावेळीं मात्र त्याला फार दुःख झालें होतें. पण मालकाच्या शुश्रूषेत रात्रंदिवस राहिल्यामुळें तो जरासा बेभान झाला होता. पाटलाचा काळ झाल्यानंतर हसनला अतिशय दुःख झालें. पाटलांनी हाय खाल्ली अशीच त्याची समजूत झाली व त्या दिवसापासून मोतीचंदावर त्याचा एवढा राग झाला कीं त्यानें त्याचें तोंड पहाण्याचें टाळावें म्हणून त्यानें

त्याच्या दुकानासमोरील रस्ता वर्ज केला. रस्त्यात कधीं शेटजी भेटले तर त्यानें तोंड फिरवावें. त्या दिवसापासून त्यानें त्याला "जयगोपाळ" केला नाहीं. चाणाक्ष शेटजी हें जाणून होता व त्याचें उट्टें काढण्या करिताच त्यानें पाटलांना हल्लीप्रमाणें धारेवर धरलें होतें. याची जाणीव मात्र बिचाऱ्या हसनला नव्हती.

आज त्याचा धाकटा पाटील बेचैन आहे, हें पाहून त्यालाही दुःख झालें. झोंपावयाला जातांना एकवार घोडीकडे येऊन गेल्यावांचून सूर्यभान कधींही राहिला नाहीं आणि आज त्याला तिची आठवणही नाहीं, यावरून त्याच्या हृदयाच्या व्यथेची त्याला कल्पना झाली. तो विचार करीत बिछान्यावर बसला. एकवार त्याला वाटलें सूर्यभानाच्या खोलींत जाऊन त्याचे हातपाय डोकें दाबून यावें व त्याला गाणीं गाऊन झोंपवावें. पुन्हां वाटे झोंप लागली असल्यास विनाकारण आपल्या जाण्यानें त्याची झोंप-मोड होईल. थोड्या वेळानें तो आपल्या बिछान्यावरून उठला. त्याच्यानें राहवलें नाहीं. वाड्यांत सामसूम होती. सूर्यभानाच्या खोलीकडे हसन जाऊं लागला. व पायऱ्या चढून खोलीच्या दाराशीं आला. दार लावलेलें होतें, पण आतून कडी नव्हती. त्यानें हळूच दार किलकिलें केलें. सूर्यभान झोंपला होता. दिव्याचा मंद प्रकाश त्याच्या चेहऱ्यावर अर्धवट पडला होता. यावेळीं सूर्यभान एकटाच आहे किंवा काय ही कल्पनाच त्याच्या डोक्यांत आली नाहीं. त्यानें हळूंच दार उघडलें व तो आंत गेला. तो एकटाच आहे हें पाहून पूर्ण जाणीवेनें जें वाटावयास पाहिजे तसें हायसेंही त्याला अर्थात् वाटलें नाहीं. हसननें दिवा मोठा केला. हळूंच पाऊल न वाजविता त्यानें त्याच्या डोक्यावर हात ठेऊन हळुहळू कुरवाळलें. जणूं काय माता आपल्या लाडक्याला कुरवाळीत आहे असा त्याचा हलका हात त्याच्या डोक्यावरून फिरत होता. सूर्यभान झोंपेंत गुंग होता. पण त्याच्या चेहऱ्यावर त्याचें नेहमींचें समाधानाचें मृदु हास्य नव्हतें. त्याच्या डोळ्या-तून निघून वहात असलेल्या अश्रूंचा ओघळ तिथें स्पष्ट दिसत होता. इतकेंच नव्हे तर गालांवर त्याच्या शीतोष्ण श्वासांनीं थबकवून ठेवलेला व अर्धवट वाळत चाललेला असा एक अश्रुबिंदु चमकत होता. हसनचें हृदय

विव्हळ झालें. त्याचे डोकें आपल्या मांडीवर घेऊन त्याचे अश्रू पुसून काढावे असें त्याला वाटलें. तो सरसावला. पण झोंपमोड होईल ही कल्पना चटकन् त्याच्या मनांत आली. त्यानें आपल्या धोतराचा सोगा सोडला व हळूच त्याच्या गालांवरील तो बिंदु त्यानें पुसून काढला. वारा येत होता तरी त्या सोग्यानेंच वारा घालीत तो पलंगावर बसला. त्याचा पाय तेथून हलेनाच. रात्र बरीच झाली होती. सूर्यभान मधून मधून दचकत असला तरी तो गाढ झोंपेतच होता. आतां तो उताणा होता तो डाव्या कुशीवर वळला. हसननें खुंटीवरून त्याचें पातळसें उपरणें घेतलें व बेतानें गळ्यापर्यंत त्याच्या अंगावर घालून त्याला एकदां पुन्हां कुरवाळलें व तो परत जावयास निघाला. दिवा त्यानें पूर्ववत् केला व हळूच दार लावून घेऊन, चोर पावलानेंच तो जिना उतरूं लागला. जिन्यांत अंधार होता. पण त्याला खालून कोणी तरी वर येत असल्याचा भास झाला. त्यानेंच प्रथम "कोण आहे?" असें त्या एकदम घाबरून थबकलेल्या व्यक्तीला विचारिलें.

"मी आहे बापूजी!" तारेनें हळूंच उत्तर दिलें.

"आता खालीच झोंपाजा. त्यांना गाढ झोंप लागली आहे. झोंपमोड होईल त्यांची. मोठी पाटलीण कुटं आहे?"

"त्या झोंपल्या आहेत मागील ओसरीवर. मलाही तिथंच त्याच्याजवळ पडल्यापडल्या झोंप लागली. त्यांना आता जाग आला नि त्यांनीं मला उठविलं"

"बरं आहे मग जा तर तिथंच झोंपा त्यांच्याजवळ आजच्या दिवस. पाणीबिणी तरी ठेवलं आहे कीं नाही वर खोलींत? नसलं ठेवलं तर हळूच गडवा पेला नेऊन ठेवा तिथं."

"ठेवलं आहे पाणी नेऊन घरी यायच्या पूर्वीच" तारेनें अस्फुष्ट उत्तर दिलें.

तारा आणि हसन खालीं आले व ते दोघे मागील ओसरीवर गेले. हसननें त्याच्या मोठ्या पाटलिणीला हांक मारून तारेला आपल्याजवळ झोंपविण्यास सांगितलें.

"बापूजी! आज तुम्ही कुणी कडं इकडं यावेळीं. रात्र फार झाली. झोंप लागली नाहीं वाटतं?" गिरिजाबाईनीं विचारिलें.

"मला यायला मज्जाव आहे वाटतं नव्या पाटलीणीच्या आमदानीत! मी या घरातलाच माणूस आहे बाळ?"

"आम्ही असं म्हटलं का कधीं तुम्हांला? तुम्ही आपणाला मुसलमान म्हणवीत असला तरी तुमचं नांवच फक्त तसं आहे असं आम्हांला ठाऊक का नाही? थोरल्या पाटलांच्या मागं तुम्हींच वडील आहात आम्हांला? असा का बरं प्रश्न केलात आपण बापूजी?" गिरिजेच्या डोळ्याना ताबडतोब पाणी आलं. हसनला वाटलं कुठून हा आपण विनोद केला.

"मी उगीच गमतीनं बोललों बाळ! मी मुसलमान असो कीं हिंदु असो, मी तुमचा आहें, मराठा आहें. माझीं मुलंबाळं मायबाप, गणगोत, इहपरलोक, सारं तुम्हींच आहात. मी आतां फार दिवसांचा धनी नाहीं. पाटील गेले. तुम्ही सारे सुखानं नांदा आणि आपल्या हातानं माझं बरं करा म्हणजे झालं." हसनचे डोळे पाण्यानें भरून आले. मुलीही रडूं लागल्या.

बराच वेळपर्यंत कोणीही बोलले नाहीं. प्रत्येक जण दुःखमग्न स्थितींत अश्रुपात करीत होतें. हसनच्या समोर तर सारें ब्रह्मांड उभे राहिलें होतें. का तें कोणास ठाऊक. त्याच्या मनांत गतकालाच्या हजारों गोष्टी सारख्या येऊं जाऊं लागून त्याला एकसारख्या दुःखी करीत होत्या.

"निजा आता बाळ! रात्र फार झाली आहे" असें सागून हसन तेथून निघाला. गिरिजाबाई व तारा बिछान्यावर पडल्या व लवकरच त्यांना झोंप लागली.

हसन आपल्या घरीं परत आला व बिछान्यावर बसला. आज त्याला झोंप येत नव्हती. कसली तरी दारुण व्यथा त्याला आंतून भाजून काढीत होती. असल्या परिस्थितींत त्याच्या जिवाचा आवडता विरंगुळा म्हणजे त्याची एकतारी आणि त्याच्या चिपळ्या. हसन वरपांगी कोणत्याही देवाची पूजा करीत नसला तरी त्याच्या खोलींत एका लहानशा कोनाड्यांत पांडुरंगाची एक सुंदर तसबीर ठेवलेली कोणालाही प्रामुख्यानें दिसत असे. हसन स्नान केल्यावांचून कधींही जेवीत नसे इतकेंच नव्हे तर त्यानें आजन्मांत मांसाशन केलें नव्हतें. पाटलांचें सर्व घराणें मराठा ज्ञातीचें असलें तरी निर्मांसभोजी होतें. एकदां देवीच्या एका जत्रेला राणोजीरावांचे वडील गेले असतांना तेथें चाललेल्या बोकडांच्या कत्तलीनें आणि

तेथें सर्वत्र वहात असलेल्या रक्तप्रवाहानें त्या सात्त्विक मनाच्या पुरुषाला अत्यंत शिसारी आली व तेव्हांपासून घरांत बकरा वर्ज झाला असल्याचें सांगतात. शुद्धाचरणानें आणि नियमित व्यायाम आणि आहारविहारानें उत्कृष्ट शक्तिमान् होता येतें; अशी शिकवण त्या घराण्याला होती. हसनही त्याचप्रमाणें वागत असे. तो कुठेंही भोजनास जात नसे. तात्पर्य उत्कृष्ट हिंदु ज्याप्रमाणें आचरण ठेवील त्याप्रमाणें तो वागत असे. त्याचा विठोबा त्याचें सर्वस्व होतें. एखाद्या वारकऱ्याप्रमाणें तो तल्लीन होऊन त्या तसबिरीपुढें नित्य भजन करीत असे. तो जरी र, ट, फ करीत वाचूं शकत होता तरी वाचनावाचूनच त्याला शेंकडो अभंग पाठ येत असत.

आतां त्यानें आपली एकतारी आणि चिपळ्या हातात घेतल्या. पाडुरंगाच्या तसबिरीसमोर तो बसला आणि उच्च स्वरांत त्यानें अभंग म्हणावयाला आरंभ केला:—

“ कांहीं पडतां जड भारी । दासीं आठवावा हरी ॥ १ ॥
मग तो होऊं नेदी शीण । आड घाली सुदर्शन ॥ २ ॥ ”

हसनचा आवाज चांगला होता. ‘ मग तो होऊं नेदी शीण ’ हा चरण तो सारखा घोळ घोळून आलाप घेत होता. रात्रीचा तिसरा प्रहर उलटून गेला होता. त्या प्रशांत सुंदर पवित्र वेळीं हसनच्या त्या अभंगानें आसमंतात तोच प्रतिध्वनि उठूं लागला होता. खालीं गंगेला ते बोल मंदमंद समीरण हळूहळू ऐकवीत होता. त्या आनंदात तिच्या हृदयाचें स्पंदन होत होतें. आकाशात चंद्रमा हसत होता. तारका नाचत होत्या. सप्तर्षि जागच्याजागीं थबकले होते. सती अरुंधती श्रीवसिष्ठाना “ आपल्या योगवासिष्ठात ही मौज आहे काय ? ” असें विनोदानें विचारीत होती. समाधी मंदिरात व साऱ्या गर्दीत तो अभंग सारखा दुमदुमत होता.

सूर्यभानराव आता जागा होऊन खिडकींत येऊन हसनचा तो गोड अभंग ऐकत उभा होता. त्याच्या पूर्वीच्या चिंतामग्न चेहऱ्यावर या वेळीं मधुर मोहित हास्य विलसत होतें. “ कांहीं पडता जड भारी । दासीं आठवावा हरी । मग तो होऊं नेदी शीण । आड घाली सुदर्शन ” सूर्यभानराव त्या अभंगाला अपरिचित नव्हता. नामसप्ताहात अण्णाच्या बरोबर गावच्या मारोतीच्या देवळात तो बहुधा प्रतिवर्षी सामील होत

असे. हसनही तो अभंग नेहमीच म्हणावयाचा पण आज त्या अभगानें त्याच्या हृदयाला निराळीच संवेदना उत्पन्न केली. याच वेळीं त्याला अण्णानें सांगितलेल्या " उपासनेचा मोठा आश्रयो, उपासनेवीण निराश्रयो " या समर्थांच्या त्याच लक्षणार्थांच्या वचनाची आठवण झाली. त्याचे अंग थरारलें. भक्तीच्या भाग्याचा अनुभव त्या ईश्वरभक्त मातापितरांच्या पोटीं उत्पन्न झालेल्या युवकाच्या अंतःकरणांत झणझणून गेला. तो स्तिमित होत्साता खिडकीच्या कठड्यावर हात टेंकून एका ठेवणींत उभा होता. हसनचेंही एकच पालूपद चालू होतें. तोही यावेळीं खूप रंगला होता. " मग तो होऊं नेदी शीण । आड घाली सुदर्शन " थोड्या वेळात पक्षांनी प्रभाती आळवायला प्रारंभ केला. आता तर हसनला भारी स्फुरण आल्यासारखे दिसलें. मुलीही बिछान्यावर उठून बसल्या व तें सुंदर गीत ऐकूं लागल्या. उदेभानरावही जागे झाले. हसनचें भजन चालूच होतें. " मग तो होऊं नेदी शीण । आड घाली सुदर्शन " तबेल्यांत बिजली फुरफुरली. हसन भानावर आला. 'जीते रहो' हा आवाज त्याच्या तोंडातून व खिडकीत उभा असलेल्या सूर्यभानरावाच्या तोंडांतून एकसमयावत्सत निघाला. हसनने एकतारी गुंडाळली. चिपळ्या ठेवल्या. पथारी लपेटली व तो खोलीच्या बाहेर पडला. उदेभानराव प्रातर्विधीला जावयास निघाले होते ते त्याच्या दाराशीच उभे होते. " बापू तयारी आहेना? " हसननें " होय " म्हटल्यानंतर पाटील निघून गेले. हसन घोडीच्या तबेल्याकडे वळला. घोडीला खरारा केला व नंतर गाडीची व्यवस्था करावयाला तो बैलांच्याकडे गेला. मुली कामाला लागल्या. सूर्यभान मात्र आपल्या खिडकीत तसाच उभा होता.



# प्रकरण ९ वें

आठ पंधरा दिवस झाले. उदेभानराव या गावचे त्या गावीं, या सावकाराकडून त्या सावकाराकडे सारखे फिरत होते. नानासाहेबही सारखी खटपट करीतच होते. त्यांच्यापुढें मोतीचंदाच्या नोटीशीचा व त्याच्या दावा लावण्याच्या धमकीचा विषय होता. कसेंही करून चालू हंगामापर्यंत मोतीचंदानें वाट पहावी याबद्दल त्याची खटपट होती. त्याच्या म्हणण्याला मोतीचंद मान देईल असें त्यांचें मन त्यांना ग्वाही देत नव्हते. काय करावें या विवंचनेंत ते असतां एके दिवशी सायंकाळीं महारुद्रेश्वराच्या देवालयात पारावर तात्यासाहेब देशमुख एकटेच बसलेले त्यांना दिसले. जवळजवळ तीनसांजा होण्याची ती वेळ होती व देवालयांत संध्याकाळीं दर्शनास येणाऱ्या लोकांची ये जा कमी झाली होती. तात्यासाहेब बहुधा इतका वेळ देवळांत एकटेच बसत नसत. कोणी बोलायला असले तर गोष्ट निराळी असे. तात्यासाहेबाना पहाताच नानासाहेबाना अचानक अशी कल्पना आली कीं पाटलाच्या बाबतींत मोतीचंदाला दोन गोष्टी सांगण्याकरितां तात्यासाहेबांना विचारून पहावें. तात्यासाहेबाचें मन त्यांच्याबद्दल हल्लीं ऋजू नव्हतें हें त्याना ठाऊक होतें. तथापि तात्यासाहेबांचा दिलदार स्वभावही त्याना पूर्णपणें ठाऊक होता. शिवाय ते दोघेही बालमित्र असल्यामुळें थोडें मोकळें बोलायलाही हरकत नव्हती. नानासाहेब देवदर्शन करून तात्यासाहेबांच्या जवळ येऊन बसले. दिवस आषाढ शुद्धाचे होते. वरती विरल मेघाच्छादित आकाश असलें तरी चंद्राचा मंद प्रकाश पडला होता. पाऊस चांगला न पडल्यामुळें उष्मा होतच होता.

"नाना, ये, आज उशीर झाला दर्शनाला यायला? कुठं दिसत नाहींस फारसा आताशा?" तात्यासाहेबांनीं सामोपचारानें पण खरोखरच कळकळीनें प्रश्न केला.

"शेतावरून यायला जरा उशीर झाला. अण्णा गावीं नाहीं; म्हणून जावं लागतं शेतावर. शिवाय आजकाल थोडा निराळ्या भानगडींत

असल्यामुळें भेटीचा योग आला नाहीं. हल्लीं पैशाची मोठी अडचण— तात्या ! एक गोष्ट बोलू तुझ्याशीं ? ''

'' बोल कीं ! मी काय तुझा दुष्मन आहे ? पैशाची अडचण म्हणशील तर मलाही कांहीं तो त्रास कमी नाहीं. मी माझं कसं चालवितों देवाला ठाऊक. बाबूला पैसे पाठवायचे असतात. भयंकर अडचण होते. हा मोतीचंद देतो वेळेला म्हणून कांही बरं आहे. शेतींतून पुरा खर्चही निघत नाहीं, मग संसाराच्या खर्चाची गोष्टच नको. मेटाकुटीला आलों आहें अगदीं. माझं सारं लक्ष आता बाबूवर आहे. तो आला न् त्यानं सगळं संभाळलं म्हणजे गंगेंत घोडे न्हाले ! ''

'' घरोघरीं मातीच्याच चुली आहेत. असो. मी म्हणत होतो, एका गोष्टीत मला तुझी मदत पाहिजे—''

नानासाहेबांनीं प्रश्न केला व ते तात्यासाहेबाच्या उत्तराकरिता त्याच्याकडे दृष्टी लावून बसले. त्यांनीं आपलें उपरणें अंगावरून काढून आपल्या कंबरेभोंवतीं व समोरून दोन्ही पायांची आढी देऊन त्याभोंवतीं गुंडाळलें.

तात्यासाहेबाना हा प्रश्न अनपेक्षित वाटला. मदतीची भाषा आपणाजवळ नानासाहेब कधीं बोलतील ही त्यांना कल्पनाच नव्हती. दोघेही तुल्य प्रतिष्ठ असल्यामुळे व गावच्या हक्कदारीच्या नात्यानें प्रसंगीं एकमेकांचे प्रतिस्पर्धी होत असल्यामुळे व त्यातला प्रत्येकजण अत्यंत स्वाभिमानी असल्यामुळें कोणाच्याही तोंडून दुसऱ्याकडे मदतीची याचना करणें संभवनीय नव्हतें हे तात्यासाहेब पूर्णपणें जाणून होतें.

'' नाना ! आज माझ्याकडून मदतीची अपेक्षा तुला भासली हा मी तुझा विनोद समजूं का ? ''

'' नाहीं, मी विनोद करीत नाही तात्या ! या वेळीं विनोदाला अवसरच नाही. तुम्हीं आम्हीं नात्यागोत्याचे जिव्हाळ्याचे लोक जेव्हां एकमेकापासून मनोमय दूर राहतों व त्याचे दुष्परिणाम तिसऱ्यानेंच आपणांवर कुरघोडी केल्यावर जेव्हां कळतात तेव्हा विनोदाच्या भाषेला स्थान कुठं राहिलं ? तात्या, वतनाच्या भानगडींत जरी तुला मला प्रसंगीं प्रतिपक्षी व्हावं लागलं तरी तुझ्या उदार स्वभावाप्रमाणें तुझ्या आमच्यात आजवर कधीं द्वेष उत्पन्न झाला होता काय ? ' मी तुझा दुष्मन का आहे ? ' असें

जेव्हा तू म्हणालास तेव्हा मला केवढी धन्यता वाटली म्हणून सांगू ? खरंच सांगतों तात्या! तिसऱ्यानें आपल्यामध्यें विरोध उत्पन्न करून स्वतःचा कार्यभाग साधून आम्हांला भीक मागायला लावावं व आपण त्याच्या या कुटिल नीतीचा अर्थ समजू नये याचें मला फार वाईट वाटतें. तात्या ! तूं सरळ मनाचा साधा पुरुष आहेस. पण जगांत एवढं सीधेपण कुटिलाच्या नीतीचं आयतंच खाद्य होत असतं. पाटलाचा गांवचा हिस्सा मोतीचंदानें गिळला त्यावेळीं तूं जर मुग्ध राहिला नसतास— "

तात्यासाहेब लक्षपूर्वक ऐकत होते. त्यावेळी आपण थोडी जरब दाखविली असती तर निदान पाटलांच्या वाताहतीची ती वेळ तरी खात्रीनें टळली असती असें त्याना वाटलें. राणोजीरावांना त्याच रात्रीं ताप भरून त्याच दुखण्यात त्याचा अंत झाला ही घटना त्याच्या डोळ्यांपुढें लखख उभी राहिली. आपण मुद्दाम पाटलाचें वाईट केलें नाही हे त्याचें सीधे मन त्यांना सागत होतें. पण आपण त्यावेळीं त्यांची परिस्थिति वाचविण्याचा प्रयत्न केला नाहीं ही गोष्ट आज त्याच्या मनाला जाचली. तात्पुरता मोतीचंदाच्या आगलावेपणाचा त्याना रागही आला. 'एवढाही मोठा झाला तरी त्याला गावांतून हांकून लावीन' अशी करारी भाषा त्यांच्या ओंठापर्यंत येऊन गेली.

थोडा वेळ शात राहून संभाषण सुरू करण्याच्या इराद्यानें तात्यासाहेबांनीं नानासाहेबांस विचारलें,

"मी काय करावें अशी तुझी मनीषा आहे? गेल्या गोष्टी जाऊं दे. प्रथम तुला काय पाहिजे तें साग !"

"मोतीचंदाला दोन गोष्टी सागावयाच्या आहेत. त्याने उदेभानाला पैशाबद्दल फार निकड लावली आहे. पाटलाची स्थिति तूं जाणतोसच. हल्लीं त्याच्या हातीं मुळींच पैसा नाहीं. त्याकरितां उदेभान सारखा वणवण हिंडतो आहे. राणोजीरावांच्या पोरांची म्हणजे आपल्या मित्राच्या मुलांची आपण काळजी घेतली नाही तर त्या पोरांनी कोणाच्या तोंडाकडे पहावें ? ज्याचा तो कसं तरी संभाळूनच घेत असतो. पण पाटलांच्या मृत्यूमुळं व एकदम आलेल्या पैशाच्या सकटामुळं तो हल्लीं फार भांबावून गेला आहे. कसला

उमदा छोकरा, पण अगदी काळवंडून गेला आहे! बघितला नसशील तूं त्याला इतक्यांत ?"

एकाएकीं मनांत झालेल्या परिवर्तनामुळें पाटलांच्याकडे तात्यासाहेब मुळी फिरकलेच नव्हते इतकेंच नव्हे तर उदेभान कधीं भेटायचा तोही योगायोगानें गांवोगांव फिरत असल्यामुळें भेटीच्या अभावीं पाटलांच्या घराला ते जवळ जवळ विसरल्यासारखेच झाले होते. राणोजीराव असतांना परस्परांचे घरीं येणें जाणें असे. क्षेमकुशल होऊन एकमेकांच्या सुखदुःखा-बद्दल विचारपूस होत होती. मोतीचंदानें काय मात्रा फुंकली होती त्या मात्रेमुळें नानासाहेब व पाटील याच्या सौजन्याच्या भेटी दूरावल्या होत्या. ती मात्रा जरी अजूनही तात्यासाहेबांच्या मनावर अम्मल चालवीत होती तरी त्याचा आपल्या बाळमित्रानें सांगितल्याप्रमाणें मदत करण्याचा निश्चय कायम झाला.

"उद्या जाऊन मोतीचंदाला सांगतों कीं, हंगामापर्यंत पैशाची मागणी करूं नकोस, झालं ?" तात्यासाहेबानी निकाल केला.

"मग नोटीशीचें उत्तर पाठवूं उद्यां तुझ्याकडे ?"

"कशाला हवं उत्तर, मी जाऊन त्याचीच नोटीस फाडून टाकतों आपल्या हातानं! बिशाद काय त्याची ? पोराना छळतो म्हणजे काय ?" तात्यासाहेबांचा नेहमींचा सीधा सज्जन स्वभाव आता जागृत झाला होता. नानासाहेबांना हायसें वाटलें. त्यांच्या नेत्रांत पाणी चमकलें. ते त्यांनी चटकन् पुसून काढलें व तात्यासाहेबांचा हात धरून "चला आतां घरा-कडे" असें म्हणून ते दोघेही बाळमित्र मंदिराच्या पायऱ्या उतरूं लागले. पावसाळी ढग जे तात्पुरते जमले होते तेही आतां फांकून गेले होते व चंद्राचा प्रकाश सर्वत्र स्वच्छ पडला होता. गंगेचें पाणी निस्तब्ध होतें. वाऱ्यानें अंग चोरलें होतें. उष्मा होतच होता. समोर पाटलांची गढी दिसत होती. गढीच्या उतरणीवर एक गाडी चढत असल्यासारखा अंधुक भास होत होता.

"उदेभान आला आहे वाटतं गावाहून! आज बरेंच दिवस त्याचा पाय जाग्यावर नाही." नानासाहेब बोलले.

" आतां त्याला नको काळजी करायला. मी करतों सारी व्यवस्था." तात्यासाहेबांनी गढीकडे पहात पहातच उद्गार काढले. तात्यासाहेबांचें घर जवळ आलें. रस्ता फुटायच्या वेळी तात्यासाहेबांनीं नानासाहेबांना घरीं चलण्याबद्दल हटकलें. नानासाहेबांनीही त्यांचें म्हणणें ताबडतोत मान्य केलें. दोघेही बाळमित्र फारा दिवसांनीं एका घरीं आज आले होते. या दोघांना पाहून नोकरचाकर व घरांतील सर्व मंडळींना मोठें कौतुक वाटलें. त्यांतल्या त्यांत चौकांत दोघेही जाऊन सावित्रीबाईनीं आणलेल्या पाटांवर बसल्यानंतर जेव्हां खेळीमेळींची भाषणें सुरू झालीं तेव्हां तर सावित्रीबाईच्या मनांत कौतुकास्पद आनंद विलसूं लागला. चहा आतां सर्वत्र झाला होता. खेड्यापाड्यांतूनही त्यानें आपलें साम्राज्य स्थापलें होतें. त्यांतून वयस्कांची तर त्याच्यावर बहाल भक्ति होती. थोड्या अवकाशांत सावित्रीबाईनी चहाचे प्याले आणून दोघांच्या पुढं ठेवले.

" आज ही नरनारायणांची जोडी कशी जमली एका ठिकाणीं ? एरवीं बद्रिकाश्रमाला गेल्यावाचून दर्शन व्हायचं नाहीं म्हणून म्हणतें !"

" या देशपांडे मंडळींना केवढी आढ्यता, पण कांही झालं तरी आमचा वरपक्ष कांही त्याना नाकारतां येणार नाही. आज म्हणाल तर देवानंच मध्यस्थी केली. देवळांत गांठी पडल्या, मी बोलावलं, हा आला झालं !"

" ताई ! लग्नाला इतकीं तपं झालीं तरी वरपक्षाच्या भावनेची ही आढ्यता बघितलीस ना ? आहे कीं नाहीं देशमुखी प्रतिष्ठा ? कशाला या असल्या घरीं वारंवार !" नानासाहेब हांसत हांसत बोलले.

" अनुवहिनी नाहीत म्हणून. नाहीं तर तुमचा वरपक्ष अमान्य झाला असता वाटतं ? ह्या ऋणानुबंधाच्या गांठी आहेत. सोय जाणेल तो सोयरा. यांत कसला आला आहे लहानमोठेपणा ?"

" माहेरच्या घराण्याची मोठी वकीली चालविली आहे बुवा." तात्यासाहेबांनी चहाचा कप खालीं ठेवीत हांसत म्हटलें. " आतां विसरा म्हणा देशमुखांच्या मुली !" पानसुपारीचा डबा उघडून दोघेही आपापल्या आवडीप्रमाणें पानसुपारी खावयाला लागले. बराच वेळ त्यांचें भाषण आनंदानें व मोकळेपणानें चाललें होतें. विशेष विषय असा त्यांत कोण-

ताच नव्हता. त्यांतल्या त्यांत बोलतां बोलतां सावित्रीबाईंनी "अण्णाचं लग्न करतां आहांत ना या वर्षी" म्हणून नानासाहेबांना विचारिलें.

"येत आहेत बऱ्याच मुली सांगून. ब्रह्मसूत्र असेल त्याप्रमाणें होईल. आपण कशाला उगीच काळजी करायची?"

"घरांत सवाष्ण नाहीं. करून टाका लग्न लवकर. अनुवहिनी असत्या तर त्यांनीं नसतं ठेवलं त्याचं लग्न इतके दिवस."

अनसूयाबाईंची आठवण येऊन सर्वांनाच वाईट वाटलं. नानासाहेबांना तर ती आठवण फारच जाणवली. पत्नी आणि थोरला मुलगा एकसमायावत्सत काळाच्या भक्षस्थानीं पडल्याची आठवण कशी बुजणार? "ईश्वरेच्छा बलीयसी!" एवढेच उद्गार त्यांनी काढले व एक लांब सुस्कारा सोडला. त्यांनी नानासाहेबांची व सावित्रीबाईंची परवानगी घेतली व घरीं जायला निघाले. देशमुखांचा गडी गणोबा कंदील घेऊन उभा होता तो त्याच्यापुढें चालूं लागला. त्याच्यामागून नानासाहेब जड पावलांनी वाट चालत होते. थोड्या वेळापूर्वीचा त्यांच्या चेहऱ्यावरील आनंद मावळला होता.



# प्रकरण १० वें



शिवराव आज बराच धांदलींत होता. अलीकडे त्याला केव्हाही बघा सारखा गर्दीत असल्यासारखाच तो दिसत असे. आज तो आपल्या खोलीत पहांटेपासून सारखा लिहित बसला होता. भानू एका आरामखुर्चीवर जवळच एक पुस्तक वाचीत पडला होता. अण्णाच्या टेबलावर कागदाचे ढीग, कांहीं पुस्तकें व इतर लिहिण्याचें सामान साधारण अव्यस्थित स्थितींतच पडलें होतें. अण्णाची खोली एखाद्या संस्कारक्षम विद्याव्यासंगी पुरुषाला साजेल अशीच होती. तिचें वर्णनच करावयाचें झालें तर ती एक दोन विद्यार्थ्यांच्या बोर्डिंगरूमच्या आकाराची फार लहान नव्हे तर फार मोठी नव्हे अशी एक आटोपशीर जागा होती. तिला आतून मंद निळसर रंग दिला होता. व वरती स्वच्छ कापडाचें पांढरें छत दिलें होतें. तिच्या दोन बाजूला रस्ता असून दुसऱ्या दोन बाजू घराच्या आंगणांत होत्या. त्या दोन बाजूला एक लहानशी फुलबाग त्यानें लाविली होती व त्याची निगा तो स्वतः राखीत असे. घरच्या देवाकरिता त्यापासून भरपूर विविध प्रकारचीं फुलें प्रत्यही निघत असत. खोलींत छताला लागून थोड्या थोड्या अंतरावर तसबिरी व्यवस्थेनें लाविल्या होत्या. त्यांत हिंदुस्थानांतील नामांकित देशभक्तांच्या, साधुसंतांच्या व रामकृष्णादि अवतारांच्या सुशोभित तसबिरी होत्या. फोटो फारसे नव्हतेच. त्याच्या टेबलासमोर मध्यभागीं श्रीदत्तात्रेयांचा फोटो लावला असून त्याच्या दोन्ही बाजूला त्याच्या वडील मातुश्रींचे फोटो होते. बाजूच्या खिडक्यांवरून एक त्याच्या स्वर्गत बंधूंची व त्यांच्या पत्नीची तसबीर व दुसरी पाटलांच्या घराण्यातील मंडळींचा फयामिलीग्रूप एवढ्या दोनच तसबिरी होत्या. खोलींत एक साधा पलंग, लिहिण्याचें टेबल, दोनतीन साध्या व दोन आराम खुर्च्या होत्या. याशिवाय पुस्तकांचीं दोन कपाटें-एक इंग्रजी पुस्तकांकरितां व एक मराठी पुस्तकांकरितां—व्यवस्थेनें ठेविलेलीं होतीं. त्यात ज्ञानेश्वर, तुकाराम, रामदास, मोरोपंत इत्यादि सत्कवींचे ग्रंथ असून त्याबरोबरच देशांतील—विशेषतः महाराष्ट्रांतील थोर पुरुषांचीं चरित्रें, सरदेसाई

याच्या रियासती, गीतारहस्य व इतर चांगलीं पुस्तकें होतीं. त्यांतच कांहीं संस्कृत ग्रंथ व कांहीं निवडक मराठी कादंबऱ्या व नाटकेंही होतीं. इंग्रजी पुस्तकांत निवडकनिबंधांचे ग्रंथ विवेकानंद व रामतीर्थांचीं चरित्रें व भाषणें, इंडियन वर्दीज, मॉडर्न रिव्ह्यूचे व्हॉल्यूम्स, डेनमार्क शेती आणि गोरक्षण व गोसंवर्धनावरील व इतर कृषिविषयक पुस्तकें व क्रॉस्थवेटकृत सहकारी पतपेढ्यांवरील नामांकित ग्रंथ प्रामुख्यानें दिसत होते. केसरीची फाईल फार काळजीपूर्वक लाविली असून महाराष्ट्राचीही फाईल त्याच्या शेजारीच लटकत होती. विविधज्ञानविस्तार, चित्रमयजगत् व मासिक मनोरंजक हीं त्याचीं आवडतीं मासिकें होतीं. नुकत्याच प्रसिद्ध झालेल्या 'रत्नाकर' या सुंदर मासिकालाही त्यानें आश्रय दिला होता. सूर्यभानाच्या हातांत त्या मासिकाचाच नवा अंक होता. एकंदरीत त्याच्या छोट्याशा ग्रंथसंग्रहाची निवड मार्मिक असून मनोहर होती. त्यानें तें सारें वाङ्मय मोठ्या हौसेनें वाचलें होतें. कॉलेजांत असतानाच त्याला हा नाद लागला होता. टिळकआगरकरांच्या कॉलेजमधील ध्येयवादी गोष्टींनीं त्याचें मन आकर्षण केलें होतें. त्यांच्या आशीर्वादानें आपल्या हातूनही कांहीं देश-सेवा व्हावी ही त्याच्या अंतःकरणाला तळमळ लागली होती. आपल्या एक दोन कॉलेज मित्राबरोबर त्याचें याबद्दल नेहमीं संभाषण होत असे. त्याचें लक्ष प्रथम आपल्या खेड्याची सुधारणा कशी करतां येईल या गोष्टीकडेच लागलें. खेडयांची अकथनीय दुरवस्था त्याच्या प्रत्यक्ष परिचयाची होती. अनेक कारणामुळें खेडीं रोडावत जाऊन तेथल्या लोकांची भरती शहरांतल्या गेंगट हवेंत झाली होती. अगदीं अवश्यच म्हणून राहिलेल्या कांहीं घरा-खेरीज खेड्यांतील बाकीचे लोक वाट फुटेल तिकडे निघून जात असलेले त्याला दिसत होते. त्यांतच खेड्यापाड्यातून बलिष्ठ कनिष्ठ अगर तुल्यबल सत्ताधाऱ्यांनीं उत्पन्न केलेल्या पक्षोपपक्षामुळें खेड्यापाड्यातून जी एक प्रकारची भीषणविघटना दृष्टीस पडे त्यामुळें तर त्याच्या जीवाला अत्यंत यातना होत. बी. ए. होऊन शेतकी आणि पतपेढी यांचें विशेष शिक्षण घेण्याचा त्याचा निर्धार झाला होता. कॉलेजांतील त्याचे सहाध्यायी ज्या-वेळीं क्रिकेट, टेनिस इत्यादि खेळांत अगर इतर ख्यालीखुशालींत दंग असत. त्यावेळीं आमचा शिवराव आपल्या पुढील दिशेला उपयोग होईल

असल्या पुस्तकांचें वाचन करीत असे. क्लासांतील अभ्यास वेळच्या वेळीं करून राहिलेला वेळ तो वरीलप्रमाणें आपल्या आवडत्या व्यवसायांत घालवीत असे. तेव्हांपासूनच त्याचा एकंदर रुबाब लोककल्याणाचें ध्येय बिंबलेल्या एखाद्या ध्येयवादी विरक्ताप्रमाणें दिसे. तो मूळचा एकेरी हाडाचा होता तरी रोज सूर्यनमस्कारांचा व्यायाम नियमानें करीत असल्यामुळें त्याच्या चेहऱ्यावर तेजाची तपस्वी ब्रह्मचाऱ्याप्रमाणें एक प्रकारची अत्यंत मोहक अशी कळा विराजमान असे. कॉलेजचे प्रोफेसर सुद्धां त्याला फार चहात असत. विद्यार्थीवर्गांत देखील तो अत्यंत प्रिय होता. खुशालचेंडू विद्यार्थी देखील त्याच्याकडे आदरयुक्त भावनेनें पहात असत.

कॉलेजला सर्वस्वी भूषणभूत असलेल्या मुलाकडे सर्वजण कौतुकानें पहात असतांना त्याच्या पुढील अभ्यासाच्या मार्गांत एक अचानक विघ्न उद्भवलें. दोन वर्षांपूर्वी आगस्ट महिन्यांत त्याच्या मातोश्रीला आणि बंधूला पटकीचा आजार झाल्याचें पत्र त्याच्या हातीं आलें. तो ताबडतोब आपल्या गांवीं आला तों त्याची प्रिय मातोश्री व अत्यंत प्रेमळ बंधू इह-लोक सोडून गेल्याचें त्याला कळलें !!

आपल्या घरच्या माणसांकरितां व गांवांतील इतर आजाऱ्यांच्याकरिता त्यानें आपल्याबरोबर बरीच पेटंट औषधें आणलीं होतीं. गांवांत कोणी चांगला वैद्य किंवा डॉक्टर नाहीं याबद्दल त्याला फार वाईट वाटलें. बंधू-च्या व मातुश्रीच्या मरणाचें दुःख गिळून त्यानें गांवांतील आजाऱ्यांची औषधोपचारानें व इतर दृष्टीनें स्वशक्तीप्रमाणें अपूर्व सेवा केली. पाणी उकळून पिणें व इतर बाजूनें आरोग्यरक्षण करणें याबद्दल त्यानें जेवढी माहिती मिळविली होती ती त्यानें घरोघर हिंडून लोकांना सांगितली. सूर्यभान त्याचा पूर्ण सहकारी होता. लोकांच्या समजुतीप्रमाणें त्यानें गांव-च्या मरिआईचीही मोठ्या थाटानें पूजा बांधली. देशमुख, देशपांडे, पाटील व गांवांतील सर्व लोक या प्रसंगीं सर्व मतभेद विसरून त्याच्या मदतीकरितां धांवले. विशेष काय पण मोतीचंदशेटनी यावेळीं लागेल तेवढी औषधी स्वतःच्या खर्चानें त्याला पुरविली. लवकरच ईश्वरदयेनें आजार नाहींसा झाला. नानासाहेबांना अर्थात् अण्णाला यापुढें नागपुरास ठेवणें अशक्य होतें. त्यालाही आपलें शिक्षण यापुढें होणें शक्य नाहीं हें

दिसतच होतें. थोड्या दिवसांनीं अण्णा आपलीं पुस्तकें आणण्यास व आपल्या सर्व प्रेमी मंडळींचा निरोप घेण्यास नागपुरास गेला. अण्णाला निरोप देण्याकरितां कॉलेजहॉलमध्यें खुद्द प्रोफेसर मंडळींनीं एक सभा बोलाविली. प्रिन्सिपॉल साहेबांनीं अण्णाची 'आदर्श विद्यार्थी' म्हणून स्तुति केली आणि सर्व प्रोफेसरांसह कॉलेजच्या एका भूषणभूत विद्यार्थ्याचा आपणांला कायमचा वियोग होतो आहे याबद्दल खेद प्रदर्शित केला.

अण्णाला त्या प्रसंगीं काय वाटलें असेल हें विस्तारानें सांगण्याची आवश्यकता नाहीं. तो जेव्हां शेवटीं आभारप्रदर्शनाला उभा राहिला त्यावेळीं त्याचा कंठ दाटून आला होता. त्याच्या डोळयांतून अश्रुपात होत होता. बोलण्याचा प्रयत्न केला तरी त्याच्या तोंडातून शब्दोच्चार होईना. त्यानें छातीशीं आपले हात गुंडाळून घेतले होते आणि त्याचा एकंदर अविर्भाव स्वामी विवेकानंदांच्या प्रमाणें दिसत होता. चेहराही गोलसर, टप्पोरे डोळे आणि त्याची नेहमींची उभे राहण्याची व बघण्याची लकबहि जवळ जवळ त्यांच्या प्रमाणेंच होती. अतीशय कष्टानें प्रयत्न करून त्यानें बोलण्याला प्रारंभ केलाः—

"परमपूज्य प्रिन्सिपॉलसाहेब आणि अध्यापक महाराज आणि माझ्या परमप्रिय साहाध्यायांनों, आपण घडवून आणलेल्या आजच्या या प्रसंगामुळें माझ्या हृदयात काय चाललें आहे व मला कोणत्या भावना प्रतीत होतात याचं वर्णन करणं या प्रसंगीं माझ्या आटोक्याबाहेरचें आहे. सेकंड इअर मधल्या एका विद्यार्थ्याला आपल्यासारख्या थोर विद्वानांनीं असल्या समारंभानें आशीर्वाद देण्याचें ठरवितांना आपणाला माझ्यांत जें काय दिसलें असेल तेंच निरंतर वाढीस लागून त्यामुळें माझ्या हातून शक्य तितकी देशसेवा व्हावी असा आपण मला आशीर्वाद दिल्यास मी कृतार्थ होईन. आपल्या या वात्सल्याचं विस्मरण मला कधीही होणार नाहीं. या प्रिय संस्थेचा व आपणांसर्वांचा निरोप मला कोणत्या निष्ठुर कारणामुळें घ्यावा लागत आहे हें आपण जाणतच आहांत. तरी मजकडून अजाणतां कोणाचा कांहीं अपराध अगर आगळीक झाली असल्यास मला सर्वत्रांनीं क्षमा करावी व मला विसरूं नये एवढेंच मी आपणां सर्वांजवळ प्रेमभावानें मागणें मागतो."

टाळ्याचा कडकडाट झाला. शिवरावानें प्रिन्सिपॉल, प्रो. केसर व विद्यार्थी गण या सर्वांना नम्रपणानें नमस्कार केला. अल्पोपहार करून रात्रीचे गाडीने तो गांवास यावयास निघाला. त्याला पोचवायला सगळें कॉलेज आले होतें म्हटलें तरी चालेल. खुद्द प्रिन्सिपॉलसाहेब देखील हजर होते.



# प्रकरण ११ वें



"सूर्यभान ! अरे घरांत चल कीं ! पावसाचे थेंब यायला लागले ना ?" उदेभानरावांनीं त्याच्या पाठीवर हात ठेवून त्याला कुरवाळीत म्हटलें. सूर्यभान यावेळीं गढीच्या दरवाज्याच्याबाहेर नदीकडे तोंड करून एका टेकाडावर बसला होता. उदेभानरावांचे शब्द ऐकतांच आपल्या तंद्रींतून तो ताबडतोब भानावर आला व उभा राहिला. यावेळीं आकाशांत काळ्या ढगांची गर्दी झाली होती. भगवान् सूर्यनारायणाचें आज दिवसभर दर्शन झालें नव्हतें तरी त्याचें अस्ताचलाकडे नुकतेंच गमन झाल्याचें दर्शविणारा विरल अंधकार आसमंतात् पसरूं लागला होता. सूर्यभानराव या सायंकाळीं तिथें किती वेळ बसून राहिला होता ! देवदर्शनाला उदेभानराव गेले त्यावेळीं तो तिथेंच बसला होता. ते परत घरीं आले, समाधीचें दर्शन त्यांनीं घेतलें व सहज दरवाज्यांच्या कमानींत ते आलें तेव्हां त्याच स्थितींत, तशाच आविर्भावानें बसलेला सूर्यभान त्यांना दिसला. अलीकडे त्यांचें गांवीं राहणें होत नसल्यामुळें व बाहेर गांवांहून मधून मधून परत आल्यावर त्यांना तशी विशेष फुरसत नसल्यामुळें व सूर्यभानही शिवरावाच्याच संगतींत नेहमीं असतो हें त्यांना ठाऊक असल्यामुळें अलीकडे सूर्यभानाच्या मनाची परिस्थिति काय आहे इकडे त्यांचें लक्ष गेलें नाहीं. गिरिजाबाई त्याचें कांहीही उणें पडूं देणार नाहीं हीही खात्री असल्यामुळें त्याच्याकडे मुद्दाम लक्ष देण्याचें त्यांना कारणही नव्हतें. गिरिजाबाई आणि हसन यांच्या भरंवशावर घर टाकून ते कित्येक दिवस परगांवीं बेफिकिर जात असतां आज मात्र त्यांना सूर्यभानाच्याकडे बघून हा कसल्या तरी गहन विचारांत आहेसें वाटलें.

"पाऊस पडूं लागला तरी तुला भान नाहीं असल्या कसल्या विचारांत आहेस तूं सूर्यभान ?" उदेभानराव त्याला हाताला धरून घराकडे घेऊन जात होते. सूर्यभानानें उत्तर दिलें नाहीं.

"काय होतंय तुला ? तुझी प्रकृति बरी आहेना ? अलीकडे मला तुझी विचारपूस करायला झालं नाहीं."

उदेभानरावांचा स्वर गद्गद झाला होता.

"माझी प्रकृति उत्कृष्ट आहे. काय होतं आहे मला ? मी लहान का आहे आतां माझी घटकों घटकीं विचारपूस करायला ? दादा, आपल्या आणि वहिनींच्या कृपेनें—" उदेभानरावांनीं त्याला पुढें बोलूं दिलें नाहीं. त्याच्या पाठीवरून पुन्हां प्रेमानें हात फिरवीत ते त्याला म्हणाले, "अण्णाच्या संगतींत बराच प्रगल्भपणा आलेला दिसतो आहे तुझ्या अंगांत" डोळ्यांत आलेले अश्रु मागें परतवीत उदेभानरावांनीं स्मित केलें. "तूं वृद्ध झालास आणि तुला तसं पाहण्याचं आयुष्य आम्हांला लाभलं तर त्यावेळीं सुद्धां आम्ही तुला लहान बालकच समजूं. अरे मनुष्य लहानाचा मोटा झाला तरी तो जोंवर घरांतला कर्ता होत नाहीं, तोंवर त्याचा लहानपणाचा अधिकार अबाधितच राहतो."

"दादा ! मला म्हातारपण येवो न येवो पण ईश्वर तुम्हांला मात्र—" यापुढें सूर्यभानाच्यानें बोलवेना. त्याचा कंठ दाटून आला. त्याला हुंदके यायला लागले. मोठ्या कष्टानें त्यानें त्यांची स्फुटता होऊं दिली नाहीं. त्याच्या मनाची अटकळ मात्र उदेभानरावांना त्यावेळीं योग्य रीतीनें झालीं. घराण्यावर त्यावेळीं आलेल्या प्रसंगाची कठोर जाणीव सूर्यभानाला झाली आहे व त्यामुळें त्याच्या अंतःकरणाला कांहीं तरी यातना होत आहेत हें त्यांनी ताबडतोब ओळखलें.

"बाळ ! प्रसंगीं धैर्य धरणें श्रेयस्कर आहे. प्रभुदयेनें आपण या प्रसंगांतून निभावून जाऊं. तूं उगीच चिंता करूं नकोस."

उदेभानरावांनी हे शब्द किती उत्कट धैर्याचा अवलंब करून उच्चारले हे न जाणण्या इतका सूर्यभान अजाण नव्हता. चिंतेनें आपल्या प्रेमळ भावाचें अंतःकरण किती मर्यादेपर्यंत व्याप्त झालें आहे हें त्याला पूर्णपणें माहीत होतें. अलीकडे सारख्या परगांवीं जाण्या येण्याच्या परिश्रमानें उदेभानरावांना वेळचेवेळीं जेवण देखील सुखाचें जात नसे. ही गोष्ट त्याला चागल्या प्रकारें ठाऊक होती. उदेभानरावांचा पूर्वीचा तो गौरवर्ण, उमदा चेहरा, आतां आतपदग्ध होऊन काळवंडून गेला होता व त्यांची ती कणखर

शरीरयष्टी एखाद्या रोगपीडिताप्रमाणें कांहींशी कृश आणि निस्तेज झालेली त्याला प्रत्यक्ष दिसत होती. त्यांच्या अंगावरचीं वस्त्रें आतां पूर्वीसारखीं प्रतिष्ठित दिसत नसून त्यांच्यांत एक प्रकारचा बेफिकीरपणा व अस्वच्छ-पणा आला होता. त्यांच्या कंबरेला त्यांचें आजन्म संवयीचें रेशीमकाठी धोतर न आवडून त्याच्या जागीं हल्ली मिलचें शुभ्र काठीं धोतर आलें होतें. कोईमतुरी जरीचा फेटा हल्लीं त्यांच्या डोकीवर मुळीच दिसत नव्हता. त्यांची टोपी मळकटलेली होती. कोट शर्ट जुन्यांतील होते. त्यांच्या सर्व पोषाखांत उपरणें काय तें त्यांची जुनी ओळख करून देत होते. त्याच्या टेवणींतल्या वस्त्रांपैकीं तेंच शेवटलें होतें. सूर्यभानरावांकरितां मात्र ते कसल्याही अडचणींत पूर्वीप्रमाणेंच मोलवान् वस्त्रें अजूनही आणित असत. त्याचप्रमाणें गिरिजाबाईची वस्त्रें म्हणजे काळी आणि वैंगणी पांढऱ्या किनारीचीं पातळें व साधारण रेशमी खण हींच हल्लीं असत. तारेचीं लुगडीं मात्र उंची नागपुरी अगर इरकली आणल्यावांचून उदे-भानराव कधींही राहिले नाहींत. आपल्या थोर मनाच्या भाऊ भावजयींची ही अत्यंत उदार आणि निःस्वार्थी वागणूक पाहून सूर्यभानाला मोठी धन्यता वाटे. त्याचें हृदय कृतज्ञतेंनें भरून येई. पण त्याच वेळीं आपल्या बंधूच्या चिंता दूर करण्यांत आपला कोणत्याही प्रकारें तादृश उपयोग नाहीं ही कल्पना त्याच्या मनांत ताबडतोब येई व तो त्यामुळें अत्यंत कष्टी होत असे. जात्याच प्रेमळ मनाचा, त्यांतून संबंधीयांची असली थोर वागणूक त्याच्या दृष्टीसमोर असल्यामुळें त्याचें हृदय कधीं कधीं "काय करूं न् काय नाहीं" या प्रकारच्या नुसत्या विचारांतच गढून न राहतां नाना-प्रकारच्या कल्पनेच्या भराऱ्या मारण्यांत गर्क होऊन जाई. त्याचें उपाय-चिंतन हल्लीं इतकें तीव्र होतें कीं तो साऱ्या विश्वांतील घडामोडींचें निरी-क्षण सारखा आपल्या मनश्चक्षूंनीं करीत असे. दुर्दैवानें त्याला असा कोण-ताही परिणामकारक उपाय अझून सांपडला नव्हता. शिवरावांकडे जावें तों त्याचा वेदांत आणि त्याच्या दृष्टीनें दूरपरिणामीं कल्पनांची मालिका, बंधूकडे बघावें तों त्यांची असाधारण योगस्थिताप्रमाणें धीरवृत्ती, हसन-कडे लक्ष द्यावें तर हल्लीं त्याला काय झालें होतें कोणास ठाऊक, तो आपला सारखा एकच एक अभंग घोळघोळून म्हणत असे. "कांहीं

पडतां जडभारी। दासीं आठवावा हरी". हळू हळू पण सतत उद्योग करून सिद्धी मिळवावयास सांगणारा शिवरावाचा वेदांत, आणि देवालाच आळवीत बसण्यानें कार्य होईल अशी हसनच्या मुखावाटे ऐकूं येणारी श्री तुकोबारायांची अभंग वाणी याची क्षणोक्षणीं भंग होऊं पाहणाऱ्या पण धैर्यानें धरून ठेवलेल्या उदेभानरावांच्या दुःखकारक योगस्थितीशी त्याला जुळणी करितां येईना. त्याचें अंतःकरण श्रद्धाळू व सात्त्विक असल्यामुळें त्याला वाटे जावें देवासमोर आणि त्याला सांगावें कीं, "सज्जनांचा रक्षणकर्ता म्हणवितोस, दाखीव सामर्थ्य! बसतो तुझ्या दारीं सारखा सात दिवस अन्नपाण्यावांचून; नव्हे; प्राण देतों तुझ्या पायांवर या घटकेस पण माझ्या बंधूच्या चित्ताला शांति व समाधान मिळेल असें कर नाही तर देवत्व सोडून दे!" त्याची अशी निर्मळ रोखठोकीची वृत्ती होती. मधून मधून त्याची श्रद्धा डळमळायला लागे पण शिवरावाची गांठ पडली कीं तिला ताबडतोब पूर्वस्थलावर यावें लागे. शिवरायांची त्याच्या मनावर जबरदस्त पकड होती. तो तासचे तास त्याच्यासमोर प्रवचन करी पण सूर्यभानाच्या तोंडून त्याला प्रत्युत्तर मिळत नसे. शिवराव त्याला पूर्ण जाणून होता. हा सिंहासारखा कणखर, मानी वृत्तीचा आणि तडफदार प्रवृत्तीचा बेगुमान तरुण आहे हें त्यानें ओळखलें होतें. त्यामुळें तो त्याला नेहमीं आपल्या सहवासांतच ठेवीत असे. एकदा संभाषणांत सहज मोतीचंदाबद्दल भीति वाटण्यालायक उद्गार सूर्यभानाच्या तोंडून निघाले होते. त्यामुळें त्याच्याबद्दल शिवरावाला मोठी धास्ती वाटे व त्याच्यावर तो काळजीपूर्वक लक्ष ठेवी.

कांहीं कांही माणसे अशी असतात की, एका विवक्षित मर्यादेपर्यंतच त्यांची सहनशक्ती काम करूं शकतें. पुढें त्यांच्यासमोर दिसणारीं दुःखे आणि यातना यांचा धुमाकूळ वाढत चाललासा जर त्यांना दिसला तर त्यांचीं मनें बेफाम होतात व ते त्याचा तितक्याच बेगुमानपणानें प्रतिकार करूं लागतात. त्यांची विवेकशक्ती त्यावेळीं काम देईनाशी होते व त्यांच्या हातांतून प्रसंगोपात्त अविचाराचें काम त्यांच्या दृष्टीनें न्यायाचें म्हणून होऊन जातें. शिवरावाचें काळीज या जातीचें होतें. त्याच्या सहन-शक्तीची मर्यादा आतां येऊन पोहोंचली होती. त्याच्या मेंदूत विचारांचें

तुंबळ युद्ध आतां दिसत असून तेथें एकसारखा कल्पनांचा झंजावात वहात होता. आतां तो शिवराव त्याला येऊन बाहेर घेऊन गेल्याशिवाय बहुधा बाहेरच पडत नसे. तो जवळजवळ आपल्या घोडीलाही विसरला होता.

उदेभानराव व सूर्यभान गढीच्या आंत आले तोंच घोडीनें फुरफुरून त्यांचें स्वागत केलें. बरेच दिवसांत त्याला आपल्या आवडत्या जनावरांची आठवण झाली होती. हसन खरारा करीत होता.

" बिजली हांक मारते तुला ! जा तिच्याकडे ! काळजी करूं नकोस ईश्वर समर्थ आहे. " असें एकदां पुन्हां त्याच्या पाठीवरून हात फिरवीत धीराचे शब्द उच्चारून उदेभानराव घरांत गेले. सूर्यभान तबेल्याकडे निघून गेला.



# प्रकरण १२ वें

"जगांत सगळीं सोंगे आणतां येतात पण पैशाचें सोंग आणणे फार कठीण असतें" असें म्हणतात तें कांहीं खोटें नाही. कोणत्याही मनोरथ सिद्धीला द्रव्याची अवश्यकता असतेच. द्रव्यावांचून लहान थोरांचें कोणतेंही काम अडतेंच. शिवरावानें पाटलांच्या करितां जें करावयाचें तें ठरवितांना गांवांतील इतर दुबळ्यांच्याकडेही लक्ष पुरविण्याचें ठरविलें होतें. अत्यंत निकडीचा प्रश्न म्हणजे पाटलांची चालू सालची शेती कशी तरी चालू ठेवून हंगाम भासवून द्यावयाचा व मोतीचंदाच्या रकमेला हंगामापर्यंत थोपवून धरण्याचा प्रयत्न करून मिळेल तें त्याच्या पदरांत टाकावयाचें व नंतरचा वेळ पुढील तडजोड व योजना करण्यांत उपयोजावयाचा. त्याच्या आणि नानासाहेबांच्यापुढें पाटलांच्या दुर्दैवानें प्रखर दैव उभें होतें. गेला हंगाम अगदीच असमाधानकारक गेल्यामुळें सावकारांनी देणें अगदी बंदच केल्यासारखें केलें होतें. उदेभानराव सर्व प्रयत्न फसल्यामुळें हवालदील झाले होते व नानासाहेबांचीही उमेद खचल्यासारखी झाली होती. शिवराव याच वेळीं एक निराळा उद्योग करीत होता. अडचणींत त्याला एक प्रकारचें स्फुरण चढत असे. ईश्वराचें स्मरण करून त्यानें या कठीण प्रसंगीं श्रमाची पराकाष्ठा केली होती. मोतीचंद दुरून गंमत पहात होता. तात्यासाहेब देशमुख सहानुभूति दाखवीत होते. पण प्रत्यक्ष द्रव्याची सहानुभूति त्यांच्याकडूनही मिळण्यासारखी नव्हती. त्यांतच त्याना नुकतेंच त्यांच्या विलायतेस शिकत असलेल्या त्यांच्या चिरंजीवाकडून पत्र आलें होते, त्यांत त्यांनी स्वदेशीं परत यावयास निघावयाचें लवकरच निश्चित झाल्याचें लिहिलें असून त्याबद्दलच्या खर्चाची रक्कम मागविली होती. सध्यांच मोतीचंदास दुखविणें म्हणजे मुलाला पैसे पाठविण्याची गैरसोय करणें होय या समजुतीनें ते नुसती तोंडानेंच सहानुभूति दाखवीत असत.

बराचसा विचार करून शिवरावानें असें ठरविलें कीं आपल्या योजनेपैकीं एक हिस्सा चालू प्रयोगार्थ अमलांत आणून पहावा. त्याची

पहिली योजना म्हणजे ज्यांचे जवळ जमिनीचे लहान लहान तुकडे असतील अशा लोकांचीं शेतें व साधनें एकत्र करून सहकारी तत्त्वावर शेती करावी. योग्य वेळीं त्यानें तशा कांहीं शेतकऱ्यांना बोलावून आपली योजना समजावून सांगितली. प्रथमतः त्यानें चार पांच माणसें निवडून काढलीं व त्यांचीं शेतें, पाटलांचीं शेतें व स्वतःचीं दोनतीन शेतें जीं जवळजवळ होतीं अशांचा एक गट तयार केला व सर्वांचे बैल आऊतें वगैरे एकत्र करून सर्व शेतें वहीत केलीं. सर्वांच्या बैलांपैकीं तपासणी करून योग्य ठरतील तेच बैल उपयोगाला घेतले व बाकीच्यांना विश्रांतीची व्यवस्था केली. त्याच्या योजनेंत गुरांच्याकरितां कुरण हा महत्त्वाचा विषय होता. व त्याकरितां त्यानें जमिनीचे दोन तुकडे निराळे काढून ठेवून दिले होते. व प्रतिवार्षिक आळीपाळीनें या कामाकरितां जमीन सोडावयाची हा त्याचा नियम ठरलेला होता. येथवर जरी आलें तरी बी बियाणें व इतर खर्चाला रक्कम कांहीं तरी हवीच होती. कल्पना सिद्ध होतांच त्यानें मिळतील तेवढी गुरें योग्य वेळीं आळीपाळीनें शेतांतून बसवावयास सुरुवात केली. जवळपासच्या धनगरांना बोलावून त्यांचीं बकरीं मेंढ्या कांहीं दिवस शेतांत राहवून घेतल्या व यावर देखरेख करण्याचें काम एका समंजस माणसाकडे सोपवून स्वतः इतर व्यवस्था करण्याच्या उद्योगाला तो लागला. या त्याच्या एकंदर कष्टाकडे पाहून सूर्यभान त्याला स्वतःला कांहीं देण्याबद्दल विनवीत असे.

"मला कां रे कांहीं काम देत नाहींस अण्णा? मी का अगदीं बेफाम मनुष्य आहे?"

या प्रश्नावर अण्णानें थोडें हंसावें व हळूच उत्तर द्यावें---

"होय, ह्या कामाला सध्यां तूं नालायकच आहेस. तूं प्रथम काय चाललं आहे तें बघ म्हणजे हळू हळू तूं तें सारं स्वतः करायला लागशील. तुझ्या प्रवृत्तीच्या माणसाला एकदम सारं आणि मनासारखं व्हावयाला पाहिजे तें हल्लींच्या जगांत आतां अशक्य झालं आहे. वर्षानुवर्षे एका दिशेनें सतत प्रयत्न करावे लागतात तेव्हा कोठें मनाजोगी एखादी गोष्ट सिद्ध होते. अरे, यंव करावं, त्यंव करावं, अशा योजना कथन करणारीं हीं जाडीं पुस्तकं मीं उलगडलीं पण त्यांतून खण्ण असा आवाज मला

कांहीं ऐकूं आला नाही. आणि तो कोणालाही ऐकूं येणार नाहीं. प्रयत्न-वादाचा निष्कर्ष म्हणजे योग्य दिशेनें सतत प्रयत्न करून पाहणें. फलाची जबाबदारी कोण अंगावर घेतो ? प्रत्यक्ष भगवंतांनींही फलाबद्दल उदासीन रहा असें म्हटलें आहे. त्याचें तात्पर्य हेंच कीं प्रयत्नांचीं शिदोरी शिंक्यावर चढविणारीं माणसें हजारांत उत्पन्न होतात. ज्यांची शिदोरी शिंक्यावर चढते त्यांची ती शिदोरी सुरक्षित राहून समाधानाचें फल त्यांना प्राप्त होतें, हें सांगणें नकोच. इतरांच्या शिदोरीवर काळाची, दैवाची, अगर त्याच्याच दृष्टीच्या अगर बुद्धीच्या मांद्याची बाधा होऊन ती त्यांच्या हातांतून निसटून जाते. तुला कामाला लावावयाचें नाहीं असा माझा थोडाच मानस आहे? नाही तरी एकटा हें एवढें सारें थोडेंच करूं शकतों ? पण तसा थोरला बोजा एकदम तुझ्या डोकीवर देण्यापूर्वी तें थोडें खंबीर व्हावयास हवें. तुझ्या मनाची उडी भारी. करशील तर सारा दिवस. थकेतों काम करशील. त्रासशील, फलाचें दूरत्व तुला सहन होणार नाहीं. आणि केलेल्या श्रमाचं चीज न होता तुझ्या उत्साहाचा भंग होईल. भानू ! तुला वाईट वाटूं देऊं नकोस. ही गोष्ट मी प्रत्यक्ष तुलाच म्हणून बोलतों असें नव्हे. विचार करून बघशील तर " पी हळद नि हो गोरी " याच मासल्याच्या प्रयत्नाचीं उदाहरणं तुला दिसतील. कठोर दैवाचे आघात सहन करितांना ज्या तेजाची आराधना करावी लागते, तें तेज प्रत्येकाच्या ठिकाणीं आहे. त्याच्याकडे लक्ष मात्र फारच थोड्यांचें जातें. तुझ्यासारखी शुद्ध भूमिका प्राप्त झाल्यामुळें त्या तेजाला आपली जाणीव तुला करून द्यावयाला फारसा वेळ नाहीं. पण तें तेज स्फुरत असतांना व आपला प्रकाश प्रसृत करीत असतांना त्याच्या कृपाविषयाला काय यातना सहन करावयाच्या असतात याचें उदाहरण द्यावयाचें झालें, तर प्रसूत कालच्या मातृवेदनांचेंच देतां येईल. भानू ! दचकूं नकोस ! तूं माझ्या भाषणाला नेहमीं संबोधित असलेला हा निरर्थक वेदांत नव्हे ! अरे, मातेची प्रौढी तिच्या त्या देवतातुल्य अपत्यधारणाच्या कष्ट सहनाच्या निरपेक्ष प्रेमांत आहे. "

भानूच्या मेंदूचा ठिकाणा नव्हता. शिवरावाचें प्रवचन ऐकण्याचा हा त्याचा पहिलाच प्रसंग नव्हता. पण आज त्याला त्याचें बोलणें कांहीं

निराळेंच वाटलें. शिवरावाच्या खोलींतून निघून ते दोघेही या वेळी गावाच्या जवळच असलेल्या पाटलाच्या शेताच्या धुऱ्याजवळ येऊन पोंहचले होते. वरतीं मेघाच्छादित आकाश. खालीं पावसानें भिजलेली काळी भोर भूमि पसरलेली होती. जलार्द्र भूमि म्हणजे शेतकऱ्याला आल्हादकारक दृश्य ! खालीं थोड्याच दिवसापूर्वी पेरलेल्या कपाशीच्या रोपाचीं कोंवळीं कोंवळीं पानें भूगर्भातून वर आलीं होतीं. वारा त्यांना अंगाई करीत होता. आपल्या दोनच चिमुकल्या हातांनीं ती लहानशीं रोपडी आपल्या मातेच्या उत्संगावर मौजेनें क्रीडा करीत होतीं. शिवरावाचें भानूचें त्याकडे लक्ष वेधलें. " भानू, बघितलीस ही मौज. ह्या हारीनें तुला दिसत असलेल्या या चिमुकल्या बालकांना या आनंददायक विश्वाची भेट करवितांना या भूमातेला काय श्रम पडले असतील, याची तुला कल्पना आहे ना ? या बालकांच्या भावी दैवाबद्दल ही माता बेफिकीर आहे. तिची एकच एक कर्तव्यनिष्ठा तिनें पार पाडली आहे. उघड्या जगांत तिनं हीं बालकं आणलीं आहेत. ईश्वराला तिनं या वाऱ्याच्या आणि सूर्यचंद्रकिरणांच्या द्वारें प्रार्थना चालविली आहे कीं यांचें संरक्षण आतां तुझ्या हातीं आहे. दुष्टांची नजर लागूं नये म्हणून ही त्याना रोज तीट लावते. आपल्या लाडक्यांना नेहमी प्रफुल्लित ठेवावं म्हणून हीं त्यांना सारखी जीवनदान करीत असते. त्यांत ती शुष्क होऊन जाते तरीही आपल्या अपत्यांवरील प्रेमामुळं ती आपल्या जवळ असेल तेवढी आर्द्रता त्याला देऊन प्रसन्न ठेवते. शांत चंद्राशीं स्नेह ठेऊन प्रखर सूर्याकडून ही आपल्या अपत्यावर दया करविते. तिनं त्या बरोबर आमच्यांवर ही एक जबाबदारी टाकली आहे. आम्ही हीं तिचीं अपत्यें कशी आहोंत हें तुला ठाऊकच आहे. आमच्याकडे तिनें याचें प्रत्यक्ष काम दिलें आहे. ही नुसती ईश्वराला हात जोडून स्वस्थ बसली नाहीं तर आम्हाला हिची आज्ञा आहे कीं 'बाळानों ! मजकडून या माझ्या लाडक्यांचं दुष्टांपासून संरक्षण होणार नाहीं. मी अबला आहें. तुम्ही माझे सुपुत्र आहांत ! पशूंचा संचार आसमंतात फार, माझ्या बाळांवर त्यांची पापीदृष्टी, त्यांच्यापासून यांचं कर्तव्य म्हणून संरक्षण करा. हे जगले तर तुमचे उपकार ते विसरणार नाहींत.' भानू ! स्वतःचें कल्याण या आज्ञेच्या पालनांत आहे. जी गोष्ट या रोपड्याना

लागू तीच गोष्ट मनुष्यसृष्टीला लागू आहे." सूर्यभान वरती आकाशाकडे व खालीं जमिनीकडे आळीपाळीनें पहात होता. आतां तो शिवरायाच्या तोंडाकडे पाहूं लागला. शिवरायानें आपले दोन्ही हात छातीवर गुंडाळून घेतले होते. त्याची गांधीटोपी डोकीवर किंचित कलती झाली होती. त्याच्या कपाळावर उभ्या गंधाच्या दैदिप्यमान रेषा स्पष्ट होत्या. त्याचे टप्पोरे डोळे सूर्यभानाच्या डोळ्यांशीं भिडले होते. त्याच्या मुखावर मधुरस्मित विलसत होतें. या वेळीं त्याची मुद्रा व त्याचा एकंदर आविर्भाव एखाद्या योग्याप्रमाणें दिसत होता. शिवरावानें त्याच्याकडे लावलेली टक भानूला सहन झाली नाहीं. भानूची दृष्टि खालीं वळली. क्षणार्धांत सूर्यभान आपल्या गुढग्यावर टेंकला व त्यानें शिवरावाचे पाय धरले. त्याच्या तोंडांतून "शिष्यस्तेहं शाधि मां त्वा प्रपन्नम्" ही ओळ निघाली. शिवराव गहिंवरला. भानूला उठवून त्याने त्याला आपल्या हृदयाशी घट्ट धरलें.



# प्रकरण १३ वें

मागील प्रकरणांत वर्णन केलेल्या शिवरावाच्या भेटीच्या पूर्वी सूर्यभानाच्या मनांत जें विचारांचें काहूर उसळलें होतें तें अत्यंत विलक्षण होतें. तो हल्ली सारखा विचारच करीत असे. त्याला विचाराची संवय होती पण ते त्याच्या उफाळत्या हृदयाच्या स्वभानुसार होतें. एकंदर स्थितीचा वणवा त्याच्याभोंवतीं जसजसा पेटलेला दिसे तसतसा तो त्याविषयीं पल्लेदार विचार करीत असे. एकवार त्याला वाटे, आपण कोणालाही न कळत घराबाहेर पडावें. हा त्याचा विचार इतका ठाम झाला कीं एके दिवशीं रात्रीं त्यानें तारेला हळूच विचारलें—

"तूं माहेरी जातेस का?"

तारेला हा अनपेक्षित प्रश्न ऐकून कसेसेंच झालें. सोळा सतरा वर्षांची ती अजाण अल्लड बालिका, तिला भानूच्या या उद्गारांचा अर्थच कळेना. "मी जड का झालें आहे इकडे?" कदाचित् आपला पति विनोदानें बोलत असेल असें समजून जरासें स्मित करून तारेनें प्रतिप्रश्न केला.

"तसं नव्हे. उगीच्च आपलं सहज विचारतों मलाही कुठं तरी—" सूर्यभान अडखळत बोलला.

"कुठं रोजगाराला का जायचं ठरतं आहे? करायचा गडे कांहीं तरी रोजगार. म्हणजे दादासाहेबांना कांहीं तरी आधार तरी होईल. इकडं रोजगार मिळायला अडचण नाही पडायची. लिहायवाचयाला कसं घडघड येतं."

"भोळी बरं अगदीं! रोजगार म्हणजे नोकरी जरी तूं समजत असलीस तरी तोंड पाहून कुणी थोडीच नोकरी देत असतं? प्रयत्न केला तर पट्टेवाल्याची नोकरी मला मिळूं शकेल. मोठमोठे शिकलेले लोक हिंडताहेत नोकरीच्यामागं पंचवीस तीस रुपयांकरितां! त्यांनांच तर मिळत नाहींत नोकऱ्या. मग आमची कथा काय? पट्टेवाला मात्र मी कसा छान शोभेन! अंगापेरानं अगदीं मजबूत—"

" पट्टेवाला म्हणजे कोणता हुद्देदार असतो? आपल्या गांवीं कधी कधी कांहीं अधिकारी येत असतात म्हणे मग त्यांत असतो का पट्टेवाला?" तारेनें कुतूहलानें विचारलें.

" होय तर—"

" मग कांहीं हरकत नाहीं गडे. इकडच्यासारखा शरीर बांधा नाहीं म्हणून या मोठ्या शिकलेल्यांना पट्टेवाल्यांचा हुद्दा नसेल मिळत. आमचा दादा शिकतो ना नागपूरास? तो असाच रोडतांगड आहे. त्याला बाबा नेहमीं व्यायाम घेऊन सशक्त व्हायला सांगतात. त्याला कुठल्या तरी हुद्याची नोकरी लावणार आहेत म्हणे आमचे बाबा! करायची गडे, पट्टेवाल्याची नोकरी. आली आहे कां कुठं? कांहीं माहिती मिळायची अण्णाकडून पण तोही आतांशा इकडे येत नाहीं. परवां सहज तिकडे बाईच्याबरोबर वहिनींच्या भेटीला गेलें होतें तों पाहिलं तर आपला कागदांच्या ढिगाऱ्यांत बसलेला! काय वाचतोन् लिहितो इतकं देव जाणे!"

सूर्यभानाला आपल्या बायकोच्या भोळेपणाचें फार हसू आलें. अगदीं मोकळे हंसण्याच्या मानसिक स्थितींत तो नव्हता तरी त्याला यावेळी हंसू आवरलें नाहीं. तो कांहीं वेळ मोठमोठ्यानें हंसतच होता. तारा ओशाळल्यासारखी झाली. ती खालीं पहातच बसली. तिच्या तोंडांतून एक शब्दही निघाला नाहीं. इतकी ती विस्मयलज्ज झाली. सूर्यभानानें तिचें तोंड हळुंच वर केलें व तिच्या मृदु कुरळया केंसावरून प्रेमानें आपला हात फिरविला. थोडा वेळ थांबून त्यानें तिच्या मृदु कपोल प्रांतां आपले दोन्ही हात ठेऊन त्याचें कौतुक करीत हळुहळूं तिचें मुख वर केलें व तिच्या त्या स्नेहमंगल डोळ्याकडे तो सारखा पहात राहिला. त्याच स्थितींत तारेच्या डोळयांतून दोन अश्रू सूर्यभानाच्या हातावर पडले. सूर्यभानानें आपले हात काढून घेतले. तारेची दृष्टि खाली वळली. पदराचा हात तिच्या डोळयांकडे गेला आणि तिथेंच तो कांहीं वेळ थाबला. तारेचे अश्रु सूर्यभानाच्या हातावर तसेच होते. त्या अश्रूंनीं त्याला काय बरं सांगितलं? " पतींनी विशेष कारण नसतांना आपणास दूर करावयाची गोष्ट कां काढली? कोणत्याही परिस्थितींत कुलस्त्रियेला योग्य अशा बाण्यानें राहून ती परिस्थिति कठोर असली तरी आपल्या वागणुकीनें आपण सुसह्य करून दाखविण्याच्या

पात्रतेचे नाहीं अशी तर शंका यांच्या मनाला आली नसेल ना ? कां घराण्याच्या आजच्या परिस्थितींत आपण अगदीं निरुपयोगी आहों म्हणून जिवाचें कांहीं तरी बरें वाईट–आई अंबाबाई क्षमा कर–करून घेण्याचा याचा विचार आहे ? ” निमिषार्धांत अशा प्रकारच्या अनेक कल्पना तारेच्या मनांत येऊन गेल्या. सूर्यभानाला वाटलें, थोडयाच कां होईना विरहाची कल्पना असह्य झाली ! तारा मोठी मनोहर मुलगी होती. दिसण्यांत सुंदर, मनाची उदार, वाण्याची सालस, पावित्र्याची पार्वती आणि सर्वांच्याच जाणीवेप्रमाणें घराण्याची लक्ष्मी होती. तारा आणि गिरिजाबाईच्या रूपानें पाटलांच्या घरांत लक्ष्मी आणि शारदा यांचा वास होता असेंच सर्वांना वाटे. तिच्याकडे पाहून सूर्यभानाच्या उड्डीयमान वृत्ती झटकन तात्पुरत्या ताळ्यावर येत. “ म्हणजे मी तुला घराबाहेर घालवून देतों असा नाहीं अर्थ घ्यायचा माझ्या बोलण्याचा ? ” सूर्यभानानें काहीं वेळानें हळूच सुरुवात केली. “ प्रश्न असा आहे की दादाना आतां परिश्रम तरी किती द्यायचें; त्यापेक्षां उभ्या जगांत एकदा फिरून यावें. पोटापाण्याची कांहीं सोय पहावी, तेवढाच भार हलका होईल दादांचा ! तुला बरोबर घेतली असती पण कांहीं जुळल्यावांचून उगीच तुला इकडे तिकडे फरफटत नेण्यांत उगीच त्रास मात्र व्हायचा—तुला ! ”

“ दादासाहेबाना आणि अण्णाला विचारून नक्की करायचं प्रथम. मग माझं काय म्हणणं आहे हें सांगेन मी ” एकदम गंभीरता आणून तारेनें विचार केल्याप्रमाणें उत्तर दिलें. प्रसंग आला म्हणजे भोळेपणांतही विचाराला वावरतां येते ही गोष्ट सूर्यभानाच्या निदर्शनास आली. उत्तर स्पष्ट होतें आणि त्यावर प्रत्युत्तर देणेंही सोपें नव्हतें. अण्णाजवळ भलतंच बोलणं बोलायला गेलों तर तो चांगली हजिरी घ्यायचा आणि कांहीं निराळेंच सांगायचा. दादांच्याजवळ तर कांहीं बोलण्याची सोयच नव्हती. अनेक यातना भोगून हृदय सारखें गंभीर व रुजु ठेवणाऱ्या त्या पुण्यवंतापुढें अण्णाशीं बोलता येईल त्याच्या अगदीं थोडयाशा अंशाइतकेंही बोलण्याची त्याची प्राज्ञा नव्हती. वहिनीजवळ बोलावें तर ती नुसत्या कल्पनेलाच नाना विनोदी फांटे फोडून सारखी टर उडवायची ! “ मोठा कठीण प्रसंग आहे माझ्यापुढं ! तूं सांगितलेलं कांहींही माझ्याकडून व्हाव-

वाहूं लागले. त्यानें निमिषार्धांत तोच हात आपल्या मस्तकावर ठेऊन घेतला. " तारे ! मला क्षमा कर, मी कोणतेंही काम अविचारानें करणार नाहीं ! "

तारेच्या मुखावर असें स्मित यावेळीं झळकत होतें कीं त्याचें वर्णन करण्यापेक्षां सात्विक तपस्व्यांचे चेहरे न्याहाळण्याचें भाग्य लाधण्याकरितां संत संग करण्याबद्दल विनविणें अधिक श्रेयस्कर दिसतें.

क्रमाक्रमानें तारेचें बिंबारक्त ओष्ठद्वय विलग होऊं लागले. रात्र बरीच झाली होती. ढग इतस्ततः आकाशांत वावरत होते. चंद्रमा त्यांच्या बरोबर लपंडाव खेळत होता. चंद्रिकेनें चंद्राला पकडून ठेवलें होतें. तिचा शुभ्र पदर वाऱ्यानें उडत होता. त्यामुळें त्याची धवलिमा कधीं अत्यंत शुभ्र तर कधीं मंद धवलता धारण करीत होती. ढग जरासे बाजूला झाले व क्षणांत हरले म्हणून किंवा काय एकाच दिशेकडे निघून गेले. चंद्रि-केला घेऊन भगवान् शीतरश्मि त्यावेळीं त्या आकाश सदनांतील लहानशा निर्मळ भागावर आरशांतील प्रतिबिंबाप्रमाणें भासमान होत्साता यावेळीं सुहास्य वदनानें पृथ्वी देवीकडे पहात होता. त्याचा एक लहानसा रश्मी बरोबर त्यावेळीं खोलीच्या खिडकींतून सूर्यभान आणि तारा यांच्या मुखांना गोंजारीत होता. "क्षमा" हे शब्द ऐकतांच तारेचें गांभीर्य कमी होऊन त्यात एक प्रकारचा विनययुक्त खेळकरपणा आला. तीच खेळकरपणाची एक दृष्टी सूर्यभानाच्या हृदयसागराला हेलकावा देऊं लागली. निमिषार्धांत तारा सूर्यभानाच्या स्कंधावर डोकें टेंकून डोळे मिटून काय पहात होती हें आम्हीं काय सांगावें ?



# प्रकरण १४ वें



सूर्यभानाच्या विचाराचा मनोरा अशा रीतीनें क्षणार्धात ढांसळला. जिकडे जावें तिकडे त्याच्याशीं कुणीही सहकार करण्याचें चिन्ह त्याला दिसेना. राहतां राहिला बापू. त्याचें आपलें रोज "कांहीं पडतां जड भारी, दासी आठवावा हरी" हें पालुपद आविर्भावयुक्त चाललेलें असे. देवावर निष्ठा खरी, भक्तीचा वाढता अंकुरही त्याच्या हृदयांत होता. पण ठाम मार्गाचा त्याला अजूनही बोध होत नव्हता. "अण्णाही खरें सांगतो, हसनचीही श्रद्धा योग्य आहे, तारेचेंही म्हणणें कसें मोडवणार दादा व वहिनीचीही माया खरी आणि दिवसांपाठीमागें दिवस जातात तरी मीं आपला जेथल्या तिथेंच! दोन वेळा जेवावें, चांगलीं वस्त्रं सहकुटुंब वापरावीं, बंधूच्या अडचणीबद्दल अक्रिय सहानुभूति हृदयांत बाळगावी आणि फार झालें तर शिवरावाबरोबर किंवा एकटेच कधीं कधीं शेतावर जाऊन फेरफटका करून घरीं परतावें. हा बघावा तर सगळ्या कामाचा अढावा!" त्याला मार्ग सांपडेना. पूर्वीपेक्षांही अधिक तो हल्लीं एकलकोंडा झाला होता. श्रावणांतील मंद पर्जन्य लहरींनी त्याला आराम वाटेना शिवरावाच्या ज्ञान कथेंतही आता त्याला गोडी वाटेना. तारेजवळ तर कोणत्याही कल्पनेची परिस्फुटता करण्याची आतां सोय राहिली नव्हती. हल्लीं महारुद्रेश्वराच्या देवळांत मात्र तो दर्शनाला नियमित जात असे. तेथें तो एकटाच बराच रात्रपर्यंत बसत असे. कधीं कधीं त्याला इतका वेळ होई कीं अन्न पोटाशीं घेऊन तारा आणि गिरिजावहिनी स्वयंपाकघरांतच झोंपी जात असत. आजही त्याला बराच वेळ झाला होता. उदेभानरावही घरीं यायचेच होते स्वयंपाक केव्हांच सिद्ध झाला होता. तारा जरा ओसरीवर जाऊन झोपाळ्यावर लवंडली होती. करमेना म्हणून गिरिजाबाईनीं आपलें एक पातळ घेतलें व सुई दोरा घेऊन त्या दिव्याजवळ बसल्या. आणि हळू हळू त्यावरील खोसे त्या शिवूं लागल्या.

रात्र जास्त झाली, अजून आपण देवळातच बसलो आहोत ही कल्पना येण्याजोगी जागृतवस्था सूर्यभानाला लाभल्याबरोबर तो ताडकन् पारावरून उठला व त्वरेने पायऱ्या उतरून झरझर घराकडे निघाला. घरी जाताना आपणाकडून वहिनीला व आपल्या प्रिय पत्नीला अलीकडे आपली वाट बघत बसण्याची आपण तसदी देत आहोंत हीही कल्पना त्याला आली. त्याला त्याबद्दल फार वाईट वाटलें. आपल्या मनाची ओढ जाईल तिकडे आपण बेफाम जाऊं देत आहोंत असेंही क्षणभर त्याला वाटलें. याउपर आपण आपली वागणूक बदलली पाहिजे. कोणत्याही गोष्टीचा जरा शांतपणें विचार केला पाहिजे. या शिवरावाच्या उपदेशाची त्याला आठवण झाली व त्याप्रमाणें वागण्याचा त्याचा तावडतोब निश्चय झाला. वहिनीची तावडतोब क्षमा मागावी म्हणून तो कपडेही न काढतां तडक स्वयंपाकघराकडे गेला. गिरिजा या वेळीं शिवण्यांत गर्क होती. रात्र बरीच झाल्यामुळें तिचे डोळेही झोंपाळले होते. दरवाजाकडे तिची पाट होती. सूर्यभान घाईघाईने दरवाजांत शिरतांच 'वहिनी' म्हणून हांक मारण्याच्या विचारांत तो आहे इतक्यांत ती आपलें फाटकें पातळ शिवीत आहे हें दृश्य त्याला दिसलें. तो दारांत एकदम थबकला. "माझ्याकरितां माझा देवतुल्य भाऊ आणि ही मातृदेवतातुल्य वहिनी केवढे कष्ट सोशीत आहेत आणि हें सर्व आनंदानें सहन करण्यांत त्यांचे केवढे महानुभावित्व प्रगट होत आहे आणि मी—"

सूर्यभानाच्या नेत्रांतून अविरत अश्रुवर्षाव सुरू झाला. त्याच्या मस्तकांत पुन्हां झंझावात दाटला. स्वतःबद्दल करवेल तितकी क्रूर आणि अनिष्ट कल्पना त्यानें केली, आणि स्वतःला एक वेळ शापूनही घेतलें !

गिरिजेचें शिवणे चाललेंच होते. इतक्यांत तिला एक बारकीशी डुकली आली. खालचा टांका पूर्ण करून सुईचा हात वर होता त्याच वेळीं डुकलीच्या झटक्यासरशी गिरिजेचें डोकें खालीं आलें. क्षणार्धांत कपाळाच्या कोंपऱ्यावर सुईचें अग्र जाऊन आदळलें. सुई जोरानें बरीच आंत गेली. "केवढा चांडाळ मी" असें म्हणून सूर्यभान तडक तिच्याजवळ गेला आणि त्यानें ती सुई गिरिजाबाई ओढून काढण्याचा प्रयत्न करण्यापूर्वीच काढून घेतली. गिरिजेच्या गौर–वर्ण भालप्रदेशावर एक

लहानसा रक्ताचा थेंब येऊन थडकला. सूर्यभानाचे रक्त सारखें मेंदूकडे वाहूं लागलें.

" भाऊजी, हातपाय धुताना ? जेवण केव्हाचं तयार झालं आहे. तारा ! अग तारा !— पोरीला झोंप लागली वाटतं. चला मींच करतें पाट पाणी. भावोजी, इथंच या खुंटीवर काढा की कपडे तुमचे " गिरिजा कपाळावरील वेदनाही विसरली होती. सूर्यभानाला तिचा एकही शब्द ऐकूं आलासें दिसलं नाहीं. त्याची नजर त्या लालभडक रक्ताच्या थेंबाकडे सारखी खिळलेली होती. " भावोजी, असें काय होतं तुम्हाला आज ? माझ्या कपाळावर कांहीं अक्षरं कां दिसातात तुम्हांला ? माझं भाग्य चांगलं आहे बरं ? " गिरिजा अर्धवट थट्टेच्या स्वरानें पण सरळ भावानें बोलली.

" भाग्याची अक्षरं ! " सूर्यभान शुद्धीत येऊन म्हणाला, " वहिनी ! तुझ्या पोटीं येण्याचं भाग्य मला लाभलं तर मी अमर होईन; व तें होण्याकरिता काय केले पाहिजे याचा मी विचार करीत होतों, वहिनी, त्या द्वाड सुईनं तुझ्या कपाळावर घातलेला हा रक्तबिंदु ऋणानुबंधाची लाल रेशमाची गांठ पिळून का निघालेला आहे ? ही फाटकीं वस्त्रं शिवून धडकी करतां करताच तुमचा जीव जावा इतके कां आम्ही अभागी आहोंत ? " गहिंवरून आल्यामुळें सूर्यभानाच्याने पुढें बोलवेना.

गिरिजेनें थोडेसें स्मित केले. हळूच पदरानं तो रक्तबिंदू तिनं पुसून काढला तरी पुन्हां तो आपला त्या ठिकाणीं हजरच. " चला जेवायला. ऋणानुबंधावांचून का कांहीं होत असतं ? तुम्ही उगीच कष्टी होऊं नका ! नाहीं तरी तुम्ही आमची मुलंच आहांत भावोजी ! एवढा कसला विचार आला आहे त्यांत ? हे दिवस राहणार थोडेच आहेत ? " गिरिजेनें थेंब पुन्हां पुसला. पुन्हां तो त्या ठिकाणीं दृश्यमान झाला.

सूर्यभानाच्यानें त्याच्याकडे पाहवेना. " थाब वहिनी ! मी थोडी हळद आणून दाबतो त्यावर. मग जेवीन मी ! तुमच्याजवळ कुणी तरी बसायला नको होतं का ? स्वतःला उत्तम धडोतीची लुगडीं नेसायला मिळतात मग कोण काळजी करितो दुसऱ्याची ? "

" भावोजी ! तिला कशाला बरं जागायला हवं इतका वेळ ? ती अजून लहान लेकरूं आहे. शिवाय झाली चूक माझीच ! रात्रीं शिवूं नये म्हणून

वाडवडील सांगतात. त्या बाबतींत खरी चूक माझीच आहे ! तिचा काय अपराध त्यांत ? आतां इतक्यांत गेली ती ओसरीवर. लागला असेल डोळा. अंमळ बसलीच होती इथं आतां पावेतों राधाकृष्णाची गाणीं म्हणत."

सूर्यभान चटकन धावला व फडताळांतून हळद हुडकूं लागला. हळदीचा डबा त्याला सांपडेना. गिरिजाबाईंना हंसू आलें. "भावोजी ! स्त्रियांच्या राज्यांतल्या गोष्टी पुरुषांना कळत नसतात. मी घेते कीं काढून." सूर्यभानाला कुठं धीर होता. त्यानें दोन तीन डबे उलगडले व गिरिजाबाई तिथे पोंचण्यापूर्वीच हळदीचा डबा त्यानें शोधून काढला. झटकन झांकण फेंकून देऊन चांगली थोरली चिमुटभर हळद त्यानें घेतली. जरूर तर हवी म्हणून दुसऱ्या हातांतही थोडीशी ठेवून घेतली व डबा तिथें तसाच टाकून त्यानें चटकन ती चिमूट गिरिजेच्या कपाळावर दाबली. तिच्या तोंडावर सारखी हळदचहळद झाली होती "ये आतां कसा बाहेर येतोस तो" असें त्या थेंबाच्या जागेकडे पहात सूर्यभान उद्गारला. गिरिजाबाई हांसतच उभी होती. समाधान न होऊन दुसऱ्या हातांतील हळद घेऊन त्यानें पुन्हा एकदा त्या थेंबावर हल्ला केला. थेंब केव्हाच अदृश्य झाला होता. तरी तो त्याकडेच पहात उभा होता.

"आज अगदी जेजुरीचा भंडारच वाहिला की मला भाऊजी ! म्हाळसाकांत तुम्हां सर्वांना निरंतर सुखांत ठेवो."

तबेल्यात घोडीनें फुरफुरून पडसाद दिला.

"जीते रहो बेटा" असें सूर्यभानानें तिकडे बघून मान हालवीत म्हटलें. "वहिनी ! माझ्या म्हाळसामातेला अशा प्रसंगी माझ्या हातानं भंडारानं पूजा घेण्यांचं का बरं बरं वाटलं ? माझा खंडेराव सारखा संकटरूपी मणिमल्लाशी झगडत असतांना मला त्याच्या कुतऱ्याइतकीही त्याची प्रसंगी सेवा करिता येऊं नये ना ? वहिनी ! तुझी ही फाटकी वस्त्रं, दादाचे ते ठिगळाचे कपडे आणि आमची ही उंची वस्त्रं ! तुमच्या उदार हृदयाचा उतराई मी कसा होऊं ! दादा ! दादा ! काय करूं म्हणजे मला तुम्हाला संतोष देतां येईल ? "

'दादा' ही हाक सूयभानानें मारली आणि दारांत उदेभानरावांनी पाऊल टाकलें. त्वरेनें जाऊन त्यांनी सूयभानाला पोटाशी धरलें. "कसल

हळव्या हृदयाचा आहेस रे तूं सूर्यभान! उगीच काळजी वाहून काय हें आपल्या देहाचं करून घेतलं आहेस ?" "दादा ! हें मला सोसवत नाहीं हो !" वहिनींच्या फाटक्या पातळाकडे बोट दाखवून सूर्यभान म्हणाला.

"चालायचंच रे हें ! एवढा हंगाम निभावला म्हणजे सारं ठीक होईल. काळजी करूं नकोस. शेतीची काळजी अण्णा बघ बरं कसा धैर्यानं वाहतो आहे ! मोतीचंदाचं खटलं आहे. बघतां येईल. श्री म्हाळसाकांत समर्थ आहे. मी आहेंच उद्योगांत. चल, जेवून घेऊं प्रथम--" मुकाट्यानें सूर्यभान आपल्या खोलीकडे गेला. त्याचीं पावलें जड पडली होतीं. कृतज्ञतेचे अश्रू त्याच्या डोळ्यांतून वहात होते. खोलींत गेल्यावर तो पलंगावर जाऊन पडला असता पण आपण जितका उशीर करूं तितकाच दादांच्या जेवणाला विलंब होईल ही जाणीव त्याला होती. त्यामुळें त्यानें तावडतोब कपडे काढले व तो स्वयंपाक घराकडे वळला. हसन आपली एकतारी काढून नित्याप्रमाणें "कांहीं पडतां जडभारी, । दासीं आठवावा हरी ॥ हा अभंग आळवीत होता. त्या अभंगानेंच तारा जागीं झाली. बघितलें तों मंडळी सोप्यांत जेवायला बसली आहे. ती हळूच उठली व दुसऱ्या दारानें स्वयंपाकाच्या खोलीत गेली. सूर्यभानानें तिला लांबून पाहून एक कठोर नेत्रकटाक्ष फेंकला व पुन्हा ताराकडे बघायला जातों तो उदेभानरावांची दृष्टि त्याच्याकडे पाहून हंसत होती. जेवतांना कोणीही एकमेकांशीं बोललें नाहीं. हसनच्या आलापा मात्र चालल्या होत्या. "कांहीं पडता जडभारी, दासी आठवावा हरी । मग तो होऊं नेदीं शीण, आड घाली सुदर्शन--"



# प्रकरण १५ वें



बीं बियाणें आणि इतर जुजबी खर्चाकरितां लागणारी रकम उभारण्याकरिता शिवरावानें व नानासाहेबानी अत्यंत प्रयत्न केले व ते सर्व निष्फळ झाले. अनुकूल काळाच्या वेळीं प्रामाणिक मन नाना प्रकारच्या स्वपर कल्याणाच्या गोष्टी करण्याच्या कल्पना करीत असलें तरी आणि त्या वेळीं ठरविलें जाणारें ध्येय कितीही विस्तृत असलें तरी, त्याला तें अपुरें आणि मर्यादित भासतें. त्याला अतिविस्तृत आणि अवाढव्य करण्याच्या विचारातच कधीं कधीं अनुकूल काल निघून जातो. प्रतिकूल कालात मात्र तोच मनुष्य मर्यादित कार्याच्या प्रारंभीच्या अंकुरात पुढील वर्धिष्णुवृक्षाचें बीज आहे ही खरी कार्याची खूण ओळखतो व म्हणूनच ' अडचण ही शोधक बुद्धीची जननी आहे ' अशी म्हण पडली असावी. सुकाळी विचार सुलभ आचार दुर्लभ तर आपत्काली मर्यादित विचारांची ताबडतोब पूर्ति करण्याचा प्रयत्न होत असल्यामुळें कार्याचे प्रारंभी आखलेले मर्यादित धोरणच पुढे आत्मविश्वासानें ईश्वरानुकूलतेनें थोर, विस्तृत, चिरस्थायी आणि कल्याणकारी स्वरूपानें प्रत्यक्षतेंत विराजमान होतें.

लोककल्याणाची आवड, तिच्या पूर्तीकरितां घेतलेले आजवरचे परिश्रम व संधि मिळाल्यावर त्या विचारांना मूर्त स्वरूप देण्याच्या कल्पनाना आजच आरंभ करावा लागेल, हें शिवरावाला एक वर्षापूर्वी सांगता आलें नसतें. पण योगायोग असा की त्याला आपल्या खेड्यांत येऊन आता नेहमीकरितां रहावें लागलें, तेथील बारीक सारीक देखील नाना प्रकारच्या उलाढालीशीं त्याचा परिचय झाला. खेड्यातील गरीब शेतकऱ्यांची दुर्दशा त्याला प्रत्यक्ष अवलोकन करितां आली. प्रतिष्ठितांत माजलेला कलह त्याला अजमावतां आला, व त्या रोगावरचें निदान त्याला कालावधि न करतां करणें भाग पडलें. त्यांतच पाटलांच्यासारख्या त्याच्या ऋणानुबंधी स्नेह्यांवर आलेल्या बिनतोड प्रसंगाचें त्याला यथार्थ दर्शन झालें.

मोतीचंदाच्या वाढत्या वैभवाबद्दल त्याला द्वेष वाटला नाहीं. ऋणदाता हा गांवांत वैद्याइतकाच अवश्य आहे, हें तो मानीत असे. केवळ सावकारी

धंदा करणें दोषास्पद अगर गुन्हा आहे, ही त्याची कधींच समजूत नव्हती. सावकारीचा प्रामाणिक धंदा ही एक ग्रामसंघटनेतील आवश्यक बाब आहे, असेंच तो मानीत असे. पण त्या संस्थेंत मोतीचंदासारख्यांनीं गाजविलेली दुर्घटना मात्र त्याला अत्यंत दोषास्पद वाटत असे. सावकार हा कुळाचा भक्षक न होता रक्षक व्हावा ही त्याची कल्पना होती. बेफाम आणि अनिर्बंध निर्दयपणानें गांजलेली किती तरी गरीब शेतकरी कुटुंबें आज त्याच्यापुढें प्रत्यक्ष उभीं होतीं. दुसऱ्याही बाजूनें विचार केलेला होता. सावकाराचें प्रत्येक कूळ म्हणजे रामावतार होय हीही त्याची भावना नव्हती. पैसे बुडविणारे, लांड्यालबाड्या करून सावकाराला नुकसानींत आणणारे, दस्तऐवज जाणून बुजून बेमुदतींत आणणें किंवा नाकबूल करणें इत्यादि क्लृप्त्या करण्यात धन्यता मानणारेही या कुळामधून होते; पण असल्या थोड्या माणसांकरिता त्या नुकसानीची भरपाई म्हणून अमर्याद व्याजाचा दर, अमानुष सक्ती आणि निर्दय हृदयकाठिण्य एकजात सर्वांवर लादले जाऊन पिढीजाद चोपदरी कुळाच्या गळयात अडकवली जाण्याची कल्पना त्याला सहन होत नव्हती. या दृष्टीनें त्याला प्रस्तुत एकाधिकारी सावकारी परंपरेपेक्षां सनिर्बंध आणि कायम कमी व्याजाची को–ऑपरेटिव्ह बॅंकिंगची सावकारी पद्धति पसंत पडत होती. जगावें किंवा मरावें हा प्रश्न साऱ्या जगापुढें येऊन पडला असता सावकारानें मात्र स्वतःचें दोंद वाढविण्याचें कार्य असेंच चालू ठेविल्यास अनर्थ झाल्यवाचून राहणार नाही, हे जगातील घडामोडीवरून त्यानें निदान केलें होतें. कुळांना जिवंत ठेवण्याच्या प्रामाणिक भावनेनें कार्य केल्यास सावकारी संस्थेची उत्साहवर्धक भरभराट होऊन तो वर्ग समाजास उपकारक झालेला ईश्वरदयेनें खचित दिसेल ही शिवरावाची भावना होती.

पाटलांना नोटीस लागल्यानंतर एके दिवशीं शिवराव सहज मोतीचंद शेटच्या दुकानांसमोरून जात होता. शेटच्या मनातही शिवरावाबद्दल एक प्रकारचा आदर असे. तशातून मुलाकरितां नवीन घेतलेला घोडा शिवरावाला दाखवावा या उद्देशानें त्यांनीं शिवरावाला हाक मारली. शेटजींना कोणतीही एखादी वस्तू विकत घेतली म्हणजे शेंदोनशें लोकाना दाखवून आपल्या वैभवाचें प्रदर्शन करण्याची एक प्रकारची हौस असे. त्याप्रमाणें

त्यांनीं शिवरावाला बोलाविलें. " याहो, अण्णासाहेब! परभारें चाललांत, नाराजी आहे वाटतं आमच्यावर ? "

" जयगोपाळ! जरा घाईंत होतों म्हणून चाललों होतों. आपण ' नाराजी ' वगैरे शब्द निदान माझ्यासंबंधीं तरी वापरूं नये. आपण नानासाहेबांच्या वयाचे. माणकचंद आणि मीं एका वर्गांत शिकलेले अर्थात् मी आपल्या मुलासारखा. मला केवळ अण्णा म्हणून हांक मारलीत, तरी आपला तसा अधिकार आहे. तेव्हां आपण मला एवढ्या थोरपणानें संबोधूं नये अशी माझी विनंति आहे. " शिवराव दुकानांत जाऊन गादी-वर बसल्यावर म्हणाला.

" मला तुमच्याकडे पाहून मोठं कौतुक वाटतं. पाहिलंस " शेटजी आपल्या चिरंजीवाकडे वळून म्हणाले, " वागणूक अशी विनयशील असावी. नाहीं तर तूं! "

माणकचंद दुकानांतच थोड्या अंतरावर ठेविलेल्या एका तिजोरीच्या खोक्यावर पाय लटकवून बसला होता.

" अण्णासाहेब, आमच्या माणिकला शिकवा दोन गोष्टी चांगल्या! हा अगदींच मगरूर आणि बेवकूब आहे. आता आमचं काय आणि नाना-साहेबांचे काय, जगांत थोडेच दिवस राहिली आहेत. पिकलेलीं पानं, केव्हां गळून पडूं याचा नेम नाहीं. तुम्हीं जाणतांच आहांत हाडाचीं काडं करून हा पसारा आम्हीं यांच्याकरितांच ना करून ठेवला आहे? कसं तरी पोट-भर जेवायला मिळेल येवढं होऊं शकलं बुवा आपल्याकडून! आतां या पुढं तुम्हीं आपल्या अकलेनं त्यात भर घाला. अण्णासाहेब! याला जरा शहाणपण शिकवीत चला! "

अण्णानें शेटजीच्या भाषणावर कांहीं उत्तर न करितां माणिकला आपल्याजवळ बोलाविलें. तोही तावडतोब खोक्यावरून उडी मारून अण्णाच्याजवळ येऊन बसणार इतक्यांत---

" अरे पागल! कांहीं सुपारीबिपारी आणशील की नाहीं? कितीतरी दिवसांनीं अण्णासाहेब आले आहेत आपल्या येथें चिकणी सुपारी, लवंगा, वेलदोडे घेऊन ये थोडे! "

माणिकचंदानें तिकडे लक्ष दिल्याचें दिसलें नाहीं. तो अण्णाच्याजवळ जाऊन बसला व नंतर थोड्या वेळानें त्यानें दुकानांतील एका कोपऱ्यांत बसलेल्या दिवाणजींना सुपारी वगैरे आणावयास हुकूम केला. अण्णाला विडी, पान, सुपारी वगैरे कशाचेंही व्यसन नव्हतें. त्यामुळें सुपारी आली काय न आली काय त्याला सारखेंच होतें. उगीच एखादा तुकडा घेऊन तोंडांत थोडा वेळ चघळायचा व नंतर टाकून द्यायचा यापेक्षा या सत्काराचा त्याला कांहीच उपयोग नव्हता.

अण्णाच्या डोक्यांत यावेळीं निराळेच विचार चालले होते. पाटलांच्या नोटिशीबद्दल गोष्ट काढावी काय हा प्रश्न तो स्वतःला विचारीत होता. शेटजी मधून मधून कुशल प्रश्न करीत. आणि यंदा आपण सगळीं शेतें मक्त्यानें देऊन केवळ आपल्या हिश्यांत आलेलीं गांवचीं (पाटलांची) शेतेंच कशी वहितींत ठेवण्याचें ठरविलें आहे याची माहिती देत. शेती करणें म्हणजे पाण्यासारखा पैसा खर्च करावा लागतो. या गोष्टी विशेष प्रकारें अण्णांच्या मनावर बिंबवीत शेटजी आपल्या पोटावरून हात फिरवून आढ्यतेनें अण्णाकडे, नंतर बाजूला तिजोरीजवळ बसलेल्या रोकड्याजीकडे, पलीकडे बसलेल्या दिवाणजीकडे व दुकानात बसलेल्या प्रत्येक व्यक्तीकडे पाहून आविर्भावानें बोलत होते. हें बोलणें इतकें लांब आणि सारखें चाललें होतें कीं, त्यातून आपली सुटका लवकर कशी काय होते या भीतीनें त्याचा जीव कासावीस होत होता. त्या भाषणांतच शेपन्नास लबाड कुळांनीं आपणांस कसे फसविलें व त्यामुळें आपण हजारों रुपयांच्या नुकसानींत कसें आलो, नाइलाजानें पाटलांवर नोटीस देण्याचें आपणांस का आवश्यक झालें, इत्यादि बाबी शेटजींनी फार गौरवून सांगितल्या. आपण सूट दिलेल्या व्याजाच्या रकमांची यादी तर इतकी लांबच लांब होती कीं, शेटजींचा हल्लींचा उत्कर्ष कुळांनीं दिलेल्या आशिर्वादाचा प्रभाव होय किंवा काय असें अण्णाला वाटायला लागण्यापर्यंत पाळी आली.

" आपली पुण्याई थोर यांत शंका नाहीं." शिवरावानें सुटकेच्या आशेनें बोलण्याचा धीर केला.

"कसलं, कसलं, तुम्हीं मोटे लोक, कसें तरी तुमच्यासारख्याच्या

आश्रयानं आम्ही राहात आहोत झालं. " शेटजी विनीत स्वरानं पण हासत हासत बोलले.

" काय माणकचंद, तुझा नवीन घोडा दाखविणार आहेस ना ? " शिवरावानें शेटजींच्या शब्दांना नुसतें मानेनेंच उत्तर देऊन माणकला उठविण्याचा प्रयत्न केला. " चल की रे ! "

" काय उमदं जनावर आहे म्हणून सांगू अण्णा तुला ! सूर्यभान आपल्या बिजलीचीच बेसुमार तारीफ करीत असतो. याच्यावरून असल्या शेकडों बिजल्या ओवाळून टाकाव्या. गेल्या वर्षीच्या शर्यतीत माझ्या चांदराणीचा पाय दुखावला म्हणून सूर्यभान पुढं जाऊं शकला. यंदाच्या शर्यती करितां हा नवीन घोडा आणला आहे. वलूची लोकांच्याजवळच्या सर्व घोड्यांतून यंदा हाच एक घोडा होता. एक टांच दिली की सूर्यभानाची बिजली कोठल्या कोठें राहील. "

" माणिकबरोबर जाऊन बघतो मी घोडा. आपण तसदी घेऊं नये. जयगोपाळ "

शिवरावानें शेटजींचा निरोप घेतला. माणिकचंद आणि शिवराव तबेल्यांत गेले. शेटजींचा तबेला चांगला विस्तृत होता. जमीन मुबलक आणि जवळ जवळ फुकटांतच मिळाल्यामुळें तबेल्याची इमारत, विहीर, घासदाण्याच्या कोठड्या, नोकरांची घरं वगैरे योग्य प्रमाणांत निघून आवारांचें एक छानदार पटांगण मातीच्या भींतीच्या कंपौंडानें परिवेष्टित झालेलें होतें. शेटजींनी सर्व बाजूंनी आपला तबेला नमूनेदार केला होता व या तबेल्यावर दोन बैल आणि एक छकडा आणि शेटाणींची एक गाडी या व्यतिरिक्त बाकीच्या सर्वांवर माणिकचंदाची प्रत्यक्ष सत्ता होती. अण्णाला आजवर, कंपौंडाच्या आंत येऊन प्रत्यक्ष हे वैभव पहाण्याची इच्छाही झाली नव्हती व त्याला तसें कारणही नव्हतें. शेटजींचा तबेला पाहून अण्णाला तें एखाद्या छोट्या संस्थानिकांच्या ऐश्वर्याप्रमाणे भासलें. चांदराणी त्यानें कित्येकदां बघितली होती. पण आज इतक्या जवळून पाहतांना त्याला त्या जनावरानें अगदी मोहित करून टाकलें होतें. चांदराणी म्हणजे खरोखरच एक चीज होती. एकजात शुभ्रवर्णाचा तो एक बगळा होता. पातळशी तल्लख अंगकाठी. कमानदार मान. पांढरीच पण जरा केतकी वर्णावर झांक

मारणारी रेशमी आयाळ. लांब भूमीपर्यंत लोळणारी त्याच रंगाची शेपटी, गिजरे मोठे डोळे, आणि एखाद्या मानिनीप्रमाणें शिवरावाकडे मान मुरडून पहाण्याचा तिचा आविर्भाव पाहून तिचें नांव "चांदराणी" ठेवणाऱ्या-बद्दल त्याला आदरपूर्वक कौतुक वाटलें. जवळच माणिकनें आणलेला नवीन घोडा "नोबल" ही ऐटीनें उभा होता. शिवराव चांदराणीकडे सारखा बघत आहे, हें पाहून माणिकने त्याला म्हटलें, "अण्णा, ती तर आपली जुनीच वस्तू आहे. हा बघ 'नोबल.' त्याचें पूर्वीचेच नाव मी कायम केलें आहे. याचा अर्थ 'जातिवंत' असा होतो असें मला त्याच्या मालकानें सांगितलें. आहे ना एक रत्न!"

"माणिक, मला घोड्याची परिक्षा म्हणण्यासारखी नाही. आपले तात्या-साहेब आहेत त्यांतले योग्य परीक्षक त्यांना दाखविला होतास ना हा? माझे मन विचारशील तर मला तुझी ही चांदराणीच आवडते!" "अरे, होय. पण ती आता जुनी झाली. तात्यासाहेबाना ही चांदराणी फार आवडते पण हेंही जनावर त्यांनी पसंत केलें. जरा स्वारीला खाष्टपणा करितो पण मी हल्ली त्याच्याशीं थोडी थोडी दोस्ती करीत आहें. येईल वठणीवर हळूहळू! अगदी बच्चा आहे. एकदा केली स्वारी मी त्याच्यावर. पण अजून जरा रिकीबीचा सराव झाला नाही. जातो कुठं!" माणिकनें त्याच्या पुठ्यावरून हात फिरविला. पिछाडी बांधलेल्या मागील दोन्ही पायांनी एक छोटीशी उडी मारून 'नोबल'नें आपल्या मालकला सलामी देण्याचा प्रयत्न केला.

"थोडा पाजी आहे बेटा. घाबरूं नकोस अण्णा, ये असा." अण्णा तबेल्याच्या बाहेरच होता. मालक घोड्याच्या पाठीवरून हात फिरवीत अण्णाकडे पहात त्याला थापटीत होता. इतक्यांत नोबलनें कान दाबून, जोरानें हिणहिणून आणि आपले दांत बाहेर काढून एकदम माणिकच्या हाताशी सलगी केली. शिवरावानें एकदम झडप घालून माणिकला मागें ओढलें नसतें तर त्या जातिवंत जनावरानें त्याचा हात चावून टाकला असता. त्याच्या सदऱ्याची अस्तनीच फक्त त्याच्या तोंडात सांपडली, व तेवढ्याच नुकसानीवर तूर्तास निभावलें. माणकचा राग इतका अनावर झाला की त्याच्या जवळ त्यावेळीं बंदुक असती तर त्यानें त्याच्यावर गोळीच घातली असती.

"जनावर जरा खाष्ट आहे पण सुंदर आहे" शिवराव माणकचा राग घालविण्याच्या उद्देशानें म्हणाला. तुझ्या मणगटाला इजाबिजा तर झाली नाहींना? त्याने प्रेमानें माणकचें मणगट तपासलें. माणक ओशाळा झाला होता.

"इतका आहे तरी बघ आणतो त्याला वठणीवर थोड्याच दिवसात." माणक म्हणाला.

"भानूच्या हातीं दे कांहीं दिवस. बघ त्याची मजा मग—" शिवरावाच्या तोंडातून शब्द निघून गेले त्याच्या दृष्टीनें त्याचा भानू एक अलौकिक घोडेस्वार होता. खरें म्हटलें म्हणजे अण्णाचा विश्वास अनाठायीं नव्हता. भानूच्या तोडीचा स्वार त्यावेळी त्या पट्टींत कोणी नव्हता. अशी त्याची कीर्ति होती व ती प्रतिवर्षी संक्रांतीच्या शर्यतींत खरी ठरत असे. भानूची बिजली नेहमीच पहिली असे. आणि माणिकला हेंच खपत नव्हतें. नोबलमधल्या खोडी माणिकच्या निदर्शनास आतां पूर्णपणे आल्या होत्या व याच्यावर एकदां बसवून भानूच्या घोडेस्वारपणाच्या ऐटीची परीक्षा बघावी असा विचार त्याच्या मनांत आला व नोबल त्याचा नक्षा उतरवील असेंही त्याच्या मनानें त्याला सांगितलें. तोही म्हणजे कांहीं कच्चा स्वार नव्हता. आज पांच सहा वर्षे चांगल्या चांगल्या जनावरांवर तो स्वारी करीत असे. "अण्णा, ठरलें, सूर्यभानानें नोबल कसावा आणि त्याच्यावर स्वारी करावी मी त्याच्या बिजलीवर बसतों. तूं घे माझी चांदराणी--गरीब आहे--एकदां मौज करूं या शर्यतीची! ठरवतोस ना?" माणकने अण्णाला सहेतुक मुद्रेनें गळ घातली. अण्णानें आत्मविश्वासानें व मोकळ्या मनानें अभिवचन दिलें.



# प्रकरण १६ वें



सायंकाळचे पांच वाजण्याची वेळ. गिरिजाबाई देशमुखांच्याकडे बसावयाला गेल्या होत्या. उदेभानराव परगांवी गेले होते. सूर्यभान शिवरावाकडे गेला होता. हसन आपल्या कामांत होता व तारा डोकें दुखत असल्यामुळे गिरिजाबाईबरोबर न जाता मागील ओसरीवर झोपाळ्यावर आपल्याशीच विचार करीत बसली होती. परवांच्या भेटीत सूर्यभानाशी जें तिचें बोलणें झालें त्यांत आपल्या लग्नामुळें म्हणजे पर्यायानें आपल्यामुळें पाटील घराण्याला अशी उतरती कळा लागली. ह्या कार्यकारणासंबंधामुळें तिच्या मनाला घोर यातना होऊं लागल्या. तिचें अजूनही बालहृदयच होतें. आलेल्या संकटांत आपण प्रत्यक्ष कारणीभूत झालों नसलो तरी ही परिस्थिति यावला आपलाच पायगुण कारणीभूत आहे ह्या कल्पनेनें तिचें अंतःकरण दुभंगून गेलें होतें. " ईश्वरा! या अभागिनीला या घराण्यात पाठवून या सज्जनांना कां बरें तूं तसदी दिलीस? त्या पेक्षां मलाच का नाही मा—?" तिच्या नेत्रांतून अश्रूंचा प्रवाह वाहूं लागला. ती मोटमोठ्यानें स्फुंदस्फुंदून रडूं लागली. " वाईट पायगुणाची! अनुसूया मामी! आपण मला भाग्याची लक्ष्मी म्हणून आशीर्वाद दिला! आपल्यासारख्या पतिव्रतेच्या शब्दावर आज नाहीं उद्या हे कष्टकर दिवस निघून जातील अशी माझी पोरीची श्रद्धा होती, पण मामी!— —छे! माझ्या अदृष्टाला तुम्ही काय कराल? माझ्या पूर्वजन्मींच्या पातकाच्या राशी असतील त्या तुम्ही कशा काय धुवून काढणार? तुमचा आशीर्वाद अनाठायीं व्हावयाचा नाही. कदाचित् तो मला पुढल्या जन्मीं फळाला येईल. पण—पण—या जन्मीं—या जन्मी हे दुःख साऱ्या आयुष्यभर मीं कसें भोगूं आणि माझ्याबरोबर या सगळ्यांना कसें भोगावयास लावूं! देवा! तुम्ही माझ्यावर दया करणार नाही का? मला येथून आपल्याजवळ— —!"

बालिकेचा शोक अनावर झाला होता. सूर्यभानाच्या त्या दिवसांच्या भेटीनंतर तिच्या दुःखित हृदयाची व्यथा सारखी वाढतच होती. पोर

समंजस असल्यामुळे ती आपले दुःख सहसा कोणाच्या नजरेस पडूं देत नसे. प्रत्येकाशीं बोलतांना ती दांडगें संयमन करण्याचा प्रयत्न करी व ते त्या कुलबालिकेला साध्य होत असे. तिच्या हृदयांत आत्मनिर्भत्सनाच्या अग्नीचे फंवाऱ्यावर फंवारे उडत असले तरी त्याची झांक तिच्या चेहऱ्यावर पडलेली अत्यंत मार्मिकाखेरीज दुसऱ्याच्या ध्यानांत येणें दुरापास्तच होतें. सध्यां पाटलांचं सर्व घराणेंच काळजींत होतें. पुरुषांच्या चेहऱ्यावर चिंतेची छाया उमटली होती. गिरिजाबाई तर बाळयोगिनीप्रमाणें मुखावर सदासर्वदा हास्य विलसत ठेऊन घरांतील मंडळीचा श्रमपरिहार करीत असत. त्या माऊलीचा ईश्वरावरील विश्वास कोणापेक्षांही दांडगा होता. तिचें मुकाट्यानें नामस्मरण चालत असे व तिच्या ठिकाणीं त्या तपश्चर्येनें असा आत्मविश्वास बाणला होता कीं हे कष्टाचे दिवस निघून जाऊन सुखाचा सूर्य उगवेल, असें तिला वाटे. तिच्यासमोर कष्टी मुद्रा करून जाण्याचें उदेभानरावानाही धैर्य होत नव्हतें. इतकी तिची आत्मनिष्ठा तेजस्वी होती. सुखवस्तु असूनही पिढ्यानुपिढ्या पंढरीची अखंड वारी करणाऱ्या भक्तिमान् कुलांत तिचा जन्म झाला होता. दुःखाच्या यातनेनें तिच्याकडे पहाण्यांत स्वतःच दुःखी व्हावें इतकें तिचें आर्ततेज वृद्धीगत झालें होतें. तिला त्याची प्रत्यक्ष जाणीव नसली तरी तिच्या ठिकाणीं असलेल्या भक्तीच्या दृढ श्रद्धेमुळें तिला स्वतःच्या कल्पनेबद्दल दृढतर आत्मविश्वास वाटे. चार दिवस कष्टाचे आहेत, निघून जातील. कष्टांना भिऊन रडत बसण्यापेक्षां आनंदानें त्यांचा स्वीकार करून त्यांचे आपल्या भक्तीच्या बलावर स्वरूप पालटतां येतें ही गोष्ट तिच्या भक्तिमान् वडिलांच्या सान्निध्यांत तिच्या मनानें ग्रहण केली होती. अविचलित मनानें पाटलांचा सारा घरगुती कारभार हसनच्या मदतीनें तीच करीत होती. तारेवर तिचें इतकें अकृत्रिम प्रेम होतें कीं अजूनही तिला ती पांडुरंग भक्तीपर अभंग म्हणून गीतें गाऊन निजवीत असे. आजपासून चार महिन्यांनीं तिच्या पोटीं येणाऱ्या योगभ्रष्ट सज्जनाचा अवतार व्हावयाचा होता. भक्तिभावानें पवित्र झालेलें कुलशीलाचें असें पवित्र स्थान दुसऱ्या कोणाच्या वाट्याला येणार?

तारा झोपाळ्यावर शोकमग्न स्थितींत कितीतरी वेळ अश्रु ढाळीत बसली होती. संध्याकाळ झाला होता. समोरच्या विहीरीवर हसन पाणी ओढून

गुरांना पाजीत होता. रहाटाच्या घडघडाटानें तारा विचारतंद्रींतून जागृत झाली व डोळे स्वच्छ धुवून पुसून दिवा लावण्याकरिता घरात गेली. गिरिजाबाई अझून आल्या नव्हत्या. घाईघाईनें तिनें देवाजवळ व इतरत्र घरांत दिवे लावले व एक दिवा घेऊन ती मारुतीच्या देवळाकडे व समाधि मंदिराकडे जावयास निघाली. तिनें मारुतीला प्रदक्षिणा घातल्या व मंदिराकडे वळणार इतक्यात हसन पाण्याची बादली घेऊन आपल्या घराकडे जाताना तिला दिसला.

"कोण, छोटी पाटलीण वाटतं ? बाळ ! मंदिरांत दिवा न्यायला इतका उशीर करूं नये. घरच्या देवांच्याबरोबरच इथं दिवा लागला पाहिजे अंधार पडला आहे, येऊं का बरोबर बेटा !"

तारेच्या समोर उशीराबद्दल उत्तरच नव्हतें. कसें तरी अवसान आणून ती म्हणाली—

"नको ! कांहीं फार अंधार नाहीं, मी येतेंच जाऊन लवकर" पण हसन थोडाच ऐकणार होता ? तो ताबडतोब पुढें झाला आणि मंदिरांत दिवा लावल्यानंतर तारेला घरांत पोंचवून आपल्या बिऱ्हाडाकडे गेला.

तारेनें घरांत पाऊल टाकलें आणि गिरिजाबाई नुकत्याच येऊन देवापुढें हात जोडून उभ्या राहिलेल्या तिला दिसल्या. दिवा लागल्यानंतर लहानांनी वडिलांना नमस्कार करण्याची त्या घराण्यांत वहिवाट होती. तिला अनुसरून तारेनें गिरिजाबाईला नमस्कार केला. देवापुढें जोडलेल्या हातांनींच त्यांनीं तिला मंगलाशीर्वाद दिला.

देवाला नमस्कार करून गिरिजाबाई मारुतीच्या आणि समाधीच्या दर्शनास गेली. आतां तारा देवासमोर एकाग्र चित्तानें ध्यान करून उभी राहिली होती. तिनें आपलें दुःख देवापुढें निवेदन केलें. हें निवेदन करीत असतांनाच तिला हसन नेहमी म्हणत असलेल्या अभंगपदाची आठवण झाली. "देवा ! यावेळीं तुझं सुदर्शन आड आल्यावांचून सुटका नाहीं. भक्तजनवत्सला, तुला आम्ही शरण आहोंत. करुणा कर !" तारेने अत्यंत भक्तिभावानें देवाला हात जोडले. यावेळीं सात्विक भाव दाटून आल्यामुळें तारेचे मुखमंडळ फारच गंभीर झालें होतें. भावतेजानें तिच्या सुंदर चेहऱ्याला आतां व्याप्त केलें होतें. भक्तीचें भाग्य कशा प्रकारें प्रतीत

होतें. याचा तो एक सुंदर नमुना आज देवापुढें उभा होता. तारेनें क्षण-मात्र देवाकडे टक लावली. तिला काय संवेदना पुढें झाल्या असतील त्या असोत, तिनें एक दीर्घ निश्वास सोडला. भक्तिपूर्वक आठवण केल्याबरोबर देव धांवणारच ही तिला निश्चिती वाटली. तिनें तन्मय होऊन "मग तो होऊं नेदी शीण, आड घाली सुदर्शन!" हा अभंगपाद जोरानें म्हटला. 'म्हटला' म्हणण्यापेक्षां तो तिच्या तोंडातून, तिच्या गोड गळ्यांतून आत संवेदनेनें बाहेर पडला. क्षणभर देवघर त्याच नादानें निनादित झालें. तारेचा अभंग चाललाच होता. राधाकृष्णाची गोड गाणी म्हणून ती रोज गिरिजाबाईना रिझवीत असे. पण आज मंदिरांतून परत येत असलेल्या गिरिजाबाईना तारेचा तो स्वर मोहक वाटला. धांवत येऊनच त्यांनीं त्या ईश्वरतल्लीन बालिकेला आपल्या पोटाशीं धरलें. तारा तिच्या खांद्यावर डोकें ठेऊन स्फुदन करीत होती. गिरिजा तिला कुरवाळीत म्हणाली, "माझी भाग्याची लक्ष्मी! ईश्वरभक्तीच हे लेणं तुला मोठं शोभून दिसतं, तारा!" तारा कांहीच बोलली नाही. तिनें आपले डोळे पुसले व ती गिरिजाबाई-कडे नुसती पहात राहिली. "तारा! ईश्वरनामस्मरणांत नेहमींच्या कर्तव्या-कडेही बघाव लागतं बरं का?" गिरिजा हांसत हासत तिच्या गालावर हळू हळू बोटें खेळवीत म्हणाली, चुलीखाली विस्तव पेटीव. मी आलेंच तिकडे लवकर." तारेनें पुन्हां डोळे पुसले व ती स्वयंपाकघरांत गेली. तिनें मुकाट्यानें विस्तव पेटविला. स्वयंपाकाचें सामानसुमान काढून ठेवलें. पाण्याची कळशी जवळ आणून ठेविली. भाजी चिरायला घेतली. हें सर्व करीत असतांना मात्र तिच्या तोंडातून आतल्या आंत "मग तो होऊं नेदी शीण, आड घाली सुदर्शन।" हा चरण सारखा निघत होता. तारा गात असतांना, हसन धार काढीत असताना, त्याचा तर हातच थांबला. गाईनेंही आपलें तोंड तिकडेच केलें होतें. थोड्या वेळानें हसन घरांत दुधाची कळशी घेऊन आला. गिरिजा स्वयंपाक करीत होती. तारा जवळच कांही तरी करीत बसली होती.

हसन तारेकडे पहात पण गिरिजेला संबोधून म्हणाला "आमच्या छोट्या पाटलीणीला गुरू करावं असं मला वाटतं! देतेस कां बाळ मला उपदेश? तुझंच गुणगान केलं तरी मोक्ष मिळेल."

तारेनें लाजून खालीं मान घातली. गिरिजाबाई हंसूं लागल्या. हसन तर हासत हांसतच बोलत होता. "बापूजी ! माझा कां बरं उपदेश नाही मागितला तुम्हीं ?"

"बाळ ! तूं माझी परात्पर गुरु आहेस. या माझ्या गुरूची तूं गुरू आहेस. तुझा कुठं सरळ लाभ व्हायचा आमच्यासारख्या पातक्याला ? त्यांतून मीं—नांवाचा का होईना यव——!"

गिरिजेनें त्याला पुढें बोलूं दिलें नाहीं. "बापूजी ! काय आहे तुमच्यांत तसें ? टाका ना कीं तें नांव ! आपलं यशवंतराव हें नांव घ्या तुम्हीं ! यशवंत बापू ! वा ! छान दिसतंय नांव."

"खरंच बाई ! आपण यांना याच नांवानें हाक मारीत जाऊं आतां यापुढं" तारा म्हणाली.

"वा: वा: शिष्य झाल्यावर एक नवीन नांव ठेवण्याचा कांहीं ठिकाणीं संप्रदाय आहे असें मला माहीत आहे. त्याप्रमाणें माझ्या गुरूच्या आज्ञेप्रमाणें मी आजपासून आपलें नांव यशवंतराव ठेऊन घेतों." हसन विनोदानें म्हणाला. "पण माझी एक अट आहे ती ही कीं माझ्या पांडुरंगापुढें येऊन मलाही दीक्षा दिली जावी. प्रसाद वाटणार आहे मी !"

मुली आतां खूप हंसल्या. "तुम्ही सांगाल तेव्हां येऊं आम्हीं. प्रसाद अगदीं भरपूर हवा अं ! सारी मंडळी येतील प्रसादाला. अण्णाही येईल मोठ्या आनंदानं."

"पांडुरंग समर्थ आहे" असें बोलून अत्यंत प्रसन्न चित्तानें हसन परत बिऱ्हाडीं गेला.



# प्रकरण १७ वें



सूर्यभानाच्या मनाचे हेलकावे सुरूच होते. शिवरावाच्या उपदेशानें त्याचें मन कांहींसें स्थिर व्हावें व त्याला शांत चित्तानें विचार करावयाला थोडा बहुत अवसर मिळावा पण थोड्याच अवकाशांत अशी एखादी घटना त्याच्या समोर येऊन उभी रहावी कीं त्या योगें त्याच्या उतावळ्या मनानें पुन्हां उचल खावी व त्याच्या मस्तकावर त्यामुळें वेदना उत्पन्न व्हाव्या. परवां गिरिजाबाईला स्वतःची फाटकीं लुगडीं शिवतांना पाहून व त्यांतच त्या निर्दय सुईनें तिच्या मस्तकांतून काढलेला रक्तबिंदु पाहून त्याला एवढ्या वेदना झाल्या, व स्वतःच्या निरुपाय स्थितीची त्याला इतकी शरम वाटून त्वेष उत्पन्न झाला कीं भोजनोत्तर तो जेव्हां आपल्या खोलींत एकटा विचार करीत पडला त्यावेळीं त्याच्या मस्तकाचें चक्र अत्यंत जोरानें फिरूं लागलें. धैर्य धरायला सांगणारांची ही त्याच्या मनानें वेड्यांत गणना होऊं लागली. कठोर दैवाची आंच कधींही न अनुभवलेला सूर्यभान सज्जनांवर सारखे संकटाचे व कष्टाचे घाले घालीत असलेल्या देवावर किंवा दैवावर आतां विश्वास ठेवायलाही विचार करूं लागला.

हसनचें गाणें त्याला रडगाणें वाटूं लागलें. शिवरावाचा आत्मविश्वास, ईश्वरश्रद्धा व धिमा प्रयत्न याबद्दल त्याला आदर वाटे पण त्याच्यापुढचें दैव कधीं तरी ओसरेल ह्याबद्दल त्याला शाश्वति वाटत नव्हती. कदाचित तें आणखी कठोर झाल्याचें पहाण्याचें आपल्या नशीबीं आहे काय? असा प्रश्न तो स्वतःला करी व त्यामुळें तो फारच विव्हळ होई. घराण्याला भारभूत होऊन राहण्यापेक्षां आपल्या जीवाचें कांहीं तरी करून टाकावें हाही विचार त्याच्या मनांत अनेकवार येऊन गेला. त्यानें आसमंतात् नजर फेंकली. साऱ्या कर्तव्याच्या दिशा त्याला शून्य भासूं लागल्या. चैनीनें 'भाईके भरोसे' खावें प्यावें व अनुकूल कालाची व आपल्या प्रियकर भ्रात्याच्या गांजणुकीच्या परमावधीची वाट पहावी हेंच का कार्य आपल्यापुढें आहे ? अशा प्रश्नमालिकांनीं त्याच्या मस्तकाच्या शिरा ताठ

झाल्या म्हणजे त्याला सुचेनासें व्हावें व त्याच्या नेत्रांतून आपल्या असहाय स्थितीबद्दल भळभळा अश्रूप्रवाह वहावा. अशाच मनाच्या स्थितींत त्या रात्रीं त्यानें खिडकींतून डोकें काढून वाऱ्याला विनविलें. आकाशांत ढग होते. गढी उंचावर होती म्हणून वारा थोडाबहुत वहात होता. वाऱ्याच्या झुळकीनें त्याला बरें वाटलें. समोरच त्याच्या पूज्य पूर्वजांची समाधी होती. त्यानें तेथूनच तिला नमन केलें. त्या चिरपरिचित तरवारीची त्याला आठवण झाली. "तूं मराठ्याचा बच्चा, संकटांचें आकाश कोसळलें तरी ज्याची मान ताठ रहावी तो तूं बायकांसारखा मुळूमुळू रडतो आहेस ? मनांत आणलं तर लाथ मारीन तेथें पाणी काढीन, अशी धमक ठेविली पाहिजेस ! असें असतां हें काय चालविलं आहेस सूर्यभान ! " असें ती तरवार आपोआप निष्कोप होऊन उभी राहून डोळे वटारून त्याला बजावीत असल्याचा त्याला भास झाला. सूर्यभानाला तें तेज सहन करवेना. त्यानें डोळे मिटले. तरीहि तें दृश्य त्याच्या डोळ्यापुढून हालेना. स्वप्नांतच जणूं काय तो वावरत आहे असें दिसलें. तो ताठ उभा राहिला. तरवारधारणाचा पवित्रा घेऊन त्यानें आपली नुसती मूठच तरवारीप्रमाणें फिरविली. "मोतीचंद उभा रहा ! चाललास कुठें ! अनेक गरीबांना आपल्या पोटांत जिरवून स्वतः श्रीमंत होणाऱ्या भामट्या ! ही बघ समशेर ! हिच्या बळावर तुझें सारं धन लुटून सगळ्या गोरगरीबांना वाटून देतों आणि त्यांना कायमचं काळजींतून मुक्त करितों. स्वतःच्या बडेजावाकरितां गरीबांचें रक्त शोषण करून त्यांना अन्नान्न करायला लावण्याचा तुला कोणत्या कायद्यानें अधिकार दिला म्हणून मी असें करायला भिऊं ? " उदेभानानें वार करण्याचा पवित्रा केला व वाराचा हात जसा खालीं आला तसें कोणी तरी त्याला पकडून उभें आहेसें त्याला दिसलें. "कोण, अण्णा ! "

" होय मीच तो. भानू ! तुझ्या डोक्याची ही आडमाप तव्हा तूं दुरुस्त करणार नाहींस काय ! संकटाची जाणीव नसावी असं कोण म्हणेल? पण त्यांच्या निवारणाचे उपाय म्हणजे सारखा विचार करीत बसणें नव्हे. तुझ्या हृदयाच्या प्रामाणिकपणाबद्दल मला शंका नाहीं पण त्याला असें बेफाम उधळूं दिल्यानें काय होणार ! दैवाच्या रेषा खडूनें लिहिल्याप्रमाणें

का असतात ? त्या पुसायला मानवी प्रयत्न आणि ईश्वराचें अधिष्ठान या दोहोंची जोड लागत असते. प्रामाणिक हृदयाच्या तरुणा ! गरीबीकरिता हृदय तळमळलें म्हणून दरोडेखोरीला नीतिचा आधार कसा मिळेल. हाच विचार तुझ्या ठिकाणीं आज उद्भवला याचें कारण दैवाच्या दुर्विलसिता-बद्दलची चुकीची समजूत. ज्याला दैव अनुकूल आहे अशी तुझी समजूत आहे त्याला दैव अनुकूल नसून दुर्दैव अनुकूल आहे असें समज. दुर्योध-नाला दैव अनुकूल असतें तर त्याचा सत्यनाश झाला नसता. दुर्दैव मायावी असते व त्याचे नजरबंदीचे खेळ सारखे चालू असतात. तुझ्या हृद-याची नैसर्गिक विचारक्रांति कशी होत जाईल याचा मला सुदैवानें बरोबर अंदाज होता. इतिहासानें मला हें चांगल्या प्रकारें दाखविलें आहे व चालू इतर घटनांवरून मी तुला त्याबद्दल सांगितलेंहि आहे. मीं सहज आलो तों दादांनीं तुझ्या आताच्या मनःस्थितीची मला कल्पना दिली. तुला झोंप घेऊं द्यावी व न भेटताच जावें असें माझें मन मला सांगेना. बघतों तो स्वारी विचारक्रांतीच्या एवरेस्ट शिखरावर ! " अण्णानें त्याला कुरवाळून पलंगावर बसविलें. " बरें झाले, तारा येत होती इकडे, तिला परत लावलें तें ! नाहीं तर तुझा वार मोतीचंदाऐवजीं तिच्याच डोक्यांत बसून तिचा कपाळमोक्ष व्हायचा ? तुझ्या सारख्यांच्या विचारक्रांतीचा शेवट असाच होत असतो. "

" अण्णा, क्षमा कर, अलीकडे अगदीं न कळत कां होईना एकांतात असलेच विचार माझ्या मनाला चाटून जात ! आज तर मी अगदीं भांबा-वून गेलों होतों. मी कांहीं वेडं वाकडं बोललों का रे कुणाला ? "

" अरे मोतीचंदावर लख्ख तरवार उगारलीस, वार करणार होतास, त्याची सारी संपत्ती लुटून गरीबाला वाटून देणार होतास–" अण्णा हांसत म्हणाला.

" मी खरोखरच शुद्धीवर नव्हतों अण्णा ! मला क्षमा करिशील ना ? असल्या कल्पना जरी क्वचित् माझ्या मनात येत तरी मी त्यांना थारा देत नसे. अण्णा, खरं सांगतों, या कल्पनेची भुतं तुझ्या स्मरणानं ताबडतोब नाहींशी होत. मी शरमिंदा झालों आहे, मला क्षमा करशील ? " सूर्य-भानानें अण्णाच्या गळ्यांत आपले दोन्ही हात घातले. त्याला कुरवाळीत

शिवराव म्हणाला " भानू! लुटलेली संपत्ती गरीबांना वांटून त्यांना सुखी करण्याच्या कल्पनेंतच तुझ्या दरोड्याच्या कल्पनेचं प्रायश्चित्त आहे! चल, जरा वहिनीकडे बसूं. दोघेही खालीं आले व मागील पडवीकडे जायला लागले. जातांना त्यांना तारा देवापुढें हात जोडून उभी असलेली दिसली. दोघेही स्तंभित होऊन उभे राहिले. " भानू! ही मूर्तिमंत करुणा देवाजवळ उभी आहे पाहिलीस! हिच्या तपश्चर्येचं तेज व गिरिजा वहिनींच्या योगसिद्धीचं तेज तुमच्या कपाळावरील दुर्दैवाच्या रेषा पुसून टाकणार आहेत समजलास?" सूर्यभानाच्या तोंडातून अक्षरच निघेना. तारेच्या मनोहर मुखकमलावर दिव्याचा पूर्ण प्रकाश पडला होता. तिनें डोळे मिटले होते. मुखावर सुंदर स्मित झळकत होतें. तिचा श्वास गंभीररीतीनें एकसारखा मंद चालला होता. कितीतरी वेळ ती तशीच उभी होती. एखाद्या मंत्रमूढाप्रमाणें अण्णा आणि सूर्यभान तिच्यापुढें उभे राहिले होते. थोड्या वेळानें तारेनें हात जोडले, तिनें "मग तो होऊं नेदी शीण" हा अभंगपाद पूर्ण स्फुटपणें म्हटला. दयाघना आपलें ब्रीद राख ही देवाची करुणा भाकली आणि डोळे उघडले तो तिच्यासमोर एखाद्या भक्ताप्रमाणें अण्णा आणि भानू उभे होते. गिरिजाबाई बाजूच्या दारांत हांसत उभ्या होत्या.



# प्रकरण १८ वें

मागील प्रकरणांतील गोष्ट घडून आठ दिवस झाले होते. सूर्यभानाच्या वर्तनांत आतां बराच फरक पडला होता; मात्र तो कुणाशींही कमी बोलत असे इतकेंच. तारेला देवापुढें उभी राहून करुणा भाकणारे तें त्या रात्रींचें दृश्य त्याच्यासमोर अझूनही उभें होतें. काय झालें असेल तें असो भरधांव कल्पनांची भरारी आतां त्याच्या डोक्यांत कल्होळ करीत नसे. अण्णानें न सांगतांही तो आतां शेतीवर जाऊन कामकाज पहात असे. आपल्या शेतकरी मित्रांच्या बरोबर तो कधी कधी नांगर धरीत असे तर अण्णाच्या घरीं किंवा स्वतःच्या घरीं असला म्हणजे त्यानें दिलेली पुस्तकें वाचीत असे. आतां त्याला मोतीचंद अगर माणिकचंद यांना पाहिलें म्हणजे संतापही येत नसे. इतकेंच नव्हे तर आज सकाळीं कचेरींतला बेलीफ कोर्टांतील मोतीचंदाच्या दाव्याचें समन्स घेऊन आला असतां देखील त्यानें उदेभानरावाकरितां शांत मनानें त्यावर सही करून दिली होती. आतां तो पुन्हां आपल्या आवडत्या बिजलीकडे पूर्वीप्रमाणें बघूं लागला होता. रोज संध्याकाळीं तो तिच्यावर बसून फेरफटका करावयास लागला होता; हसनजवळ बसून नाना प्रकारच्या गोष्टी ऐकून मनाची करमणूक करून घेत होता इतकेंच नव्हे तर बरीच रात्र होईपर्यंत तो हसनची एकतारी घेऊन त्याच्याबरोबर भजनही करीत होता. आज श्रावण महिन्याचा शेवटचा सोमवार होता. श्रीमतारुद्रेश्वराच्या देवालयांत रुद्राभिषेक मंत्राचा घोष चालला होता. पूजेला व दर्शनाला जाणारायेणारांची गर्दी सारखी वाढत होती. सूर्यनारायण बराच वर आला होता तरी ढगांच्यामुळें त्याचा प्रकाश क्षीण दिसत होता. अण्णा व भानू देवळाच्या पारावर बसले होते. हसन बिजली घेऊन खाली उभा होता. इतक्यांत माणकचंद चादराणीवर बसून तिकडून येत होता. अण्णाला तिथें बसलेला पाहून त्याला त्याच्या नोबलवर सूर्यभानाला बसवून त्याची खोड मोडण्याची कल्पना आली. हवा चांगली होती. त्यानें अण्णाला हांक मारून म्हटलें. "काय अण्णा! पाटलांची लहर लागते का आमच्या नोबलवर स्वारी करायची?

पाटील जसे या टापूंतले बांकडे स्वार आहेत तसा आमचा नोबल बघितलासच तूं ! अरे वा ! बिजली ही इथंच आहे. हवाही उत्कृष्ट आहे. पूर्वी आपला ठरलेला बेत उरकून टाकूं ! कां पाटील आहे का मर्जी ? ''

अण्णानें सूर्यभानाकडे सहेतुक मुद्रेनें पाहिलें.

सूर्यभानानें संमतिदर्शक मान हालविली. कसलाही घोडा असो त्याला त्याच्यावर स्वारी करण्याची मुळींच भीति वाटत नसे.

'' आणीव घोडा माणक ! '' अण्णानें त्याला सांगितलें.

त्याचा एक नोकर दर्शन घेऊन घराकडे जात होता त्यालाच बोलावून त्याला साईसाबरोबर ' नोबल'ला घेऊन येण्यास त्यानें सांगितलें व चादराणीवरून ताडकन् उडी मारून लगाम तिच्या जिनाला खोंचून तो येऊन पारावर बसला.

चांद राणी फार गरीब जनावर. आपल्याच ऐटींत लगाम चावीत तें त्याच ठिकाणीं पाराजवळ उभें होतें.

माणिकचंदाला तिच्याकडे पाहून अभिमानाच्या उकळ्या येत होत्या पण त्याच्यापेक्षां जास्त सूर्यभानाचें मन त्या जनावरानें आकर्षण केलें. '' काय सुंदर जनावर आहे हो शेटसाहेब तुमचें हें ? ''

'' कसलं, कसलं, तुमच्या बिजलीच्या तोडीचं नाहीं कांहीं ? आतां बिजलीची जात निराळी व ही निराळी. बिजली निम्मी अरब आहे आणि चांदराणी पूर्ण अरब आहे. आहे आपली कशीतरी गरीबाची लहानशी तट्टाणी ! '' सूर्यभानाला आपल्या बिजलीबद्दल भारी अभिमान वाटत असला तरी त्याला चादराणीजवळ जाऊन तिचें कौतुक केल्यावांचून राहवलें नाहीं. तो एकदम पायऱ्या उतरून खाली गेला व त्यानें चांदराणीच्या जवळ जाऊन तिला अत्यंत प्रेमानें कुरवाळलें. तिच्या मानेवर लाडानें थाप मारली. अगदीं ओळखीच्याप्रमाणें तिनेंहि आपली मान त्याच्या अंगाशीं नेऊन हळूहळू घांसायला सुरुवात केली. त्याच्या हनुवटीजवळ तर तिनें आपली मान कितीतरीदां नेली असेल. थोड्याच वेळांत दोघेही एकमेकांचे अगदीं जिगर स्नेही बनले. बिजलीला मात्र ही गोष्ट पहावली नाहीं. ती तेथून त्याच्याकडे डोळे वटारून एकसारखी पहात होती व हिणहिणत होती. सूर्यभान हंसला. '' रागाऊं नकोस, तुझ्यावर कांही मी नाराज

झालों नाहीं. अण्णा ! बघितलास कां बिजलीचा मत्सर ! " लवकर नाचत नाचत 'नोबल' आला तेंही जनावर छान होतें. "देरे पाटलांच्याजवळ लगाम" माणिकनें साईसास हुकूम केला. पाटील इसनला बिजलीची लगाम द्यायला सांगा. इसनचा चेहरा माणिकचंदाला अनुकूल दिसला नाहीं, पण सूर्यभानाच्या सांगण्यावरून कांहींतरी पुटपुटत त्यानें बिजलीची लगाम त्याच्या हातांत दिली. अण्णाही चांदराणीवर स्वार झाला. नोबल मात्र सूर्यभानाला स्वारी करूं देईना. रिकाब घ्यायला जाई तर तो आपला सारखा गरगर फिरायचा. देवळांत येणारी जाणारी मंडळी जमली. माणकचंद हांसत होता.

"काय पाटील ! संभाळत नाहीं वाटतं जनावर ? जरा नवीन आहे स्वारीला. तुम्ही खंदे घोडेस्वार–"

"बिशाद काय लेकाची ! जातोय कुठं ! सोडतों काय त्याच्या बापाला स्वारी केल्यावांचून !" सूर्यभानानं अर्धवट रागावलेल्या मुद्रेनें उत्तर दिलें.

नोबल स्वारी देईना. उड्या घेई, चांवायला धांवे, लाथ मारण्याचा प्रयत्न करी असें त्याचें सारखें चाललें होतें. लोक कुणी हासत तर कोणी त्या घोड्यावर रागावत होते. एक लहानसा तमाशाच त्या ठिकाणीं जमला होता. सूर्यभानाच्या रागाचा पारा आतां बऱ्याच अंशापर्यंत चढला होता. त्यानें इसनला चाबूक आणण्यास सांगितलें.

माणकचंद म्हणाला "हें काय करितां जनावर जास्त बिथरेल" पण सूर्यभानानें त्याच्याकडे लक्ष दिलें नाहीं. त्यानं डाव्या हातांत चाबूक व लगाम घेतली. त्याला साधारण एकदोन चुचकारण्या दिल्या. रिकिब धरून ठेवली व अत्यंत चपळाईनें त्याच्याबरोबर थोडेसे फिरून एकदम स्वारी केली. "आतां कर गमजा काय करायच्या असतील त्या" विजयी मुद्रेनें इकडे तिकडे पहात त्यानें घोड्याला टांच मारिली. ते तिघेही देवगांवच्या सडकेच्या मार्गानें निघाले. नोबलचें वांकडें तिकडें चालणें, आंग चोरणें तोंडांत लगाम दाबून तोंड अगदीं जमिनीपर्यंत लांब नेऊन स्वाराला पाडण्याची खटपट करणें इत्यादि भानगडी चालल्या होत्या. भानूनें त्याच्यांतल्या खोडी ओळखल्या होत्या व तो आतां सावध होता. गांवाशेजारीं असलेलें पटाचें ( शर्यतीचें ) मैदान आलें. तो अत्यंत रम्य असा विस्तृत

भूप्रदेश होता. प्रतिवर्षी संक्रांतीच्या वेळीं शर्यतीकरितां शेंकडों छकडे व घोडे या ठिकाणीं येत असत व त्या सर्वांच्या धांवा होऊन लोक आपापल्या बैलांच्या व घोडयांच्या प्रसिद्धीचा सन्मान घेऊन जात असत. जमीन भुरशी असल्यामुळें चिखल नव्हता. साधारण ओलसर व घोडदौडीला अगदीं उत्कृष्ट अशी ती जमीन होती. मैदानावर पोंचतांच अण्णानें चांदराणी उभी केली व भानूला व माणकला मनमुराद घोडे दौडावायला सांगितलें. अण्णाही कच्चा स्वार नव्हता पण शर्यतींत वगैरे भाग घेण्याची त्याची इच्छा नव्हती. शिवाय चांदराणी बाकीच्या दोन जनावरांबरोबर टिकेलच हेंही त्याला ठरवितां येईना. "चला तर पाटील आपणच जरा उडवूं रपेट!" असें म्हणून माणिकनें बिजली फिरविली. नोबलही निघाली. नोबलनें स्वाराला ओळखलें व आतां तो बेतानें चालत होता. अण्णानें त्याला त्यांतच चार दोन चाबकाचे फटकारेही लगावले. नोबल उसळत चार्ज निघाला. बिजलीनें ही जमीन सरपटत आपला चार्ज सोडला. माणकला वाटे तितकें बिजलीवरचें बसणें सोपें नव्हतें. ती वाऱ्यासारखी निघाली तिला दुसऱ्या घोडयाच्या मागें रहाणें ठाऊक नव्हतें. नोबलला ती मुळीं पुढें जाऊंच देईना. माणक आतां तिला आंवरून धरायला लागला. ते दोघेही मैदानाच्या बाहेर सरळ निघून गेले. देवगांवच्या रस्त्यावरून घोडे भरधांव जात होते. दोन्ही जनावरांच्या अंगांतून घामाच्या धारा निघत होत्या. भानूला आपण मैदान सोडून फार लांब आल्याचें आतां ध्यानांत आलें. त्यानें माणिकला इशारा केला व नोबलला एकदम मागें वळविला. बिजलीही तितक्याच त्वरेनें मागें वळली पण त्यांत माणकचा तोल जाऊन तो धाडकन खालीं आला. बरें झालें की रिकिबीत पाय अडकला नाहीं. बिजली तिथेंच उभी राहिली. जातिवंत जनावर तें हेंच. माणक पडल्याबरोबर सूर्यभानानें पुन्हां घोडा वळविला व ताबडतोब खालीं उतरून त्यानें माणकला कुठें लागलें आहे किंवा काय हें पाहिलें. त्याच्या हाताला मनगटाजवळ फार वेदना होत होत्या. हाड निखळल्यासारखें दिसत होतें व कंबरेंत ही फार कळा होत होत्या. नोबलला त्यानें एका झुडपाला बांधलें. नोबल आतां थंड झाला होता. माणकला त्यानें उठवून बसविलें व त्याच्या हातपायांना धरून त्यानें चांगलें खेचलें. त्याला आपल्या

अंगावर सरळ उभा करून आणखी कोठें लागलें आहे किंवा काय तें बघितलें व त्याला अलगज उचलून त्यानें रस्त्याच्या कडेला बसविलें. "थांबा जरा मी आतां धांवत जातों आणि गाडी घेऊन येतों" असें बोलून सूर्यभान झटदिशीं बिजलीवर आरूढ झाला व वायुवेगानें गांवाकडे निघाला. सूर्यभान एकटाच येत आहे हें पाहून शिवरावला येणाऱ्या शंकेचें तो आपल्या मनांतच निरसन करीत आहे इतक्यांत भानू येऊन त्याच्यापुढें दाखल झाला. "अण्णा, शेटजी पडले, धांव लवकर गाडींत घालून आणायला हवें त्यांना?" दैववशात एका शेतकऱ्याची गाडी तिथून जात होती तिलाच हांक मारून त्यांनीं तिला तिकडे चालविली. अण्णा व भानू आपआपल्या घोड्यावरच होते. थोड्याच वेळानें गाडी माणिकचंद पडला त्या ठिकाणीं जाऊन पोहचली. तो जरा निचेष्टित पडला होता. त्याला तसाच उचलून गाडींत घातलें व हळुहळू गाडी चालवून त्याच्या घरीं आणलें. शेटजी घरींच होते. एकंदर मजकूर कळण्यापूर्वींच त्यांचा सूर्यभानावर राग झाला. तो त्यांनी बाहेर दिसूं दिला नाहीं. अण्णा व भानू यांनीं पुन्हां माणकचंदाजवळ बसून त्याच्या दुःखाच्या ठिकाणीं शेकलें. आंबेहळद व अफू आणवून त्याचा लेप त्याच्या सर्वांगावर लावला व नंतर ते आपापल्या घरीं निघून गेले. माणकला त्यानंतर जोराचा ताप भरला.



# प्रकरण १९ वें

त्या दिवशीं मुलींनीं विनोदानें हसनचें नांव यशवंतराव ठेवलें, पण त्याचा हसनला फारच आनंद झाला होता. तो इतका कीं, आतां निदान घरांत तरी कुणालाही तो हसन या नांवानें हांक मारूं देत नसे. यशवंतराव हें नांव त्याच्या अंतःकरणांतला अणुरेणु आनंदित करून सोडी. त्याला हरवलेलें गवसल्याप्रमाणें या नांवानें होऊन गेलें होतें. त्यानें आपल्या अभंगाच्या बाडावरील हसन हें नांव पुसून त्या ठिकाणीं यशवंतराव हें नांव धारण केलें होतें.

आजच संध्याकाळीं त्यानें मुलींच्या म्हणण्याप्रमाणें पाटलांच्या घरची मंडळी व अण्णा यांना प्रसादाला बोलावलें होतें. आज त्यानें त्याकरितां स्वतः हलवायाच्या घरीं जाऊन उत्कृष्ट मिठाई तयार करून आणविली होती. हत्तीखाना त्यानें सारवून साफसूफ करून सुंदर केला होता. आपल्या पांडुरंगाकरितां एक चांगली फुलांची आणि तुळशीची माळ त्यानें स्वतः तयार केली होती व बुक्का वगैरे सर्व सामानाची त्याच्याजवळ जय्यत तयारी होती. गिरिजाबाईच्याकडून त्यानें दोन फुलवातींचीं निरंजनेंही आणलीं होतीं. उदबत्त्यांचा घमघमाटही उडाला होता. त्याचें भजन झाल्यावर प्रसाद वाटला जाणार होता. अण्णा व सूर्यभान येऊन बैठकीवर बसले. गिरिजाबाई व तारा एका बाजूला घातलेल्या बैठकीवर बसल्या. उदेभानराव कांहीं कागदपत्र पहाण्यांत गुंतले असल्यामुळें प्रसादाच्या वेळेलाच यायचे होते. हसननें—नव्हे—यशवंतरावानें आपले हातपाय स्वच्छ धुतले व आपली एकतारी व चिपळ्या हातांत घेऊन त्यानें भजनाला प्रारंभ केला.

“ कांहीं पडतां जडभारी । दासीं आठवावा हरी ॥
मग तो होऊं नेदी शीण । आड घाली सुदर्शन ॥ ”

हसनचें भजन खूबच रंगांत आलें होतें. तो देहभान विसरून आज अभंग गात होता. उदेभानराव एका खोलींत जुने कागद पहात बसले होते त्यांनाहि भजन स्वच्छ ऐकूं येत होतें. त्यांचेंही लक्ष त्या अभंगानें वेधलें.

तरी काम जरूरीचें म्हणून त्यांचे कागद चाळणें चालूच होतें. निजामच्या राज्यांतील त्याचा वारसा पोंहचेल अशा एका जहागिरी गांवांसंबधीं त्यांना पत्र आलें होतें. त्याकरितां त्यांना विवाक्षित कागदांची जरूर होती. म्हणून ते आज जेवणानंतर त्या खोलींतच कागदांच्या ढिगाऱ्यांत बसून होते. त्यांचे डोळे कागदांवरून फिरत होते तर कानांत "मग तो होऊं नेदी शीण। आड घाली सुदर्शन" हा अभंगपाद दुमदुमत होता. दुसरा अभंग म्हणण्याचें भान यशवंतरावांना नव्हतें तर दुसरा म्हणा असें सांगण्याचें भान श्रोत्यांत नव्हतें इतकी ती मंडळी त्यांत तल्लीन झाली होती. उदेभानराव पुडके पुडके तपासून बाजूला काढीत होते. इतक्यांत विशेष महत्त्वाच्या कागदांची म्हणून ठेवल्यासारखी एक पेटी त्यांच्या हाताला लागली. तिला कुलूप नव्हतेंच. तिला उघडून पहातां फार काळजी पूर्वक बांधलेली पुडकीं त्याना दिसून आलीं. त्यांना उलगडत असतां एक काळजीपूर्वक रेशमी रुमालांत वेष्टन घातलेलें पुडकें त्यांच्या नजरेला आलें. विशेष महत्त्वाचें म्हणून त्यांनीं त्याच्यावरील रुमाल सोडला व त्यांतून कागद बाहेर काढले त्यांत बऱ्याचशा कोऱ्या कागदांच्या वेष्टना-खालीं एक सर्व बाजूंनीं चिकटवलेलें पाकीट होतें. त्यावर काय लिहिलें हें बघतात तों "चि. यशवंतराव शिर्के यांस त्याच्या वयाच्या विसाव्या वर्षी मिळावें." अशीं अक्षरें सुवाच्य मोडींत लिहिलीं होतीं. उदेभानराव त्या पाकिटाकडे सारखें पहातच राहिले. पाकीट चोहोंबाजूंनें चिकटविलेलें होतें. त्यानीं आपला वंशवृक्ष आपल्या मनःश्चक्षूपुढें घातला पण यशवंत-राव हें नांव त्यांच्या घराण्यांत कुणाचेंच नव्हतें. त्याच्या हैद्राबादेकडील वंशजांमध्येंही तें नांव असल्याचें त्यांच्या ऐकिवांत नव्हतें. पाकीट उघडून पहावें असें एकवार त्यांच्या मनांत आलें पण दुसऱ्याच्या नांवाचें पाकीट उघडण्यांत पाप आहे ही गोष्ट त्यांचें पापभीरू मन त्यांना सांगत होतें. "आतां काय करावें? कुणाला नेऊन दाखवावें हें पाकीट? कां द्यावें ठेऊन पुन्हां जिथल्या तिथें?" उदेभानरावांच्या समोर अशा प्रकारचे प्रश्नापाठीं प्रश्न येत होते. एकवार तर त्यांनीं त्याच्याभोंवतीं रुमाल गुंडा-ळला देखील. पुन्हां त्यांनीं तो सोडला. इतक्यांत प्रसादाची वेळ झाली

म्हणून सांगायला खुद्द गिरिजाबाई खोलींत आल्या. हातांत पुडकें घेऊन त्याला उलट सुलट पहाण्यांत उदेभानराव गुंग होते.

"बापूंच्या येथें प्रसादाची वेळ झाली! जायचं कबूल करणं झालं होतं इकडनं! आठवण आहे ना त्याची?" गिरिजाबाईंनीं उदेभानरावांच्या तंद्रीचा भंग केला.

"आलों अँ! चला तुम्ही! पण–हें बघा–जरा इकडं या बरं! हें पुडकं बघितलंत? मोठं गूढ आहे यांत कांहीतरी–याच्यावर चि. यशवंतराव शिर्के असे नांव आहे. आपल्या घराण्यांत कुणी यशवंतराव झाल्याचे माझ्या आठवणींत नाहीं. उघडून बघावं तर पाकीट बंद आहे."

"आठवणींत नसलं तरी ते शिर्के आहेत ना? मग पाकिट उघडण्यांत कसली आली आहे चोरी. नाहीं तरी शिर्के घराण्यांत इकडेच वडिलकी आहे आणि यशवंतराव कोणीही असले तरी त्यांचे वारस सध्यां आपणच आहांत. त्यांत कांही पाप नाही. आपणच आहांत मालक त्याचें! उघडायचं तें पाकीट नि बघायचं काय आहे तें! एवढा विचार कशाला हवा त्याबद्दल!"

उदेभानरावाना युक्तिवाद पटला व त्यांचा हात जरी विशेप घाईनें चालत नव्हता तरी त्यांनीं त्याच्यावरचें चिकटविलेलें वेष्टन काढलें. आत एक थोरली किल्ली व एक पत्र होतें.

"चि. यशवंतराव यांसीः—

अनेक आशिर्वाद उपरी विशेष. तू यावेळी वीस वर्षांचा झाला असशील. हें पत्र हातीं पडेपर्यंत तुला अगदीं विधर्मीयाप्रमाणें रहावें लागलें याबद्दल मला फार वाईट वाटतें. तुला तसें ठेवणें काहीं कारणामुळें मला अवश्य होतें. उत्तर हिंदुस्थानांतून येतांना तुझी आई वारली. ती अत्यंत सालस स्त्री असून उच्च रजपूत घराण्यांतील होती. ती सारी कथा मी येथें लिहीत नाहीं. तुला 'हसन' या मुसलमानी नांवानें मला कां संबोधून ठेवावें लागलें याची कथाही फार लांब असल्यामुळें येथें लिहितां येत नाहीं. एवढेंच सांगतों कीं तूं माझा मुलगा आहेस व तुझ्या आईच्या

इच्छेप्रमाणें तुझें प्रिय करणें माझें कर्तव्य आहे. प्रारंभीं तुझ्याशीं थोडा तुटकपणा दाखविला गेल्याबद्दल तूं मला क्षमा कर. मी यावेळीं स्वर्गीं गेलों असेन. पण राणोजी तुला अंतर पडूं देणार नाहीं. वाटल्यास त्याच्या जवळ रहा, त्याचा भाऊच आहेस, न वाटल्यास तुझी स्वतंत्र सोय आहेच. सोबतची चावी तुझी आहे. ती घेऊन समाधिमंदिरांत जा. समाधीच्या पूर्वेस एक काळा दगड बसविला आहे. तो काढ म्हणजे तुला या किल्लीनें उघडणारें एक कुलूप दिसेल तें उघड व त्यांत दिसेल तें तूं घे. तें सर्व तुझ्या आईचें आहे. व त्यावर तुझा पूर्ण हक्क आहे. जास्त काय लिहूं. सुखी एस व वडील या नात्यानें मुलाबाळांना सांभाळ. हा आशिर्वाद मिति–

मुधोजी पाटील शिर्के.

पत्र वाचीत असतांना उदेभानरावाचें हृदय सारखें विस्मयाकर्षित होत होतें. त्यांनीं ताबडतोब तें पत्र गिरिजेला वाचून दाखविलें. “ हसन बापू आपले सख्खे काका बरं का ? त्यांचं खरं नांवही यशवंतरावच आहे. तारू पोर मोटी भाग्याची आहे. तिला हें नांवच कसं अगदी नेमकं सुचलं ! चल अगोदर ! देवाचा प्रसाद हा बघ असा पावला. ”

गिरिजाबाईही आश्चर्यानें चकित झाली. “ मग इतके दिवस कसं नाहीं बाई कळलं हें ? हें पत्र तर त्यांना त्याच्या वयाच्या विसाव्या वर्षीच मिळायला पाहिजे होतं. थोरल्या पाटलांना माहीत असतं तर त्यांनीं खात्रीनं त्यांचं त्यांना दिलं असतं. ”

उदेभानरावांनीं यावर थोडासा विचार केला. कांहीं आठवल्यासारखं करून ते म्हणाले “ बाबांना मुळीं या पत्राची वार्ताच ठाऊक नव्हती. आजोबांच्या मृत्यूच्यावेळीं त्यांची वाचा दोन दिवस बंद झाली होती असं ते सांगत होते. ते कसल्या तरी गोष्टीकडे खुणेनें दाखवीत असत असें सांगतात. त्याचा कुणालाच उलगडा झाला नाही. आणि हें पत्र असंच दप्तरांत पडून राहिलं. आजचा ईश्वरी योगायोगच म्हणावयाचा ! ”

घाईघाईनें गिरिजाबाई आणि उदेभानराव हत्तीखान्याकडे आले. उदेभानरावांनीं काका ! काका !! म्हणून हसनच्या पायावर डोकें ठेवलें. हसन सुद्धां सर्वजण स्तिमितचर्य झाले.

" काय चालविलं आहेस उदेभान हें. आहे काका मी तुझा पण आज ही उकळी यायला असं काय हातीं लागलं आहे तुझ्या! प्रसाद घे देवाचा!" हसननें उदेभानरावांना पोटाशीं धरलें.

" काका! हें बघा माझ्या हातीं काय लागलं आहे तें. ईश्वर पावला काका! त्यानं इतके दिवस तुम्हांला आमच्यापासून दूर ठेवलं होतं. आतां त्यानं आमचं आम्हांला परत दिलं. देवाची थोर कृपा झाली! 'अण्णा वाच हा कागद!" अण्णानें कागद वाचला. सर्वांनीं हसनच्या पायांवर डोकें ठेवलें. हसन–यशवंतराव सर्वांना कडकडून भेटला. सर्वांच्या नेत्रांतून यावेळीं सारखे अश्रू वहात होते. यशवंतरावांनीं आतां सर्वांना आपल्या हातानें प्रसाद वाटला व तो आपली पांडुरंगाची मूर्ति उराशीं धरून सारखा पांडुरंग! पांडुरंग! सख्या पावलास म्हणून नाचूं लागला. सूर्यभान चमत्कारमुग्ध झाला होता. शिवरावानें नंतर सगळ्यांना समाधिमंदिरांत नेलें. तेथला दगड काढून कुलूप उघडलें व त्यांतून एक सुंदर पेटी बाहेर काढली. पेटी उघडून पहातां तिच्यांत एका खणांत तोंडापर्यंत मोहरा भरलेल्या असून दुसऱ्यांत बहुमोल जवाहिराचे स्त्रीचे दागिने होते. उदेभानानें दागिने यशवंतरावाच्या पुढें ठेविले.

" मला रे काय करायचं आहे या द्रव्याचं! ते सगळं तुमचंच आहे! जा घेऊन ते घरात! मी येतो जरा घोडीचा चारा पाणी पाहून! 'मग तो होऊं नेदी शीण आड घाली सुदर्शन' हा ईश्वराचा मूर्तिमंत साक्षात्कार आहे." घोडीनें फुरफुरून आशय व्यक्त केला. " जीते रहो " असे उद्गार सर्वांच्या तोंडून निघाले. यशवंतराव घोडीकडे जायला निघाला. " काका! आतां राहूं द्या तें काय. घरांत चला?" " दादा मी बघून येतो घोडीकडे स्वतः" सूर्यभान म्हणाला. " तुम्ही नकारे कुणी काळजी करूं त्याची? माझं जें नित्याचं काम आहे तें मीच करणार? माझ्या हातांना चांगला सराव आहे! तुम्हाला कसं झेंपेल तें बाळांनो!" यशवंतराव तबेल्याकडे निघून गेला. मंडळी तबेल्यासमोर उभी राहिली. हसननें घोडीला पाणी दाखवून पुन्हां चारा घालून बाहेर आला व त्याच्यासह सर्व मंडळी वाड्यात राणोजी पाटलांच्या दिवाणखान्यांत बसली. गिरिजा आणि तारा आंत गेल्या. याठिकाणी पुन्हा सर्वांनीं मिळून राहि-

लेला प्रसाद खाल्ला. यशवंतरावांनी अत्यंत भक्तीभावानें व साश्रुनयनानें आपल्या घराण्याच्या कुळस्वामीपुढें—मल्हारीम्हाळसाकांतापुढें—साष्टांग नमस्कार घातला! थोडया वेळानें गिरीजेनें त्यांची पथारी घातली. तारेनें पाण्याचा तांब्या आणून ठेवला व नमस्कार करून जायला लागल्या त्या-वेळीं त्यांच्या दोघींच्या पाठीवरून हात फिरवून "या बानू म्हाळसांच्या पुण्याईनें आजचा हा ऋणानुबंधाचा योग दिसला." असें त्यांनीं उदे-भानरावांना उद्देशून म्हटलें. "ईश्वराची कृपा आणि आपला आशिर्वाद आमच्यावर असला म्हणजे झालें." असें बोलून उदेभानराव झोंपण्यास गेले. अण्णा आज पाटलांच्या येथेंच झोंपला.



# प्रकरण २० वें

दुसरे दिवशीं सकाळीं ही वार्ता साऱ्या गांवभर पसरली. मोतीचंदही विस्मित झाला. त्याचा मुलगाही साधारण बरा होता. त्याला मुका मार बराच बसला होता. सारें विसरून अण्णानें व सूर्यभानानेंही त्याची चागली शुश्रूषा केली. तोही काठी टेकीत टेकीत आपल्या पित्याबरोबर गढीवर आला होता. नानासाहेबांना फार आनंद झाला हें सांगायला नकोच. अण्णा सकाळीं लवकरच त्यांना हें वर्तमान कळवायला आला व त्यांना त्यानतर इतकी घाई झाली कीं प्रथम ते अगोदर गढींत गेले. नंतर बाकीची कामें. तात्यासाहेबांनाही आनंद झाल्यावांचून राहिला नाही. तेही त्यावेळीं गढींत आले होते. उदेभानरावांनीं सर्वांना पानसुपारी केली व यशवंतराव पाट-लांसहवर्तमान सर्व मंडळी श्रीमहारुद्रेश्वराचे दर्शनास गेली. पाटलांनीं शंक-राला महारुद्राभिषेक केला व सगळ्या गावाला जेवण घातलें.

× × × × ×

शिवरावानें केलेली शेती पाहून समाधानच वाटत होतें. शेतें हिरवीगार झालीं होतीं. योग्य वेळीं पाऊस पडल्यामुळें, शिवरावानें बीं चांगलें निव-डक आणून पेरल्यामुळे व पिकाची योग्य ती निगा राखल्यामुळें पिकें आनं-दांत होती व त्याचे सहकारी शेतकरी त्याला आशिर्वाद देत होते. त्याच्या एकंदर कार्याचाही यावेळीं मर्यादित प्रारंभ होता. त्यानें प्रारंभीं लागणारा पैसा कोठून आणला हें त्यानें कोणाला सांगितलें नाही. फक्त नानासाहेबां-नाच तें ठाऊक होतें. त्याच्या कानात नेहमी असणारी बिगबाळी आज बरेच दिवस तेथें नव्हती. व तिच्याकडे विशेषसें कोणाचें लक्ष गेलें नाही.

× × × × ×

मोतीचंदशेटनीं अर्थात्च आपला दावा काढून घेतला. विशेष आनं-दाची गोष्ट ही कीं नानासाहेबांनीं पाटलांचा गांवचा हिस्सा योग्य हिशेब करून त्यांना परत देण्याबद्दल तात्यासाहेबांना खटपट करण्यास विनंति केली. तात्यासाहेबांनींही शेटला तसें करण्याबद्दल सांगितलें. शेटनीं प्रथम थोडें

कां कूं केलें पण नंतर तीन पैंचा हिस्सा आपलेकडे ठेऊन बाकीचा सर्व परत देण्याचें आभिवचन दिले.

× × × × ×

पाटलांच्या घरून नानासाहेब परत घरी येत असतां तात्यासाहेबांनीं त्यांना आपले घराकडून चालण्याबद्दल आग्रह केला. नानासाहेब आणि तात्यासाहेब आज दुसऱ्या वेळेस मोकळ्या मनानें व आनंदानें निरनिराळ्या गोष्टी बोलत बसले. सावित्रीबाईंनी बराच वेळ मनांत घुटमळत असलेला प्रश्न नानासाहेबाना केला. " नाना ! अण्णाचं लग्न करायचंच नाहीं असं ठरविलं आहे कां तुम्ही ! आमचीं लिली घेतां काय पदरांत ? " " त्याची काय शक्ती आहे नाही म्हणण्याची ! काय नाना ? " तात्यासाहेबांनीं हंसत विचारिलें. " ताई ! या ऋणानुबंधाच्या गांठी आहेत. योगायोग असेल तर तसं व्हायला काय हरकत आहे.

" ठरलं बरं का नाना आतां ! येत्या माघमासीं करायचं अँ कायं ! बाबूही येतो आहे तोंवर. " सोयरीक ठरल्याबद्दल एक गोड चहाचा पेला पिऊन नानासाहेब निरोप घेऊन गेले.

× × × × ×

**भाग १ ला समाप्त**

# ऋणानुबंध

## भाग दुसरा

### प्रकरण १ लें

मागील भागात वर्णन केलेली घटना घडून आल्यानंतर पाटलांच्या घरीं आनंदी आनंद झाला हें सांगावयास नकोच. त्या मानानें गांवांतही एकप्रकारचें कुतूहल वावरत होतें. हसनचें यशवंतराव होणें, पाटलांच्या हलाखीच्या स्थितीचें एकाएकीं ईश्वर प्रगट होऊन प्रसाद दिल्याप्रमाणें ऐश्वर्यानंदांत परिवर्तन होणें व त्यामुळें पाटलांची जातीप्रतिष्ठा पूर्वीपेक्षांही जास्त तेजानें सुप्रतिष्ठित होणें हा योगायोग इतका अचानक होता कीं तो विषय त्या लहानशा गांवांत बरेच दिवस पुरला. जसजसा काल जाऊं लागला तसतशी त्याच्यावर प्रत्येक मनुष्य आपापल्या परी कल्पना रचूं लागला. गोखले मास्तरांनीं तर पत्र बनावट असून मोतीचंदाला दिपविण्याकरितां समाधी मंदिरांतील धनाची बतावणी होती असा शोधक बुद्धीपूर्वक निर्णय दिला व थोड्याच दिवसांत खरें भांडवल बाहेर येईल असें खात्रीलायक अश्वासन दिलें. मास्तरांनीं पत्र बघावयास मागितलें तेव्हां सूर्यभानरावानें "तें सार्वजनिक रेकार्ड नव्हे" असा त्यांना जबाब दिला होता. मास्तर म्हणजे त्या गांवचे एक प्रतिष्ठित शिष्ट होते. बरेच दिवस त्याच गांवांतील मराठी शाळेवर ते शिक्षक असून पेन्शन घेतल्यानंतर ते पवनपुरांतच स्थाईक झाले होते. पूर्वीपासूनच गावांतल्या नसत्या भानगडींची उठाठेव करण्याची त्यांना संवय होती. गांवांतील अंतःकलहाचा अग्नि प्रज्वलित करून त्याला सावधानपणानें फुंकर घालण्याचें काम मास्तरसाहेब फारच कुशलतेनें करीत असत. इकडची तिकडे लावालावी करण्यांत मास्तरांइतका कुशल त्यावेळीं तिथें कोणी

नव्हता. शिवरावाच्या गावांत कायमच्या राहण्यानें व त्याच्या तडजोडीच्या व सात्त्विक वागणुकीनें मास्तरांचे पाय बरेच ओढले जात होते. हल्ली मास्तरसाहेब मौनधारी झाले होते. घर बरें, देवालय बरें की आपण बरें अशी बाह्यतः प्रवृत्ति त्यांनीं ठेविली होती. पण त्यांची काकदृष्टि गांवातील बारीकसारीक हालचालींचें निरीक्षण करण्यात सारखी निमग्न असे. पाटलाच्या अचानक उगवलेल्या दैवानें मास्तरांच्या वरपांगी मौनाला जबरदस्त धक्का दिला. त्यांचा स्वभाव त्याना गप्प बसू देईना. मास्तर स्वतःला पुराणमताभिमानी म्हणवीत असत व श्रुतिस्मृतिपुराणोक्त धर्माचे आपण आचार्य आहोंत अशी प्रतिष्ठा मिरवीत असत. त्यातून गांवांतील प्रख्यात आबा भटजी आणि दादा भटजी यांच्यासारख्या पुराणमार्तंडांशी त्यांची थोर सलगी असल्यामुळें या त्रिवर्गानें हल्ली गांवांत एक लहानसें प्रवाहाचें पिल्लू सोडून दिलें होतें. भोळ्या शेतकऱ्यांच्या कानात त्यांनीं असा मंत्र टोकून दिला कीं पाटलांना यवनसंसर्ग झाला आहे व त्यामुळें होणारा सबगोलंकार थांबविण्याकरितां त्यांच्याशीं कोणीही संपर्क ठेवू नये.

" आबाशास्त्री ! आपणच बघा, हे असें कसें होईल ? "

मास्तरांच्या घरीं भरलेल्या एका धर्ममार्तंडाच्या सभेंत चर्चा सुरू होती. " मुलींबाळींनी विनोदानें हसनला यशवंतराव म्हटलें, लगेच जुन्या दप्तरांतून त्याच नांवाचा मुधोजीरावांच्या सहीचा कागद निघाला आणि त्याबरोबर हसनचा यशवंतराव होऊन पाटलाच्या घरादारांत मिरवू लागला! काय म्हणावं याला आतां ? हसन नेहमीं विठोबाची भक्ती करीत असला म्हणून काय झालें ? तेवढ्यावरून कां त्याला हिंदु म्हणावयाचें ? "

" धर्मावर सांप्रत फार थोर संकट प्राप्त झालें आहे ! "

आबाभटजींनी तंबाखूचा बाट भरीत गंभीरपणानें प्रतिपादन केलं. दादाभटजीही दुजोरा देऊं लागले.

अहो, बघा तर आणखीही काय काय भानगडी करताहेत ही नवीन मंडळी ! तो देशपांड्याचा अण्णा बघा की खुशाल आपला पाटलाच्या घरा जेवतो खातो आहे. धर्मावतार राजे नाहीत नाहींतर या वर्णसंकरवाल्याना असा प्रहार केला असता की पुन्हां नांवच काढतेना असल्या गोष्टींचं ! " दादाभटजींचे अगोदरच भांग प्यालेले डोळे आणखी लाल

झाले. त्यांनीं ईश्वराचा धांवा सुरू केला. " परमेश्वरा ! कुठं लपला आहेस बाबा ! हा धर्माचा ऱ्हास तुला कसा सहन होतो ? धर्मसंस्थापनार्थाय संभवामि युगे युगे ! हीं तुझी वचनें तूं विसरलास काय ? यावनी संसर्ग, शूद्र संसर्ग ! ! छे ! छे ! ! डोकें फाटून जातें या विचारानें व असें वाटतें कीं संन्यास घेऊन निघून जावं कुठं तरी, अशीं हीं पातकें डोळ्यांनीं बघण्यापेक्षां ? "

" दादाभटजी ! " मास्तर समजावणीच्या स्वरांत म्हणाले, " काय करायचं, काळच फिरला आहे. बघता आहांतना देशांत कशी बजबजपुरी माजली आहे ती ? मी वर्तमानपत्र वाचतोना ? काय एक एक थेर करताहेत हे देशभक्त म्हणविणारे लोक व त्यांच्या पाठीमागं आंधळ्याप्रमाणें लागणारी ही तरुण मंडळी ! वीट येतो अगदीं, पण करायचं काय, राहिलेले थोडे दिवस कसे तरी डोळ्यांवर कातडें घेऊन काढले पाहिजेत ! "

" आम्हांला नाहीं बघवत हें ? आम्ही नानासाहेबांना स्पष्ट सांगणार की तुमच्याकडून जर याचा बंदोबस्त नीट होत नसेल तर तुमचा आमचा संबंध नको ! " आबाभटजी उद्गारले, आबाभटजी देशपांड्याचे उपाध्यय होते.

" आणि आम्हीहि सांगणार तात्यासाहेबांना की अतःपर आम्हांलाही आपलेकडील वृत्तीबद्दल विचार करावा लागेल. पण हें पहा मास्तर ! आमचे तात्यासाहेब पडणार नाहींत या फंदात. त्यांची वृत्ति फार धार्मिक आहे. त्यांचा बाबू यायचा आहेना विलायतेहून त्याला त्यांनीं लिहिलं आहे अगोदरच की येतांना नाशकास प्रायश्चित्त घ्यावें लागेल. बाबूचेंही पत्र आलें कीं त्याची कबुली आहे त्या गोष्टीला ! एवढा विलायतेचा बालिष्टर पण फार योग्य ! "

" बाबू फार समंजस लहानपणापासून ! माझ्याजवळच शिकलेलाना ! फार गरीब आणि सालस छोकरा " मास्तरानीं शिफारस केली.

त्या बैठकींत अशा अनेक प्रकारच्या गोष्टी झाल्या. आबाभटजी आणि दादाभटजींसारख्या धर्माचार्यांनीं मनावर घेतल्यावर गांवांत ग्रामण्याचा एक नवा कलह उभा राहणार आणि विशेष सल्याकरितां गांवांतील

अडाणी जनसमूहाच्या झुंडीच्या झुंडी आपल्याकडे येणार या गोष्टीचें मधुर चित्र मास्तरसाहेबांच्या मनःचक्षूंसमोर उभें राहिलें. त्रिवर्गांनीं ही पानतंबाखूची आणखी एक फेर झाडलीच. असल्या सभा दररोज भरत जावून धर्मसंरक्षणाच्या या कामांत प्रत्येकानें कंबर कसून प्रयत्न केला पाहिजे असा ठराव होऊन ते संध्याकाळच्या देवदर्शनाकरितां म्हणून महारुद्रेश्वराच्या मंदिराकडे निघून गेले.



# प्रकरण २ रें



गांवांत चाललेली ही कुजबुज अण्णाच्या कानीं नव्हती असें नाहीं पण त्यानें त्याबद्दल कोणाजवळ अवाक्षरही उच्चारलें नव्हतें. बहुधा त्यानें त्या चर्चेला तेवढें महत्त्व दिलें नसेल. पण सूर्यभानाच्या स्वभावाला तें साहवेना. अण्णाच्या घरीं तो व माणकचंद एका प्रातःकाळीं बसले होते. माणकचंद त्यांचा आतां जानी दोस्त बनला होता. माणकच्या आजारांत अण्णानें व सूर्यभानानें त्याची फार काळजीपूर्वक शुश्रूषा केली होती व मोतीचंद शेटनाही त्यांच्या त्या श्रमाबद्दल फार कौतुक वाटत होतें. माणकचें तर हल्ली या दोघांशिवाय पानही हालत नसे. त्याला घरीं प्रत्यक्ष काम असें कांहीच नव्हतें. तेव्हा रिकामा वेळ तो बहुधा या दोघांच्या संगतींतच घालवीत असे. जसजसा माणक यांच्या संगतींत जास्त काळ राहूं लागला तसतसे त्याचे विचार उदार वळणावर जाऊं लागले. अण्णानें त्याला आपल्या जवळचीं चांगलीं चांगलीं पुस्तकें वाचायला द्यावीं व त्याच्याशीं सूर्यभानाप्रमाणेंच तासचे तास निरनिराळ्या विषयांवर बोलत बसावें. प्रचलित राजकीय, सामाजिक, धार्मिक, औद्योगिक वगैरे सर्व प्रकारच्या विषयांवरील चर्चा निरनिराळ्या प्रसंगीं अण्णा करीत असे. अण्णाच्या मतानें त्याच्या आंखलेल्या कार्याच्या प्रतिष्ठेकरितां हे दोन चांगले स्वयंसेवक मिळाले होते. भानूच्या आणि माणकच्या स्वभावाच्या ठेवणींत अंतर होतें. दोघेही मनाचे निर्मळ होते, पण भानू तेजस्वी, चलाख आणि विद्युच्चपल होता तर माणक जरा मंद, आरामी वृत्तीचा पण एकदां एकादी गोष्ट पटल्यानंतर कोणाच्या तरी मागें राहून काम करण्यांत कुचराई न करणारा असा होता. अण्णानें हें मर्म जाणून माणकची मनोभूमिका आपल्या कार्याला लावण्याचें ठरविलें होतें. त्याच्या बुद्धीला झेपेल पण त्याला पटेल अशा विषयांची सुगम मांडणी करून मोठ्या कुशलतेनें त्यानें त्याला आपला भक्त करून ठेवला होता. अण्णा म्हणजे त्याला ही एक आदरणीय व्यक्ति वाटे. दोघेही एकाच गांवचे व एकत्र शिकलेले, लहानपणच्या खेळीमेळींतले पण आजच्या इतका अण्णा त्याला यापूर्वी कधींच प्रिय वाटला

नव्हता. दिवस रात्र अण्णा ! त्याच्या वांचून त्याला चैनच पडत नसे. अर्थात् दृढ परिचयानें भानूचीही त्याच्याशीं मोठी गट्टी जमली होती. आजकाल ते तिघेही घोड्यांवर बसून सायंकाळीं फेरफटका करावयास जात. चांदराणी त्यानें अण्णाकरितांच जणूं ठेविली होती. नोबलला भानूनें वठणीवर आणलें होतें व त्याच्यावर स्वारी करायला आतां माणकला कांहींच अडचण पडत नव्हती. अण्णाला रोज त्याच्या घोडीवर बसून जाणें आवडत नव्हतें पण माणकच्या आर्जवापुढें व निर्मळ विनंतीपुढें त्याचें कांहींच चालेना. हल्लीं बिजलीची बडदास्त तर विचारूंच नका. तिचें सारें सामान नवें करकरीत आणविलें होतें. तिला रतीबही अगदीं रेलचेल चालविला होता. ठाणावरून कसून बाहेर काढली कीं बिजली नुसती नाचत असे. सूर्यभानाच्या स्वारींत तर तिचा तोरा बघायला डोळे सुद्धां पुरत नव्हते. मराठेशाही पोषाख करून जेव्हां सूर्यभान तिच्यावर आरूढ होऊन निघत असे तेव्हां चित्रांतील पहिल्या बाजीराव साहेब पेशव्यांच्या प्रमाणें त्याची ठेवण दिसे. त्याच्या कडे पाहून अण्णानें म्हणावें—

" भानू ! वहिनीला सांगून मला तुझी दृष्ट काढावी लागेल ! कशालारे या अभागी काळांत जन्माला आलास ? स्वराज्याच्या काळांत जन्माला येतास तर आज आम्हांला तुझं चरित्र वाचून पावन होता आलं असतं एवढा पराक्रम तुझ्या हातून झाला असता. "

यावर भानूनें मनसोक्त हंसावें.

" अण्णा ! नुसत्या ऐटीनें का लढाया मारल्या जातात. नुसता बाहेरचा देखावा जर कामाला आला असता तर हल्लींच्या व्याख्यानांतील जळजळीत शब्दांनीं प्रतिपक्षाचे प्रासाद नसते कां जळून गेले ! अण्णा ! क्षमा कर, मी तुझ्याशीं वाद घालतों असें नव्हे. मी बोलतों गमतीनेंच पण मला वाटतं देखाव्यांत भुलावणीच जास्त ? तूं आपला भोळा आहेस झालं ! हा माणकही अगदीं जोधपूरच्या महाराजांच्याप्रमाणें दिसतो मग हाही ऐतिहासिक काळांत जन्माला आला असता तर याच्याही पराक्रमाचें पोवाडे टॉडनें आपल्या इतिहासांत लिहिले असते. खरी गोष्ट ही कीं आम्ही त्या काळाच्या लायकच नव्हतों म्हणून या काळीं जन्माला आलों ! "

" भानू ! फार समंजस बोललास ! माझी खात्री आहे माणकनेंही तूं म्हणतोस तसें नांव काढलें असतें. माझ्या म्हणण्याचा रोख नाहीं समजलास तूं ! कुणाला ठाऊक त्या काळीं तुम्हीं कदाचित् असालही ! तानाजी बाजींच्या मर्दानी पथकांत तूं असशील, बाजीराव साहेब, शिंदे, होळकर यांच्याबरोबर शहाला शह देत किंवा भाऊंच्याबरोबर पानपतावर त्या भीषण रणसंग्रामांत मराठेशाहीचा झेंडा आमरण संभाळण्याचें काम तूं केलं असशील. माणकनेंही राणा प्रतापाबरोबर त्याच्या घोड्याशीं घोडा लावून सम्राट अकबराशीं सामना दिला असेल, नाहीं कुणीं म्हणावें ? मी कोण असेन त्यावेळीं हें मात्र मला सांगतां येत नाहीं. मी त्या वेळेचा तुम्हां वीरांचा घोडा तरी होतों अशी जर मला त्यावेळीं स्मृति झाली तरी मी स्वतःला धन्य समजेन भानू !—"

" अण्णा ! तुझ्या कल्पनेला हल्लीं मुळीं धरबंधच राहिला नाहींसा दिसतो. मी सांगतों, तूही त्यावेळीं श्रीसमर्थांच्या महाराष्ट्र धर्म प्रसारकांचा अग्रणी होतास ! ज्योतिष नको आहे यायला ह्या बाबतींत निकाल द्यायला पण आतां अडलं काय आहे या सगळ्या विचारांचं ! का माणक तुला काय वाटतं ? मागील इतिहासापेक्षां प्रचलित इतिहासाकडेच विशेष लक्ष देणं चांगलं नाहीं का ? " माणक काय बोलणार ? यांच्या परिचयानें त्याला हें संभाषण समजलें असलें तरी त्यांत भाग घेण्याइतका तो अजून तयार झाला नव्हता. त्यानें नुसतें "तुझं म्हणणें खरें आहे" या अर्थाची सूचक अशी मान हलविली. अण्णालाही यावेळीं थोडें हंसू आलें. एकदां सुरू झालेला विषय तो सहसा मध्येंच बंद करीत नसे.

" भानू ! प्रतिष्ठितपणाचें बोललास खरा, पण बाबा ! प्रस्तुत इतिहास हा मागच्या इतिहासाशीं पुनर्जन्मानें सांधलेला आहे. मनुष्याला ज्याप्रमाणें त्याच्या कर्मानुसार दुसरा जन्म येतो असें आपल्या धर्मानें सांगितलें आहे त्याचप्रमाणें पूर्वीचा इतिहास आजच्या स्वरूपांत जन्म पावला आहे. या वेळच्या कर्तृत्वावर पुढील इतिहासाचा जन्म होणार आहे. तुमच्या रुबाबावरून मला पूर्वेतिहास आठवला तसाच पुढील इतिहासाचा जन्म कसा होईल याचा माझ्यासारख्या विक्षिप्त विचार करणाऱ्या माणसाला केवळ आनंद वाटण्याच्या उद्देशानेंच कयास करावासा वाटला. आपल्या

या लहानशा गांवाच्या ब्र्याकरितां जें तुम्ही झटतां त्याची नोंद ईश्वराच्या चित्रगुप्ताच्या वहींत खास होत आहे. काळ आणि परिस्थिति बदलली म्हणून सत्प्रवृत्ति आणि वागणुकीचे नियम थोडेच बदलतात तपशिलांत फरक करणें परिस्थित्यनुरूप अवश्य असलें तरी तत्त्व थोडंच बदलणार आहे ? ”

“ बरं बाबा ! मी बाजीरावसाहेब आहें झालं आणि हा माणक जोधपूरचे महाराज आहेत ! पण ह्या बरोबर तुला ब्रह्मेंद्रस्वामीचें पद आम्ही बहाल करणार आहोंत. हं ! सांग लवकर, कोणत्या किल्ल्यावर हल्ला करावयाचा गुरुमंत्र देतोस आम्हांला ? माणक तयार हो अॅ ! गाफील राहूं नकोस ! ” भानू खोखो करून हांसला, माणकलाही हसूं आलें, अण्णानेंही बारकेंसें गंभीर स्मित केलें. इतक्यांत खरोखरच “ खो, खो ” करीत खोंकलतच आबा भटजी दारांत शिरले. अण्णाच्या खोलीकडे न पहाताच ते एकदम आंत नानासाहेबांच्याकडे गेले.

अण्णानें सहज स्वरांत म्हटलें “ एका जुन्या किल्ल्यावर हल्ला करावा लागेल आपणाला लवकरच ! संध्याकाळीं या अँ, भानू ! माणक ! फुरसत झाली तर तूंही ये. आमच्या शेतांकडे जाऊन येऊं आज ! ” भानू आणि माणक घराबाहेर पडले. अण्णा आंत गेला.



# प्रकरण ३ रें



नागपुराहून आलं कां कांहीं उत्तर ? आतां वाढवायची तरी किती मुलीला ? आधींच उफाड्याची, त्यांतून आतां पंधरावं वरीस लागलं आहे तिला, मर्यादा राहिली कां आतां कांहीं ? पुढं आणखी सिंहस्त आला आहे ? तात्यासाहेब देशमुख सायंकाळच्या फराळाला बसले होते. सावित्रीबाई त्यांच्याजवळ बसून मुलीच्या लग्नाबद्दल त्यांच्याशीं बोलत होत्या.

" मला कांहीं काळजी नाहीं असं कां समजतेस तूं ? वर पाहणं चाललच आहे. जसा ऋणानुबंध असेल तसं येईल जुळून ! आपण कां उगीच काळजी करावी त्याबद्दल ? आतां मुलगी वाढली आहे, लग्न शक्य तितक्या लवकर उरकलं पाहिजे, बरं दिसत नाहीं आपणांला तें ह्या गोष्टी खऱ्या आहेत; पण विचार हा करायला हवा कीं उगीच कुणी तरी मुलगा धरून आणावा आणि लावावं लग्न त्याच्याशीं, असं कां करायचं आहे आपणांला? सगळीकडे पत्रें गेलीं आहेत. मीही लवकर निघणार आहें त्या मोहीमेवर ! कांहीं झालं तरी यंदा लग्न ठेवीत नाहीं हें खचित् ! फाल्गुनांत लग्न करण्याचा माझा निश्चय झाला आहे. "

" माझी गोष्टच उडवून द्यायची असेल तर काय बोलतां येणार मला? पण मी म्हणतें,—पुन्हां यावं लागतं तिथंच—शोधल्यावांचून मुलगा कसा मिळणार ? नुसतीं पत्रं पाठवून कां कुठं कामं होत असतात ? स्वतः एकदां जाऊन मुलं पाहून येणं निराळं आणि याला त्याला पत्रं लिहून आमच्या मुलीकरितां मुलं पहा म्हणणं निराळं ! कुणाला ठाऊक त्यांच्यापैकीं कित्येकांना स्वतःच्याच मुली उजवावयाच्या असतील. स्थळं पहाणार तें तीं स्वतःच्या मुलींकरितां प्रथम कीं आपल्याकरितां ! अलीकडे तर मीं ऐकतें कीं कुणाला चांगली स्थळं माहित असलीं तरी तें सांगत नाहींत दुसऱ्या कुणाला ! "

तात्यासाहेबांना सावित्रीबाईच्या बोलण्यानें थोडें हंसू आलें. तरी त्यांच्या बोलण्यांत असलेली छटा त्यांना जाणवल्या वांचून राहिली नाहीं. त्यांनं

मुलगे बघण्याच्या प्रयत्नाला प्रारंभ केला नव्हता अशांतला भाग नव्हे. त्यांनीं आपल्या स्नेह्यांना आणि कित्येक नातलगांना मुलीच्या टिपणांसहित पत्रें लिहिलीं होतीं पण त्यांच्यापैकीं फारच थोड्यांकडून उत्तरें आलीं होती व ज्यांच्याकडून उत्तरें आलीं होतीं त्यांच्यापैकीं बहुतेक समाधानकारक नव्हतीं. कित्येकांच्या पत्रांचा अर्थच लागत नव्हता. त्यांच्यांतून अर्थच काढायचा झाला तर तो एवढाच निघणें शक्य होतें कीं त्यांचे स्वतःचेच मुलगे लग्नाला योग्य होते व आपल्यालाही सुयोग्य अविवाहित मुलगे आहेत याबद्दलची तात्यासाहेबांची आठवण ताजी करण्याकरितांच त्यांनीं कांहीं तरी शिष्ट विशिष्ट भाषेंत पत्रें लिहिलीं होतीं.

"आपल्या मुलीकरितां आम्हीं स्थळें पहात आहोंतच योग्य वेळीं कळवूं. पण त्यांतल्यात्यांत कळविण्यास आनंद वाटतो कीं आमच्या मोरूला ××× इनादारांची मुलगी सांगून आली आहे. मुलगी जवळ जवळ आपल्या लिलीइतकीच वयानें असून स्वरूपांतही तितकीच चांगली आहे. लिलीला आम्ही लहानपणीं बघितली होती तरी आतां तिला न पहातां हीं आम्हीं तिचं वर्णन करूं शकतो. शक्य असल्यास स्वतः एकवार इकडे येवून जावें म्हणजे दोन चार मुलगे समक्ष दाखविले जातील. इ. इ."

असल्या मासल्याचीं पत्रें तात्यासाहेबांनीं वाचलीं म्हणजे त्यांना सावित्रीबाईच्या बोलण्याची सत्यता ताबडतोब पटे. त्यांचा विचार बाबूला भेटावयास मुंबईस जायच्या वेळीं जें एकदां बाहेर पडायचें तें काय तें नक्की ठरवूनच घरीं परत यायचें, हा होता. नाहीं म्हणायला आजच्या डांकेंत त्यांना एक चांगलें पत्र आलें होतें. नागपुराहून त्यांच्या एका मेहुण्याचें पत्र आलें त्यांत तेथील भाऊसाहेब सुभेदारांच्या मुलाबद्दल त्यांनीं लिहिलें होतें. मुलगा नुकताच बी. ए. झाला होता व लवकर त्याचे वडील त्याला विलायतेस शिक्षणाकरितां पाठविणार असल्याचें त्यांनीं लिहिलें होतें. एव्हांना तो रवानाही झाला असता पण त्याच्या मातुश्रीची इच्छा त्यानें लग्न करून जावें अशी असल्यामुळें व भाऊसाहेबांनाही अनेक कारणाकरितां ती गोष्ट पटल्यामुळें त्यांनीं त्याला येत्या उन्हाळयांत पाठविण्याचा बेत केला असल्याचेंही लिहिलें होतें.

तात्यासाहेबांचें घराणें प्रसिद्धच होतें. पिढीजाद श्रीमंत घरंदाज घराणे

म्हणून त्यांचा लौकिक तर होताच पण खुद्द तात्यासाहेब फार थोर मनाचे, दिलदार आणि सढळ हाताचें जहागिरदार अशीही त्यांची वास्तविक कीर्ति होती. सुभेदार तात्यासाहेबांना उत्तम प्रकारें ओळखीत होते.

" आजच्या दादांच्या पत्रांत सुभेदारांच्याकडील स्थळाबद्दल लिहिलें. मला वाटतं तें स्थळ छान आहे. कशाला वसा हुडकीत उगीच इकडे तिकडे जुळलं तर छान आहे. पण एक थोरली अडचण आहे त्यांत. ते म्हणतात पत्रिका न बघतां लग्न करावयाचं ! "

पत्रिका बघितल्यावांचून लग्न कसं करितां येणार ? कांहीं तरी आपलं करायचं झालं ! नको ग बाई तें पत्रिका पाहिल्यावांचून लग्न करणं ! ग्रह जुळले पाहिजेत बरोबर नाही तर पोरीला कष्ट व्हायचे माझ्या ! " सावित्री-बाई म्हणाला.

" हल्लीं प्रीतिविवाहाची म्हणून एक चाल आहे त्यांत पत्रिका बित्रिका कांही पहात नाहींत. नुसतं गोत्र बघायचं आणि उरकून घ्यायचं ! चांगलं आहे, उगीच यातायात काय कामाची ? नाहीं तरी—"

सावित्रीबाईनीं तात्यासाहेबांना पुढें बोलूं दिलें नाही. " पत्रिका पहा-यची नाही ! कसल्या तरी नव्या नव्या कल्पना काढतात हे लोक कोण जाणे. खडाष्टक असलं तर ! मंगळ असला तर मुलाला ? काय नेम सांगावा. पत्रिका पाहिल्यावाचून कसलं लग्न तें. अडाण्याचं कां लग्न आहे ? लिहायचं उत्तर कीं पत्रिका पाहिलीच पाहिजे. राहील चार दिवस, आतांच कांहीं मोठी घाई नाहीं आली. "

तात्यासाहेबांना आतां हांसू लोटले. फराळ आटपून तें पाणी पीत असतांनाच सावित्रीबाईनीं शेवटलीं वाक्यें उच्चारलीं होतीं. पाणी पितां पितां हंसूं आल्यामुळें तात्यासाहेबांना ठसका लागला. दोन चार वेळा खांकरून खोकून त्यांनीं पुन्हां हंसायला सुरुवात केली.

" आतां मात्र कमाल झाली. इतक्यांतच मुलगी मोठी झाली होती, आतां लगेच ती लहान झाली, कांहीं घाई नाहीं तिच्या लग्नाची वाः वा !!"

"शक्य ते प्रयत्न करून जर नच जुळलं तर पोर लोटून कां द्यायची आहे कुठं तरी ? माझ्या म्हणण्याचा भलताच अर्थ केलांत. मुलगी दोन

वर्षं राहिलेलीं पत्करली पण पत्रिका पाहिल्यावांचून लग्न करणं चांगलं नाहीं एवढं माझं म्हणणं. मी वेडी आहें वाटतं कांहीं तरी बोलायला ?"

तात्यासाहेब हांसतच म्हणाले "तसं नव्हे, मला वाटलं सध्यांच वर पाहण्याच्या भानगडींतून मला विसावा मिळण्याचा योग असला तर तो मला हवाच आहे. पैशाचीही जरा अडचण आहे. थोडक्यांत आटपायचं नाहीं कार्य. म्हटलं बरं होईल कांहीं दिवस गेले तर. बाबू आल्यावर घर संभाळील तो मग आम्ही आहोंत, लग्नकार्यं आहेत, सगळं आहे !!"

पैशाच्या अडचणीची कल्पना सावित्रीबाईंना नव्हती असें नाहीं—पण वाढलेली मुलगी समोर दिसल्याबरोबर त्यांना इतर कोणत्याही गोष्टीची काळजी न वाटतां मुलीचीच काळजी वाटायची. कर्जाची बिशाद काय दोनतीन वर्षं शेती चांगली पिकली कीं त्यांतून मुक्त व्हायला काय उशीर, अशीच तात्यासाहेबांच्या प्रमाणें सावित्रीबाईंचीही कल्पना होती. सावित्रीबाईंची घराण्यांतील महालक्ष्मी म्हणून कीर्ति होती. त्यांचें लग्न झाल्यापासून देशमुखांचीपूर्वींची स्थिती पालटून त्यांच्यावर सुखैश्वर्याच्या दृष्टीनें ईश्वराची कृपा झालेली होती. पण दिवसमान बदलत असतें त्याप्रमाणें हल्लीं देशमुखांच्यावर कर्जाचा बोजा वाढला होता, सालांवर सालं नापिकीची झाल्यामुळें एवढा मोटा जमीनदार हात टेंकीस आला होता. धीराचा पक्का म्हणून काळजीची छटा तात्यासाहेब आपल्या चेहऱ्यावर कधींही येऊं देत नसत. सावित्रीबाईंना धीर देण्याच्या उद्देशानें ते म्हणाले—

"मी आपला उगाच विनोद केला. तशी काळजी करण्यासारखी स्थिति नाहीं. उरकून घेऊं लग्न येत्या फाल्गुनांत. तशी पांच चार हजारांची सोय जुळणारच नाहीं असं नाहीं कांहीं अगदीं"

"मला कसली काळजी म्हणा त्याची पण वाटतं तेंही एखादे वेळेस मी म्हणतें—बोलूं कां ? नाहीं तर रागावायाचं होईल—"

"बोला कीं ! तसं आलं माझ्या ध्यानांत पण बोलाच तुम्ही."

"मी म्हणतें आपल्या अण्णालाच लिली दिली तर ?—जोडा कसा छान शोभेल आणि आपलं गांवांतल्या गांवात ! खर्चही त्या मानानं बराच कमी येईल" सावित्रीबाई बोलल्या पण जरा संभाळूनच अडखळत बोलल्या.

" देशपांड्यांच्या घरीं मुलगी ! छे ! आतां तें होणें नाहीं. " तात्यासाहेबांनीं किंचित् स्मित करीत उत्तर दिलें.

" काय केलंय देशपांड्यांनीं ? अनुवहिनींना जाच केला इतक्या मुली आजवर दिल्या आणल्या तर कधीं तंटे भांडणं झालीं का घराणें बरोबरीचें नाहीं ? काय गौण आहे तिथं ? मुलगाही कसा बत्तिस लक्षणीं आहे. मिळायचा नाहीं शोधूं गेल्यास माझ्या अण्णासारखा मुलगा ! "

" मुलगा छान आहे याबद्दल वाद नाही पण—पण—मुलीला तिथं सुख लाभणार नाहीं. "

" जानकी वागवणार नाहीं मुलीला चांगली असं कां वाटत इकडे ? मी देतें ग्वाही त्याबद्दल ? बिचारीचं दुर्दैव ओढवलं, अनुवहिनी नि दादा असता तर कशाला ऐकावं लागलं असतं असं बोलणं " सावित्रीबाईच्या डोळ्यांतून अश्रूंचा प्रवाह वाहूं लागला. तात्यासाहेबांनाही गहिंवर आला.

" मी जानकीबद्दल नाहीं बोललों कांहीं. ती पोर केवढी सद्गुणी आणि सज्जन आहे हें मी जाणत कां नाहीं. ती तुमच्या आमच्यापेक्षां जास्त प्रेमानें मुलीला वागवील. माझं म्हणणं निराळ्याच मुद्यावर आहे. बरं ज़ा आतां तुम्ही. अण्णा काय जवळच आहे. आंणूं धरून आणि लावून टाकूं लग्न तशी वेळच आली तर! नानाची काय छाती आहे मी म्हटल्यानंतर नाही म्हणायला ? पण सध्यां जरा त्यांत बऱ्याच भानगडी आहेत. समजूत पटलीना ? माझं त्या घराण्याबद्दल किंवा त्या माणसांबद्दल कांहीं एक विरुद्ध मत नाही. अडचण आहे ती निराळीच. सांगेन एखादे वेळेस ! "

सावित्रीबाई जावयास उठल्या. सुपारीची डबी त्यांनीं तात्यासाहेबांपुढें ठेविली आणि घरांत जायला म्हणून मागें फिरताहेतशा दिसल्या तरी त्यांच्यानें तेथून जाववेना. तात्यासाहेबांनीं त्यांचा आशय ओळखला.

" सांगितलं ना एकदां सारं. तुझ्या माहेरच्या माणसांबद्दल एखादा-शब्द चुकून निघून गेला असला तर त्याबद्दल क्षमा मागूं का ? "

" क्षमा कसली मागायची त्यांत पण स्पष्ट बोलायला काय हरकत. असली कोणती गुपित अडचण आहे ती सांगण्यासारखी असली तर म्हणते— "

तात्यासाहेबांना आतां बोलल्या वांचून गत्यंतर नव्हतें. ते हळूच म्हणाले "नानासाहेब आतां अगदीं गरीब झाले आहेत. लवकरच मोतीचंदाकडून—"पुढें त्यांच्यानें बोलवेना. त्यांनाही ते शब्द उच्चारतांना वाईट वाटत होतें. "अण्णा मला दिसत नव्हता काय? कशाला स्थळं पहाण्याची मी यातायात केली असती पण मुलीचंहि सुख पाहिलं पाहिजेना? तथापि एवढं बरीक मी सांगतों कीं त्यासारखं स्थळ लिलीला क्वचितच मिळेल."



# प्रकरण ४ थें

आबाभटजी नानासाहेबांना भेटायला म्हणून आले पण त्यावेळीं नानासाहेब घरीं नव्हते. त्यांच्या बैठकीवर ते दिसले नाहींत म्हणून ते घरांत जानकीबाईकडे गेले. जानकीबाई सोमवाराच्या उपासाकरितां राजगिरा निवडीत बसल्या होत्या. राजगिरा पाखडून त्याच्यावर फुंकर घालायला त्या साधारण वर तोंड करितात तों त्यांना आबाभटजी येतांना दिसले. जानकीबाईनीं त्यांना नमस्कार केला. भटजींनीं काय आशिर्वाद दिला तो मात्र ऐकायला आला नाहीं. विधवेकरितां आशिर्वाद!!तिला काय करायचें आहे आशिर्वादांचं ! "कितीही कष्ट झाले तरी ते मुकाट्यानें सोसण्याची शक्ती तुला प्राप्त होवो; समाजाची, घरच्या मंडळीची केवढींही कठोर बोलणीं ऐकून त्यांतच समाधान मानण्याइतकी निःसीम निष्ठा तुला प्राप्त होवो, स्वप्नांतही सुख न चिंतण्याइतकें तुझें मन घट्ट होवो, तूं उपासतापास काढून दुसऱ्यांना पंचपक्वान्नांचें भोजन घातलेंस तरी तुझ्याकरितां मायेचा एकतरी अश्रु ढाळणारा कोठलाही प्राणी तुला प्राप्त न होवो" इत्यादि विचार ग्रथित करणारे शास्त्रांतर्गत आशिर्वाद आबाभटजींना परिचित नव्हते. नाहींतर ते आशिर्वाद देण्याचें तें आपलें कर्तव्य केल्यावांचून राहातेना ! जानकीबाईनीं भटजीना बसावयास पाट आणून दिला व त्या एकीकडे जाऊन बसल्या.

" नानासाहेब कुठं गांवाला कां गेले आहेत ? जानकी ! "

" नाहीं, गांवींच आहेत. शेतावर गेले आहेत सकाळीं. येतील आतां इतक्यांत. बसा तुम्ही. तोंवर मी थोडा चहा करून आणतें तुमच्याकरितां" जानकीबाई चहाकरितां स्वयंपाक घरांत जाऊं लागल्या.

" मी आतांच घेतला आहे चहा मास्तरांच्या इथं पण तूं करते आहेस तर मला घ्यायला हरकत नाहीं. यजमानाचं घर नाहीं कसं म्हणावं ! पण लवकर करून आण अं ! मला जायचं आहे निकडीनं ! "

जानकीबाई आत गेल्या. भटजींनी घराचं निरीक्षण चालू केलं. खुंटीवरील धोतरें, उपरणीं, कोनाड्यांतील बाटल्या व डबे, चौकांतील तुळशीवृंदावन देवघरासमोरील तसबिरी वगैरेचें निरीक्षण करून झालें. पण त्यांना हवी ती वस्तु दिसेना. अखेरीस देवघरासमोरील एका कोंपऱ्यांत त्यांना पानसुपारीचें तबक दिसलें व त्यांना आनंद झाला. ते चटकन उठले व तें तबक उचलून घेऊन येऊन पुन्हां पाटावर बसले. तबक व त्यांतील डब्या भरलेल्याच होत्या. भटजींनी त्या पिकलेल्या पानांचा फडशा उडवायला आरंभ केला. सुपारी कातरून एकदांच तोंडांत टाकली व अर्ध्या अर्ध्या पानाच्या छोट्या सुरळ्या चावायला आरंभ केला. त्यांतच चिमुटभर तंबाखूही भरली. त्या वेळची भटजींची मुद्रा दुसऱ्याच्या शेतांत मोकाट सुटलेल्या अप्रतिबद्ध गुराप्रमाणें समाधानाची दिसत होती. पट्टी तयार करावी व ती तोंडांत टाकून वर पाहून मान इकडे तिकडे फिरवीत अगदीं पूर्ण स्वातंत्र्याचा उपभोग घेत घेत त्यांनीं तिला चावावी असा क्रम चालला होता. माडीवर जातांना अण्णानें भटजीला पाहिलें तरी त्यानें तिकडे लक्ष दिलें नाहीं. अण्णा परतला तेव्हां भटजी मुळीं डोळे मिटूनच चर्वणक्रिया करीत होते अर्थात् त्यांनी त्याला पाहिलें नाहीं. तो सरळ आपल्या खोलींत येऊन बसला. पानतंबाखूचें मनःपूत चर्वण करून संतुष्ट झाल्यावर भटजी दुसरा हप्ता सुरू करणार इतक्यांत जानकीबाईंनी चहाचा प्याला आणून त्यांच्यापुढें ठेविला. कपबशी पितळी होती.

" वः फार समंजस मुलगी आहेस तूं जानकी ! केवळ तुझ्या इथेंच मला चहा घ्यावासा वाटतो. नाहींतर त्या मातीच्या खापरांतून चहा पितात सगळीकडे ! शिवाशिव, तो भ्रष्टाकार बघवत नाहीं. मातीचं भांडं, एकदां उष्टावलं कीं फेंकलं पाहिजे हें शास्त्र आहे पण लक्ष कोण देत तिकडं ! अलीकडे हा भ्रष्टाकार माजलेला पाहिला म्हणजे कुठं पाणीसुद्धां पिऊं नये असं वाटतं " भटजींनी बशी तोंडाला लावली. जानकीबाई यावर कांहींच बोलल्या नाहीत. त्या नम्रपणें भटजीसमोर उभ्या होत्या. त्यांच्याकडे पाहिलं म्हणजे ह्या कोणी तरी शापित देवता आहेत असें वाटे. वैधव्यामुळें जरी त्यांच्या मुखावर एक प्रकारची उदासीन छाया पसरली होती तरी त्यांचा तो मूळचा गौरवर्ण सुंदर चेहरा त्यांच्या पातळाच्या पांढऱ्या

पदराखालून एखाद्या योगिनीप्रमाणें खुलून दिसत होता. त्यांच्यासमोर पापानें आसमंतात् वावरण्याचें धैर्यच करूं नये म्हणून कीं काय विधात्यानें त्यांना विस्तृत आणि मोठाले डोळे प्रदान केले होते. कमलनेत्रांची उपमा त्या ठिकाणीं सार्थ होत होती. त्यांची नेहमींच अर्धवट अधोदृष्टी असे. यावेळीं त्या तसलीच दृष्टी लावून उभ्या होत्या. त्या स्वतः होऊन कधींच कुणाशीं बोलत नसत पण कुणी बोललें तर शक्य तितकें थोडक्यांत योग्य तें उत्तर मात्र त्या बिनचुक देत. भटजींचा चहा घेऊन झाला. व पुन्हां त्यांनीं पानसुपारीचें तबक आपणापुढें ओढलें.

" वाहवा ! जानकी, चहा करावा तूंच ! तुमच्या इथल्यासारखा चहा कुठंच होत नाहीं. मास्तरांच्या येथला चहा कसला चहा तो. काढा होतो झालं एक प्रकारचा ! तशांत त्या भांड्यांना कसली तरी कळकट घाण येत होती. करायचं कसं, आणलं समोर म्हणजे घ्यावं लागतं ! बाकी जानकी तुझ्या हातचा चहाच काय पण कोणताही पदार्थ खाल्ला म्हणजे मन कसं अगदीं तृप्त होतं. कुठलंही केवढयाही दक्षिणेचं निमंत्रण असलं तरी तें सोडून मला तुमच्या इथंच जेवायला यावंसं वाटतं ! मोठी सुग्रण आहेस तूं ! " भटजींनी पट्टी तोंडांत कोंबली व तंबाखू डाव्या हातावर घेऊन त्यावर चुना घालून ते तो चोळूं लागले.

" मला कसला चांगला स्वयंपाक येतो. सासूबाईच्या हातचं जेवण तुम्ही जेवलांच आहांत. त्यांच्या हाताखालीं काम करून आलं मला कांही थोडसं ! देवानं त्यांना इतक्या लवकर नेलं " सासूबाईच्या आठवणीबरोबर जानकीबाईला जी दुसरी भयंकर आठवण यायची तिच्या योगानें तिच्या डोळ्यात अश्रूंनीं गर्दी करून सोडली. तिच्या विशाल अश्रूप्रपूरित डोळयांच्या रूपानं एक सरोवरच निर्माण झालें व त्यांतून उगम पावणाऱ्या एखाद्या निर्झरिणीप्रमाणें त्यांतून सारखा अश्रूंचा प्रवाह वहायला लागला. निर्मल आकाशाप्रमाणें भासणाऱ्या तिच्या विशाल भालप्रदेशावरील सूर्य तिच्या नेत्रांत जणूं काय उतरल्यामुळें त्यांतलें पाणी चटके बसतील एवढें उष्ण झालें होतें. घरांत बायकोमाणूस दुसरें कोणीच नसल्यामुळें व कुळधर्म, कुलाचार, नैवेद्य, वैश्वदेवाची परंपरा त्या घराण्यांत आस्थापूर्वक चालू असल्यामुळें स्वयंपाकाची अडचण भासूं लागली व त्या अडचणीच्या निवारणार्थ जानकी-

बाईनीं स्वतःच तात्यासाहेबांच्या मागें लागून रामटेक क्षेत्रीं जाऊन श्रीरामचंद्राचे पायांवर आपला केशभार अर्पण केला होता. त्या प्रसंगीं नानासाहेबांना व अण्णाला जें दुःख झालें त्याचें वर्णन कोठवर करतां येणार ? नानासाहेब जरी जुन्या मताचे होते तरी केशवपनाच्या या रूढींत–भटजींनीं शास्त्र म्हणून प्रतिपादिलेल्या या अशास्त्रीय व सर्वथा निंद्य रूढींत–मोक्षाची जागा कुठें आहे हें त्यांना कळेना ! नानासाहेबांनीं मोठ्या कष्टानें त्या गोष्टीला संमति दिली व त्यामुळें स्वतः न पटली तरी त्यांच्या मनाला हरकत घेण्याचें धैर्य त्याला त्या वेळीं झालें नाहीं.

जानकीबाईच्या डोळ्यांतून सारखा अश्रुपात होत होता व भटजी निर्विकार मनानें विड्याचें चर्वण करीत होते. जानकीबाईच्या डोळ्यांतील अश्रू त्यांच्यासमोर जमीनीवर पटापट पडत होते. भटजींच्या जवळ थोडेंबहुत काळीज शिल्लक राहिलें होतें म्हणून म्हणा किंवा कांहीं तरी बोललें पाहिजे म्हणून म्हणा भटजींना थोडे तरी सांत्वनाचे शब्द उच्चारावेसे वाटले.

" जानकी ! आतां दुःख करून काय उपयोग ? झालेल्या गोष्टी ईश्वराधीन असल्यामुळें आम्हां मानवांच्या हातांत आतां काय राहिलं आहे ! अनुसूया वहिनींसारखी सासू आणि दादासारखा नवरा मिळायला पूर्वजन्मीचं मोठं पुण्य पाहिजे ! दुःख आंवर ! हें सगळं घर तुलाच आतां संभाळावं लागणार आहे. अण्णाच्या लग्नाच्या गोष्टी ऐकतों आहे गांवांत, आली का मुलगी सांगून एखादी ? "

जानकीबाईनीं अश्रू आवरते घेतले होते. त्यांचे डोळे जरी अगदीं कोरडे झालेले नव्हते तरी अश्रू आंत झपाट्यानें परतत होते.

" मुली येताहेत सांगून पुष्कळ. त्यांच्या लग्नाची कसली काळजी नाहीं. त्यांचं लग्न न होतं थोडंच आहे ? "

" आणि मुलीच्या लुगडींचोळ्यांची आतांपासूनच व्यवस्था करीत आहेस वाटतं. चतुर आहेस ! " भटजींनीं खुंटीवर लटकत असलेल्या अर्धवट शिकलेल्या जरीकांठीं हिरव्या चोळीकडे बोट दाखवून विचारलें.

" त्याची तयारी पुन्हांपासून कशाला करायला हवी. लग्न ठरलं कीं सर्व तयारी व्हायला विलंब कसला लागणार ? ही चोळी पाटलांच्या गिरिजाबाईकरितां शिवीत आहे मी ! तिचं डोहाळेजेवण व्हायचं आहे लवकरच. "

" होय कां ? ठीक आहे. पाटलांचं दैवही आतां चांगलं आहे. तुमचा त्यांचा मोठा घरोबा तेव्हां कांहीं तरी केलंच पाहिजे प्रसंगानिमित्त " भटजींचें पट्ट्या चावणें चालूच होतें.

" आमच्या इथंच करायचं ठरविलं आहे तें भावोजींनीं. नानासाहेबही मळ्यावर भाज्या, केळीचीं पानें, फुलं आणण्याकरितांच गेले आहेत. परवांचा दिवस ठरला आहे. "

भटजींनीं आ वासला! ते जवळजवळ पाटावर उडी मारून बसल्यासारखे ताट बसले! " डोहाळेजेवण? पाटलांचं? तुमच्या घरीं! ब्राह्मणाच्या इथं? आणि नानासाहेबांनीं संमति दिली? " भटजींनीं प्रश्नांची फैरच झाडली. जानकीबाईही शांतपणानें बोलूं लागल्या.

" काय झालं त्यांत? तीं माणसं नव्हत वाटतं! त्यांतून परके असते तर एकापरी म्हणतां आलं असतं. पण त्यांचा आमचा पिढ्यानपिढीचा घरोबा. इतक्या वरसांत पहिलं मूल होणार बिचारिला, कमळजा मामी असत्या तर कशाला झालं असतं हें कार्य इथं तिथं! त्या असत्या तरी आम्हांला आमच्या घरीं तिला बोलावून चोळी शिवणं भागच होतं. "

" वाग पोरी वा? अग तुम्ही ब्राह्मण ते मराठे "—

" मग, ते काय आमचं ब्राह्मणपण हिरावून घेत आहेत कां आपलं मराठेपण देत आहेत आम्हांला! मला नाहीं बाई कळत हें शास्त्र. " जानकीबाई सणसणीत बोलल्या, भटजींचा पारा गरम झाला. जानकीबाईकडे न पहातांच ते उद्गारले—

" सर्वांनाच शास्त्र कळूं लागल्यावर मग तें शास्त्रच कसलं. अग पोरी! शास्त्रं सांगण्याकरितांच ना आमच्या सारख्यांची योजना आहे! जा, या, त्यांच्याकडे. पण घरांदारांत काय हा गोंधळ? मी आलों होतों नानासाहेबांच्याकडे बऱ्याच गोष्टी बोलायला. त्यांत आणखी हें एक निराळंच प्रकरण ऐकायला मिळालं. ठीक आहे. वा! " घाईघाईनें दोनतीन पट्ट्या तयार करून घेऊन भटजी पाटावरून उठले व घराबाहेर पडले. जानकीबाईंना पाठीमागूनच त्यांना नमस्कार करावा लागला.

---

# प्रकरण ५ वें



यशवंतराव मुसलमान नसून हिंदु आहेत ही गोष्ट कळल्यानंतर पाटलांच्या घरांतील मंडळींना अत्यानंद झाला व फार दिवसांचा आपला मनुष्य केवळ नांवापुरता का होईना दूर होता तो आपल्या गोतांत मिळाला व तोहि घरांतील वडीलकीच्या नात्यानें, यामुळें तर उदेभानरावांना फारच हलकें वाटलें. त्यांनीं हत्तीखान्यांतून त्यांचें बिऱ्हाड वाड्यांत आणलें पण त्यांच्याच सांगण्यावरून तें पुन्हां हत्तीखान्यांत परत न्यावें लागलें. यशवंतराव फक्त स्नान, भोजन, देवदर्शन व इतर कामें एवढ्याकरितांच घरांत जात असत. एरवी त्यांची निजण्याबसण्याची जागा म्हणजे त्यांचा आवडता हत्तीखाना. हत्तीखान्याचें स्वरूप मात्र यावेळीं पालटलें होतें. पूर्वीची ती एक जुनी पुराणी जागा राहिलेली नसून आतां तिचें एका चांगल्या खोलीत रूपांतर झालें होतें. तिच्या भेगा पडलेल्या भिंती भरल्या गेल्या होत्या. पूर्वीच्या विटांच्या कमानीच्या छताची दुरुस्ती झाली होती. दोन नवीन खिडक्या पाडल्या गेल्या होत्या. आंतून गिलावा केला गेला होता; त्यावर सुंदर सफेदी दिली होती व रंगाच्या साध्याच पण भरदार रेघा भिंतीवर मारल्या होत्या. त्यांची विठ्ठलाची तीच तसबीर कायम होती पण तिचा कोनाडा आतां चांगला उत्तम मिहिरपदार बनविला होता. त्याच्यावर ॐ हीं अक्षरें लिहून त्याच्यावर हळदकुंकवाचें सुंदर स्वस्तिक तारेनें काढलें होतें.

संध्याकाळचा समय होता. देवदर्शन व समाधीचें दर्शन घेऊन व बिजलीला थापटूनथोपटून यशवंतराव आपल्या बैठकीवर येऊन बसले होते. त्यांच्या बैठकीकरितां एक चांगलें चौरस जाजम, त्यावर एक धाकटा गालीच्या व भिंतीशीं दोनतीन लोड ठेवलेले दिसत होते. बाजूला एक चांगला मोठा पलंग अगदीं स्वच्छ पलंगपोस घातलेला ठेवलेला होता. ती जागा उदेभानरावांनीं आपल्या वडिलांच्या बैठकीच्या जागेइतकीच काळजीपूर्वक तयार केली होती.

यशवंतरावांनीं आपलें उपरणें लोडावर ठेवलें व ते एक उसासा टाकून गालीच्यावर बसले. त्यांच्या हनुवटीवरील पूर्वीची दाढी जाऊन डोकीवर एक लहानसें शेंडीचें चक्र विराजमान झालें होतें. त्यांच्या भव्य कपाळावर गंधाचा ढळढळीत टिपका दिसत होता. त्यांच्या मिशाही भरदार होत्या. त्या रुबाबांत ते अगदीं थोरल्या पाटलांप्रमाणें दिसत होते. बैठकीवर ते बराच वेळ विचारमग्न स्थितींत बसलेले होते. त्यांच्यासमोर पांडुरंगाची तसबीर ठेवलेला कोनाडा होता. त्या शामसुंदर मूर्तीकडे त्यांनीं सारखी टक लाविली होती. ते गोजिरें रूप पाहून त्यांना नेहमींच सात्त्विक भाव दाटून येत असे. त्यांची वैखरी जरी मुग्ध होती तरी त्यांच्या आंतर्वाचा यावेळीं "रूप पहातां लोचनीं, सुख झालें हो साजणी" हा अभंग म्हणत होत्या. तें "सकल सुखाचें आगर" जणू त्यांच्याशीं बोलत होतें. "बहुतां सुकृताची जोडी। म्हणुनी विठ्ठलीं आवडी।" या अभंगपादावर तर आतां त्यांचें मन तल्लिन झालें होतें. त्यांच्या डोळ्यांतून भक्तीचे अश्रू वहात होते. इतक्यांत बिजली फुरफुरली व ते भानावर आले. त्यांनीं उपरण्यानें आपले अश्रू पुसले व ते आपल्याशींच बोलूं लागले---

"पांडुरंगा, मला केवळ परक्या नांवाचीच शिक्षा देण्यांत तुझा काय बरं हेतु होता? मी तुझाच होतों ही गोष्ट मला ठाऊक होती; पण त्या परिस्थितीच्या मोकळेपणाचा अधिकारी मला कां होतां आलें नाहीं? आजही नारायणा! माझ्या चित्ताला पूर्णपणें समाधान कां वाटत नाहीं? तूं मला आपलं म्हटलंस, माझ्या मुलां माणसांत तूं मला नेऊन सोडलंस तरी ते देतात तो वडीलपणा मला न्यायानं स्वीकारतां येण्यासारखी माझी खरी योग्यता आहे काय? मी शिर्के खरा, पण 'खरा शिर्के' आहे का मी?"

किती तरी वेळ यशवंतराव अशा रीतीनें उद्गार काढीत एकसारखे पांडुरंगाकडे टक लावून बसले होते. त्यांना बदललेल्या परिस्थितीनें आनंद झाला होता तरी त्यांच्या अंतर्यामांत समाधान नव्हतें. त्यांना वाटे "आपण मुलानी सज्जनपणानें दिलेल्या वडीलपणाच्या मानाच्या लायकीचे आहोंत किंवा नाहीं? आपली माता घरंदाज कुलवंत रजपुत कन्या असली तरी ती मुधोजीरावांची विवाहिता स्त्री असल्याचा पुरावा आपल्याजवळ नाही? तसें असतें तर आपणाला यावनी नांव देऊन दूर कां ठेवण्यांत आलें

असतें ? " एकावार त्यांना वाटे " आपण ' हसन ' होतों तेंच बरें होतें; पण त्यांना पुन्हां वाटे, ईश्वर करीत आहे त्याला अनुसरून त्यानें दिलेल्या स्थितीला झिडकारण्याची कल्पना करण्यांत आपण त्याचा गुन्हा करीत आहोंत. जे आपण नव्हतों व ज्याप्रमाणें आपण साऱ्या आयुष्यांत वागलों नाहीं त्याच्या खोट्या आवरणांतून परमात्म्यानें हा ऋणानुबंधाचा धागा जुळवून आणला याबद्दल त्याला धन्यवादच दिले पाहिजेत. त्याची इच्छा असल्यास त्याच्या कृपेनें कदाचित् पुढील धागेही उकलले जाण्याचा संभव आहे. " असला विचार आला म्हणजे त्यांना समाधान वाटे व ते त्या लहरींत पांडुरंगासमोर बसून आपली आवडती ओळ " बहुता सुकृताची जोडी । म्हणुनी विठ्ठलीं आवडी । " मोठमोठ्यानें म्हणून पांडुरंगनामाचा जयजयकार करीत असत. कृतज्ञतेच्या अश्रूंनीं त्यांचे डोळे भरून जात आणि " कांही पडतां जड भारी । दासीं आठवावा हरी । मग तो होऊं नेदी शीण । आड घाली सुदर्शन । " यांत वर्णन केल्याप्रमाणें ईश्वरी साक्षात्काराचें प्रत्यक्ष स्वरूप अनुभवास आल्याच्या भाग्याचें—त्या भक्तासच जाणीव होत असलेल्या भक्तिभाग्याचें—त्यांच्या डोळ्यांत सात्त्विक तेज सांचत असे.

आज याच तंद्रींत ते रममाण होते. ते भानावर येऊन आपल्या नेत्रांतले अश्रू पुशीत आहेत इतक्यांत " बापूसाहेब ! जेवण तयार आहे, " असें तारा दारांत येऊन म्हणाली.

" चल, आलों बाळ !" असें म्हणून यशवंतराव पुन्हां उपरणें अंगावर घेऊन तारेच्या मागोमाग वाड्यांत गेले.



# प्रकरण ६ वें

पाटलांच्या गिरिजेचें डोहाळेजेवण देशपांड्याकडे होणार या गोष्टीनें आबाभटजींच्या पुराण समजुतीला असा जोराचा धक्का दिला कीं त्यांच्या समोर धर्माची विटंबना आतां पूर्ण झाल्याचें दृश्य दिसूं लागलें. कलियुगाच्या प्रथम चरणाचा त्यांना विसर पडून त्याच्या चतुर्थ-चरणाच्या शेवटच्या भागांत आपण वावरत आहोंत कीं काय असें त्यांना वाटूं लागलें. पाटील मराठे. त्यांतून यवनसंसर्गानें पतित झालेल्या पाट-लांच्या घराण्याशीं देशपांड्यासारख्या जुन्या समजुतीच्या ब्राह्मण घराण्यानें आपण यजमान घराण्यानें—इतका एकत्रत्वाचा संबंध ठेवण्याची कल्पना त्या वृद्ध धर्ममार्तंडाला असह्य झाली. यशवंतराव "हसन" असतांना कोणत्याही नामधारी हिंदुपेक्षा, कित्येक ब्राह्मण म्हणविणारांपेक्षांही आंत-र्बाह्य शुचि होता ही गोष्ट आबाभटजींना ठाऊक नव्हती असें नाहीं पण त्या गोष्टीवर त्यांचा विश्वास नव्हता.

देशपांड्यांच्या घरून भटजी निघाले ते मास्तरांच्या घरीं येऊन दाखल झाले. मास्तर आणि दादाभटजी सतंजीवर तंबाखू खात बसलेले होते. दादाभटजींनीं एक बातमी अशी आणली होती कीं सावित्रीबाई आणि तात्यासाहेब यांच्यामध्यें लिलेच्या लग्नाबद्दल कांहीं बोलणें निघालें असतांना लीला शिवरावाला देण्याबद्दल सावित्रीबाईचा मोठा अट्टाहास दिसून आला. तात्यासाहेबांची भटजींनीं त्यानंतर गांठ घेणें अवश्यच होतें. त्यांना हा संबंध धर्माच्या सुरक्षिततेच्या दृष्टीनें आणि इतर कित्येक तसल्याच जुन्या दृष्टीनें इष्ट नव्हता. गंगेवर स्नानाला तात्यासाहेब गेले असतांना दादा भटजींनीं आपला मोर्चा तिकडे वळविला होता. तात्यासाहेब गंगेंत उभे राहून सूर्याला अर्घ्यप्रदान करीत होते तोंच भटजी तिथें पोहचले.

"कां ! तात्यासाहेब ! आज लवकरच गंगेवर ?"

"ॐ भूर्भुव–उं–उं–उं—हूंः !" तात्यासाहेबांनीं भटजींना जाणवलें.

अर्घ्यप्रदान झाल्यावर संध्या पूर्ण होईतों भटजींना थांबण्याबद्दल खुणा-वून थोड्या वेळानें त्यांनीं आपली संध्या समाप्त केली. भटजी तोंपर्यंत

आपली चंची काढून जवळच एका खडकावर बसले होते. आश्विनाचे दिवस, गंगेला साधारण पोटापर्यंत पाणी असून मधलेमधले खडक पूर्णपणें उघडे पडले होते.

तात्यासाहेब घरीं जायला निघाले तोंच भटजींनीं त्यांना म्हटलें "बसा की थोडा वेळ इथंच ! मला कांहीं बोलायचं आहे आपल्याशीं ! मी घराकडूनच येत आहे आपल्या !"

"घरीं जाऊन बोलूं या मोकळेपणानें !" तात्यासाहेबांना तसें नदीवर उगीच बोलत बसण्याची कल्पना आवडली नाहीं. त्यांनीं भटजींचें न ऐकतांच घराची वाट धरली. भटजींच्या भ्रुकुटी वक्र झाल्या. यजमानानें उपाध्यायाची प्रत्येक आज्ञा शिरसावंद्य मानून त्याप्रमाणें वागलें पाहिजे या समजुतीचे दादाभट तात्यासाहेबांच्या या वागणुकीनें आंतून अगदी कोपायमान झाले पण त्यांना तसें दाखवून रुष्ट करण्याचें धैर्य त्यांच्याठिकाणीं नव्हतें.

"बरं चलाच तर घरीं ! तसा कांहीं माझा आग्रह नव्हता ! म्हटलं, इथं गंगाकिनारीं छान जागा आहे, बोलायचंही थोडसंच आहे—"

तात्यासाहेब आतां थडीवर येऊन मागून हळूहळू येणाऱ्या भटजींची वाट पहात उभे राहिले होते. खडकाच्या उंचसखल भागावरून चालतांना उच्चारलेले त्यांचे वरील शब्द तात्यासाहेबांना ऐकूंही गेले नाहींत. हळूहळू पाय सांवरीत, क्वचित् लहानशी या खडकावरून त्या खडकावर उडी घेत भटजी एकदांचे धापा टाकीत तात्यासाहेबांच्या जवळ येऊन पोंहचले.

"मला आतां वाड्यापर्यंत यायला फुरसत नाहीं पण एवढंच सांगण्याकरितां मी तातडीनें आलों होतों कीं लीलेला जर अण्णाला द्यायचा आपला निश्चय झाला असेल तर आपण त्याबद्दल जरा विचार करावा—"

तात्यासाहेबांनीं भटजीकडे एक तीक्ष्ण दृष्टिक्षेप केला. भटजी आपल्या अधिकाराच्या बाहेर लुडबुड करीत आहे हें त्यांनीं त्या दृष्टीक्षेपानें दर्शविल्यासारखें केलें.

"अझून कांहीं नक्की नाहीं. आणि असलाच ऋणानुबंध तर मी तरी कसा चुकविणार त्याला." तात्यासाहेबांनीं सामोपचारानें पण जरा त्रासिक स्वरानेंच उत्तर दिलें. भटजी चाणाक्ष होते. ते उमगले. त्यांना तात्यासा-

हेबांचा स्वभाव ठाऊक होता. त्यांना या बाबतींत जास्त हटकण्याची ही वेळ नव्हे हें त्यांनीं तत्काळ ताडलें.

"आपलं सांगून ठेवलं आहे यावेळीं! आपल्या फुरसतीच्या वेळी वाड्यांत येऊन सांगेन याबद्दल आणखी! तूर्त मलाही फुरसत नाहीं. तथापि यजमानाच्या कल्याणाची काळजी–" भटजी चांचरतच बोलत होते.

"काय सांगायचं असेल तें घरीं येऊन सांगा. ऐकायला माझी ना नाहीं" भटजीकडे न पाहतांच वाड्याकडे जाणाऱ्या रस्त्याकडे वळतांना तात्यासाहेब म्हणाले. त्यांच्या चर्येवर तात्पुरता तिरस्कारही व्यक्त झाला होता. भटजींची घाई कोणत्या कारणास्तव आहे हेंही त्यांच्या चाणाक्ष दृष्टीला दिसल्यावांचून राहिलें नाहीं.

भटजींना या प्रसंगानंतर समाधानाची जागा म्हणजे मास्तरांचें घर. या त्रिवर्गवृद्धांचा मास्तरांचें घर म्हणजे एक क्लबच होता. लीला आणि शिवराव याच्या विवाहामुळें उद्भवणारें धर्मसंकट हा विषय मास्तर आणि दादाभटजी यांच्या दरम्यान खलांत पडला असतांना आबाभटजी तिथें येऊन पोहचले. त्यांच्या ताज्या बातमीनें संकटांत भरच पडली. मास्तरांच्या पत्नीनें त्याना भोजनाला हांक मारली नसती तर ती सभा सारा दिवस धर्मचर्चा करीत बसली असती अशी त्यांच्या त्या वेळेच्या एकंदर आविर्भावावरून कल्पना येत होती.



# प्रकरण ७ वें



स्थूलमानानें बायको म्हणजे एक जिव्हाळ्याचा कामकरी अशीच कल्पना एखाद्या प्रौढ मुलाला प्रश्न केला असतांना तो देईल; पण नवरा म्हणजे लहानांतल्या लहान मुलीला काय वाटतें. या प्रश्नाचें स्पष्ट उत्तर जरी प्रसंगीं मिळालें नाहीं तरी तें ज्या प्रकारचें मिळतें त्याला समजण्याची कल्पना प्रत्यक्ष ती मुलगीच झाल्यावांचून येणें दुरापास्त आहे. पुष्कळ वेळां मित्रांच्या किंवा संबंधीयांच्या कुटुंबांतील मंडळी एकत्र जमली असतांना त्यांच्या मुलांमुलींच्या एकत्र खेळण्यांतून विनोदानें कित्येक वेळां लहान मुलामुलींचे वाङ्मनिश्चय त्यांच्या आया बहुधा करीत असतात. त्यावेळीं एखाद्या लहान बालिकेला एखादा मुलगा नवरा म्हणून दाखविला तर ती एखादे वेळेस पसंती तर एखादे वेळेस नापसंती दर्शविते. अशा वेळीं नवऱ्याबद्दल ती बालिका काय बरं कल्पना करीत असेल ? आपलें मत ती त्यावेळीं स्पष्टपणें आपल्या बोबड्या बोलानीं किंवा न बोलतांच दिसेल अशा आविर्भावानें जाहीर करते यांत शंका नाहीं. मुलांच्या मनाबद्दल—पुरुषजातीनें क्षमा करावी—आम्ही या ठिकाणीं विचार करीत नाहीं. पुरुषाचें हृदय मृदुभावनेला पारखें नाही पण त्याच्या हृदयाची ठेवण मानुषी असली तरी स्त्रीच्या हृदयाच्या ठेवणीहून अगदीं निराळी आहे. पुरुषहृदयाला स्थूल संवेदनेचे तंतू आहेत तर स्त्रीहृदयाला सूक्ष्मतर संवदेनेचे तंतू आहेत. पुरुषाच्या हृदयांतील संवेदकशक्तीचा विकास हळू-हळू स्थूल प्रमाणांत आणि प्रमाणतः दीर्घ कालानें होतो. उलट स्त्रीहृदयांतील संवेदक शक्तीचा विकास द्रुतगतीनें, सूक्ष्मग्राही, आणि अल्पकालांत होतो. कन्या, पत्नी आणि माता या दृष्टीनें त्यांच्यावर पुत्र, पति आणि पिता या जबाबदाऱ्यांपेक्षां ईश्वरानें फारच मोठा भार टाकलेला आहे. मुलगे वयाच्या सोळा वर्षांत शिक्षण घेत असूनही जितक्या प्रमाणांत बावळट राहतात तितक्याच उलट प्रमाणांत मुली अशिक्षित असल्या तरी एक प्रकारच्या नैसर्गिक सुशील, गंभीर आणि जबाबदार भावनाबद्ध भास-

तात. तात्पर्य, स्त्रीहृदयाचे संवेदक परमाणू पुरुषहृदयापेक्षां जास्त प्रमाणांत संजीवित असतात.

देशमुखांची लीला एका संध्याकाळीं आंतील चौकांत झोंपाळ्यावर झोंके घेत होती. सावित्रीबाई स्वयंपाक घरांत काम करीत होत्या. तात्यासाहेब चिरंजीवांना भेटण्याकरितां मुंबईस गेले होते.

तारा झोंपाळ्यावर आपल्याच नादांत हळूहळू कृष्णाचीं गाणीं गुणगुणत होती. वयाला पंधरा वर्षे पूर्ण झालेली ती नयनमनोहर बालिका झोंपाळ्याच्या होणाऱ्या किर्रकिर्र अशा आवाजांत हळूहळू गात असतांना यावेळीं पूर्ण आनंदांत लांबलांब झोंके घेत होती. आतां तर तिचा पायही जमिनीला लागला न लागल्यासारखा होत होता. तिनें एका हातानें झोंपाळ्याचा सांखळदंड धरला होता व दुसरा हात वाऱ्यानें भुरुभुरु उडणाऱ्या कपाळावरील केसांना व पदराला सांवरण्यांत गुंतला होता. झोंपाळ्याचे झोंके आतां खूप वर जात होते, इतक्यांत काय झालें कुणाला ठाऊक झोंपाळा एकीकडे कलता होऊन ती धाडदिशीं खालीं आपटली. “ आई पडलें ग मी ! ” अशी तिनें आरोळी ठोकली. सावित्रीबाई धांवतच बाहेर आल्या. त्यांनीं तिला उचलून मांडीवर घेतलें. कानांत फुंकर घातला. हातपाय एकदां ताणून ओढले व “ काय झालं बाळ ? कुठ लागलं माझ्या लिलीला ? ” असे प्रश्न विचारीत त्या तिच्या अंगावरून हात फिरवून पाहूं लागल्या. लीला बेशुद्ध पडली होती. तिन्ही सांजाची वेळ. दिवा लांब होता. तथापि तिच्या डोकीवरून वहाणारा रक्ताचा एक ओघळ त्यांना दिसला. त्यांनीं ताबडतोब एक संतरंजी कशी तरी आंथरून त्यावर तिला निजविलें व धांवत घरांतून हळद आणि साखर आणून त्यावर दाबली. नोकरचाकर जवळ नव्हते. ते त्यावेळीं गुरांना बांधून त्यांचें चारापाणी करीत होते. कुणी नोकर जवळपास असेल या समजुतीनें त्यांनीं बसल्या जागेवरूनच हांका मारल्या. हांका ऐकून नोकरांच्या पूर्वीच घरासमोरून जात असलेले अण्णा आणि सूर्यभान एकदम आंत आले.

“ अण्णा ! भानू ! बघा रे लीला कशी करते आहे ! मेढ्या झोंपाळ्यावरून झोंके घेत असतांना पडली ! बघ डोक्याला केवढी खोंक पडली आहे ती ! ”

" भानू ! तो बिछाना आण आणि घाल इथं या पलंगावर तोंवर मी जखम बांधतों. " अण्णा म्हणाला.

भानूनें चपळाईनें एका हातानें पलंग आणि दुसऱ्या हातानें वळकटी आणली व तावडतोब बिछाना तयार केला. सावित्रीबाईनीं लीलेला त्यावर निजविलें. लीलेची आतां ग्लानि थोडी थोडी कमी होत चालली होती. तिनें आपले डोळे उघडले. अण्णा यावेळीं तिची जखम धूत होता. जवळच सूर्यभान पाण्याचें भांडें व पट्टी घेऊन उभा होता. सावित्रीबाई पलंगावर बसल्या होत्या.

" बरंच लागलं काय ग आई मला ? " तारेनें हळूहळू विचारलें.

" कांहीं विशेष लागलं नाहीं, थोडं खरचटलं आहे घाबरूं नकोस " सूर्यभान म्हणाला.

" कोण भानुदादा ! तूं कुणीकडं यावेळीं ? "

" तूं झोंपाळयावरून खालीं पडलीस त्याच वेळी, लीला ! केवढ्यानं तरी झोंके घेतेस तूं ? अझून कांही तुझं बाळपण गेलं नाहीं ? " भानू विनोदानें म्हणाला. तारेच्या कपाळावरील खोंक अगदीं हलक्या हातानें धुतली जात होती. आपल्या कपाळावरून कुणाचा हात फिरतो आहे हें तिला दिसत नव्हतें. " आई, झाली ना जखम धुवून ? बांध की पट्टी. किंवा तशीच बरी होईल ती. फार लागलं नाहीं बरं मला ? "

" सगळं आंग दुखायला लागेल म्हणजे कळेल झोंपाळयावरून पडणं कसं असतं तें. अझून कुठं कुठं लागलं हें कळलंच कुठं तुला. एका ठिकाणचं रक्त निघालं एवढंच ! " अण्णाचे वरील शब्द ऐकतांच लीलेनें मान फिरवून वर पाहिलें. " अण्णा !—"

" होय मीच तो. मान जरा सरळ ठेव. पट्टी बांधू दे बळकट ! " अण्णानें हिशोबानें पट्टी बांधली व लीलेला विचारलें

" आणखी सांग बरं कुठं कुठं लागलंय तें ? आंबेहळद आणि अफूचा लेप लावावा लागेल. आत्या ! लेप तयार करून चांगला ऊन ऊन लावून द्या दुसऱ्या भागावर. पथ्यानं रहावं लागेल कांहीं दिवस ! " अण्णा म्हणाला.

" शिरा खायला हवा सात दिवस " भानूनें पथ्याचें सांगून टाकलें.

"आई ! मी पडलें आणि भानुदादाला आणि अण्णाला विनोद करायला फावलं. मी नाहीं लावायची लेपचोप ! बरी आहे मी ?"

"वेडी आहेस ! त्यांनीं घाई केली म्हणून तर तूं लवकर डोळे उघडलेस ! भानूनं त्या तिथून हा पलंग आणि बिछाना आणला तुझ्याकरितां. पाटलांसारख्या मोठ्या माणसांनीं—"

"आत्या ! मला परका कां समजतां तुम्ही. या माझ्या बहिणीकरितां आतां या काळोखांत अस्सा धांवत जाऊन काय वाटेल तें मी घेऊन आलों असतों."

"मारुतीसारखा पराक्रमी भाऊ असल्यावर काय कमी आहे बाबा" सावित्रीबाई म्हणाल्या.

लीलेकडे पाहून भानू पुढें म्हणाला "पण ही खोंक रहणार आत्या तशीच." सुभेदार यायचे आहेत म्हणे बघायला लवकरच. बुजायचे ते !"

"त्यांच्या घरींही झोंपाळा अढणारच. दुसरीकडे एक खोंक पडली म्हणजे फिटंफाट होईल." अण्णा हांसत म्हणाला.

लीलेनें अण्णाकडे सरळ न पहाता भानूला उद्देशून म्हटलें "मग त्यावेळींही भानूदादा येईल धांवून हांकेसरशी. होयना रे ?"

"अवश्य येईन बरं. पण मला वाटतं सुभेदारांना सून पसंतच पडणार नाहीं. शिकलेली कुठं आहेस तूं ?"

"नाहीं पसंत झाली तर नाहीं. बाबू आणि तूं बघालच स्थळ बहिणीकरितां ? अण्णाभानू बसा अंमळ. थोडा शिरा करतें तुमच्याकरितां !"

सावित्रीबाई प्रेमळपणाच्या मूर्ती होत्या. अनुसूयाबाई आणि सावित्रीबाई साऱ्या गांवाला मातेसारख्या पूज्य असत. ही मुलें तर त्यांच्या घरोब्यांतलींच. उशीर झाला तरी त्यांचा शब्द त्यांच्याकडून मोडवला जाणें शक्य नव्हतेंच. ते दोघेही तिथेंच लीलेची थोडी थट्टा करीत बसले. झोंपाळ्याला धन्यवाद देत व लीलेला चिडवीत त्यांनीं शिरा खाल्ला व ते दोघे गढीकडे चालते झाले.

---

# प्रकरण ८ वें



अण्णा आणि सूर्यभान आज सायंकाळीं आपल्या शेतांचें निरीक्षण करीत होते. कार्तिकाचा महिना म्हणजे कपाशीच्या पिकांच्या ऐश्वर्याचे दिवस. ईश्वरानें या वर्षी बेताचा आणि जरूर तितका पाऊस पाडून अण्णाच्या पहिल्याच प्रयत्नांना यश दाखविलें होतें. कपाशीचीं झाडें अस्तमानाच्या उतरत्या सूर्याच्या प्रकाशांत वाऱ्याच्या मंद गतीनें डुलत होतीं. झाडांवर कैऱ्या लदबदल्या होत्या व कांहीं ठिकाणीं कैऱ्या फुटून त्यांतून कापसाची बोंडें बाहेर आलीं होतीं. जणूं काय भूदेवी आपल्या उपासकांना हास्य-मुखानें प्रसाद द्यावयास उद्युक्त झाली होती. मधुनमधुन तुरीच्या झाडांच्या रांगा आपल्या सोनेरी पुष्पांनीं युक्त असलेल्या खांद्या हालवून सृष्टीदेवी-वर मोर्चेलें ढाळीत होत्या. पलीकडे ज्वारीचें शेत डुलत होतें. मोत्यांच्या दाण्यासारख्या जोंधळ्याच्या दाण्यांनीं युक्त अशीं कणसें पाहून बांधावर बसलेले अण्णाचे सहकारी शेतकरी चिलीम ओढीत आनंदानें बसले होते. अण्णा आणि भानू येतांच ते उठून उभे राहिले. दोघांनींही त्यांची विचार-पूस केली व ते पुढें निघाले.

“ अण्णा ! गांवांतील हालचाल बिलकुल बिघडलेली दिसते. मास्तर, आबाभटजी आणि दादाभटजी यांनीं फारच मोठा धुमाकूळ घातला आहे गांवांत. आमच्या मराठे मंडळींनीं आमच्यावर बहिष्कार घातला आहे. आम्ही ऐकतों, तुम्हांलाही वाळींत टाकलं आहे आमच्याकरितां ! ” भानूनें बोलणें सुरूं केलें.

“ एका जुन्या किल्ल्यावर हल्ला करावयाचा आहे असें जें मीं तुला परवां सांगितलें होतें तो हा किल्ला ! हीं ग्रामण्यें आणि या भानगडी करतां करतां समाज फार विस्खळित झाला आहे व त्यांतून ‘ नव कनोजे आणि अठरा चुली ’ असली दुर्धर दुर्घटना आपल्या समाजांत उत्पन्न झाली आहे. भानू ! एकदम उसळी मारूं नकोस ! शास्त्रें आणि स्मृति एकदम झूट मानण्याचें कारण नाहीं. कालानुसार कायदे बदलतात व तसल्याच वेळों-वेळीं बदललेल्या कायद्यांचा तो संग्रह आहे. प्रचलित कालाला लागू होतील

असलीं विधानें निवडून काढून त्यांची एक नवी स्मृति निर्माण केली म्हणजे कित्येक गोष्टी सुलभ होतील. पण ज्या विद्वत्परिषदेनें या गोष्टी हातीं घ्याव्यात व त्यांचा निर्णय करावा असें शास्त्र सांगतें त्या परिषदेंतील सर्वच शहाण्यांच्या बाजारांतून अझूनपर्यंत तरी कांहीं विधायक उत्पन्न झालें नाहीं. पण आतां तशी स्थिति फार दिवस टिकणार नाहीं. जुन्याशीं वाद न न करितां नवमतवाद धडाडीनें पुरस्कार करणारी मंडळी निघत आहेत. व तसेंच कार्य विस्तृत प्रमाणांत सुरू झालें म्हणजे कार्याला मोठा जोम येऊन जीर्णमताचा आपोआपच निःपात होईल."

"अण्णा! तुझी शांति दांडगी आहे व तुझ्या मनाला मी फारसा विरोधही करीत नाहीं. पण धडधडीत खोट्या गोष्टींवरून जर कुणी कांहीं भानगड उपस्थित करतील तर तें नाहीं बुवा सहन करवत मला!" भानू थोडासा जोरांतच बोलत होता.

"खोट्याचा तिरस्कार करणें योग्य आहे पण खोट्या खऱ्याची मीमांसा वितंडवादापुढें कशी करायची? त्याच्याकडे दुर्लक्ष केलेलेंच बरें. आपण आपलें काम करीत असावें मग कोणी कांहींही म्हणो! नानांना पटली माझी गोष्ट! ते म्हणाले राहूं वाळींत. पोरी थोड्याच उजवायच्या आहेत आपल्या? बघतां येईल!"

"उं. हूँ! मला नाहीं दुर्लक्ष करवीत याबद्दल. मी गोखले मास्तरांना स्पष्ट विचारणार आहे कीं अण्णाला तुम्हीं वाळींत कां टाकलंत? द्या पुरावा त्याच्या दोषांबद्दल! तुझ्यासारख्या सज्जनाला तसदी म्हणजे काय? मी त्यांच्याजवळ शिकलों म्हणून काय झालं? खोट्या गोष्टीची मोठी चीड आहे मला! तूं म्हणे आमच्या येथें जेवतोस, पाणी पितोस! कसले लबाड हे म्हातारडे! एकदां असं वाटतं—"

"भानू! शांत हो! मी आरोपी आहेना? मला विचारूं दे त्यांना? देईन मी त्यांना योग्य उत्तर. हें बघ, सारखीं भांडणं भांडायला आपणांला वेळ नाहीं. आपल्याला बरीच काम करायचीं आहे अझून. आपण तयार केलेल्या सर्व योजना पार पाडायच्या आहेत शक्य तितक्या लवकर. देवाच्या दयेनें यंदा शेतीनें बरा हात दिला आहे. तुझ्याकडून या किल्ल्यावर निराळ्या

तऱ्हेनें हल्ला चढविणार आहे मीं. तुझा माझ्यावर विश्वास आहे ना ?"

"अण्णा ! काय बोलतोस हें ? अरे तुझ्यावर अविश्वास ! तुझ्यावर अविश्वास करायचा म्हणजे माझा आत्मविश्वासच घालविल्यासारखें व्हावयाचें अण्णा ! तूं सांगशील ती आज्ञा प्रमाण ! आगींत उडी घ्यायला सांग, तयार आहे. मी खरंच सांगतों तुझा शांतीचा वेदांत मला मागं खेंचतों नाहींतर तुझ्या निंदकांची, तुला व्यर्थ त्रास देणारांची जिव्हाच उपटून काढली असती ! तूं एवढा खपतोस तो काय स्वतःच्या फायद्याकरितां ! यांचे डोळे फुटले आहेत काय हें न दिसायला !" भानू रागानें लाल झाला पण अण्णाच्या दृष्टीशीं दृष्टी भिडवितांच त्यानें तो गिळला. अण्णा भानूकडे मोठ्या कौतुकानें पहात होता. त्याची ही प्रामाणिक धडाडीची वृत्ती त्याला भारी आवडे. त्यानें कौतुकानें आपले दोन्ही हात त्याच्या गळ्यांत घातले व त्याला पोटाशीं धरलें.

"भानू ! तुझ्या हृदयाला काळानं खरी कामगिरी ठेविली नाहीं. हें खरं मराठी तेज आहे. असल्याच तेजानं श्रीशिवाजी महाराजांकडून वंदनीय कामगिरी करविली. जगांत न्यायाकरितां बाता झोकणारे पुष्कळ आहेत पण अशा बहुरुप्यांच्या कारवाईमुळं न्यायदेवतेचे डोळे आंधळे होऊन तिला तराजूचा कांटा दिसण्याची सोय राहिली नसल्याचीं उदाहरणें घडोघडीं घडून येतात. धर्माचं आणि न्यायाचं साहचर्य अनादि आहे. न्यायावांचून धर्म राहूं शकत नाहीं आणि धर्मावांचून न्यायाला गति नाहीं. ही न्यायबुद्धीसह धर्मबुद्धी उत्पन्न व्हावयाला तुझ्यासारखी भूमिका हवी. प्रस्तुत अनवस्थेच्या काळांत तूं आपल्या उद्योगानें खात्रीनें मार्गदर्शक होशील." त्याच्या पाठीवर मौजेनें थापटीत अण्णा पुढें म्हणाला, "यापेक्षां या विषयाबद्दल तुला कांहीं आणखी कळावें अशी इच्छा असल्यास तारा तुला सांगू शकेल !" भानूही मौजेनें हंसला. "तुझीं वाक्येंचीं वाक्यें जशींच्या तशीं पाठ केल्याप्रमाणें बोलते खरी ती ! एकदां तूं आलास म्हणजे तुझ्यासमोरच घालूंया प्रश्न ! मलाही अडवितां येईल एखादी कठीण समस्या घालून !"

"नवरेपणाच्या अधिकाराखेरीज दुसऱ्या बाजूनें प्रयत्न करावयाला तुला मोकळीक आहे !" अण्णा हांसत म्हणाला.

सूर्यास्त झाला होता. बोलत बोलत ते दोघे बालमित्र घराकडे वळले

# प्रकरण ९ वें

माणकचंदाचा आणि मोतीचंद शेटचा एक गरमसा खटका उडाला होता. थोरले शेट कांहीं कामाकरितां थोडे दिवस मारवाडांत गेले होते तिकडून परत आल्यावर त्यांच्या गैरहजेरींतील सर्व वृत्तांत त्यांच्या रोकड्याजींनीं त्यांच्या कानावर घातला व त्याबरोबरच लेखणी त्यांच्या समोर ठेविली.

"काय झालं रोकड्याजी असं निकरावर यायला?" शेटजींनीं आश्चर्यचकित होऊन विचारलें.

"आमच्या नोकरीची आतां किंमत राहिली नाहीं. आपले चिरंजीव आतां सज्ञान झाले आहेत त्यांच्यापुढें आतां आमच्यासारख्या जुन्या अनुभवी नोकरांची कसली प्रतिष्ठा?" रोकड्याजींनीं आपला बिल्लोरी चष्मा डोळ्यावरून काढून डोळे पुसले.

"काय झालं सांगाल कीं नाहीं सारं स्पष्ट! माणकचा अपराध असेल तर त्याला असा घालवून देईन घरांतून. तुमचा अपमान म्हणजे काय? बोला काय खबरबात? चाव्या आणा पाहूं लवकर!" शेटजींना मुलानें कांहीं पैसे उधळले असल्याबद्दल शंका येऊन त्यांनीं प्रश्न केला.

"तसं त्यानं पैशाच्या बाबतींत कांहीं केलं नाहीं. त्यानं माझ्या गैरहजेरींत किंवा बळजबरीनं किल्या हिसकून घेऊन तिजोरी काढली नाहीं किंवा पैसे व्यर्थ खर्चही केले नाहींत. व्यर्थ आळ कशाला घेऊं त्याच्यावर!"

"मग झालं तरी काय?" शेटजींनीं अधीर होऊन विचारलें.

"एवढंच कीं त्याला अझून आपला फायदा समजत नाहीं. कोणाचं तरी ऐकून व्यर्थ आपलं नुकसान करून घेत आहे."

रोकड्याजींनीं शेटजींच्या गैरहजेरींतील रोखे व तडजोडीच्या फेडीचे हिशेब शेटजीसमोर दाखल केले.

"अरे बापरे! एवढा हलका व्याजाचा दर आणि गहाणावांचून?" शेटजींचा चेहरा उग्र झाला. त्यांच्या गालावरील गलमिशा कठीण ब्रशाप्रमाणें 'शोभायमान' दिसूं लागल्या. त्यांचे ओठ फुरफुरूं लागले. सोन्याच्या

चुका मारलेले त्यांचे समोरचे दांत खालच्या ओष्टप्रांतीं दाबले गेले. आपल्या दीर्घोदराला किंचित् दोन्ही हातांनीं दाबून ठेऊन त्यांनीं " माणक " म्हणून आंतल्या दाराकडे पाहून हांक मारली. माणकचंद शांत चित्तानें पावलें टाकीत खोलींतून बाहेर आला. त्याच्या हातांत एक पुस्तक होतें. त्या पुस्तकांत वाचन होत असलेल्या पानांत त्यानें आपलें एक बोट अडकविलें होतें. यावेळीं त्याच्या अंगांत त्याचा नेहमींचा पातळ मलमलीचा सदरा नसून एक मिलच्या कापडाचा लांब सदरा होता. त्याच्या वडिलांप्रमाणें 'जॉन पील' चें त्याचें धोतर त्याच्या कमरेला दिसत नव्हतें. त्याच्या जागीं नागपूरमिलचें बारीक किनारीचें स्वदेशी धोतर विलसत होतें. माणकचंद येतांच शेटजींनीं एक तीक्ष्ण नजर त्याच्यावर रोखली. एका नजरेंत त्यांनीं त्याचें आपादमस्तक निरीक्षण केलें. थोडा वेळ शेट त्याच्याकडे सारखे पहात राहिले.

" माणक ! "—

" बाबाजी ! "

" माणक तूं इतका मूर्ख असशील अशी माझी कल्पना असती तर मी तुझ्या स्वाधीन कारभार करून परगांवीं गेलोंच नसतों. काय गोंधळ करून ठेवला आहेस तूं हा ! शेटनीं ते रोखे त्याच्यापुढें ठेवलें. " हजारों रुपयांचें अशा रीतीनें नुकसान जर झालें तर तुझें पोट तरी कसें भरावें. साऱ्या दुनियेंत हिंडलास तरी हा व्याजाचा दर कुठें सांपडेल कां ? "

" मीं हेंच सांगत होतों याला, पण हा ऐकेचना. म्हणाला मी मालक आहे, सांगतों तें ऐका ! " रोकडयाजींनीं शेटच्या किंचित् मंद झालेल्या अग्नीवर फुंकर घातला !

" कुठलारे आलास मालक तूं ? आणि असं नुकसान करणाराला मालक कस म्हणता येईल. मालक म्हणे ! हाडाचा काडं करून हे सारं मीं स्वतः मिळविलं आहे. या सगळ्यावर मालकी माझी आहे ! ! शेटजी गादीवरचे गादीवरच बेचैन होऊन हात आपटीत बोलत होते. बिल्लोरी चष्म्याच्या आंतील डोळे एकवार शेटकडे तर एकवार माणककडे सारखे वळत होते. माणक शांत उभा होता. त्यानें कांहीं उत्तर दिलें नाहीं.

" कायरे ! उत्तर कां देत नाहींस ? निगरगट्टासारखा असा कां उभा आहेस आणि तें कसलं पुस्तक आहे तुझ्या हातांत ! "

" स्वदेशीची मीमांसा ? " माणकनें उत्तर दिलें.

" स्वदेशीची मीमांसा ! म्हणजे काय ? कुणाचें पुस्तक तें ? "

" पुस्तक अण्णाचें आहे. त्यांत स्वदेशी बहिष्कारांवर आपल्या देशांतल्या निरनिराळ्या पुढाऱ्यांची निरनिराळ्या वेळीं झालेलीं भाषणें एकत्र छापलेलीं आहेत. "

" आणि म्हणूनच मला वाटतं हीं रांठ वस्त्रं तुझ्या अंगावर मला दिसताहेत. स्वदेशी आणि परदेशी ! आपणांला काय करायचं असं नसतं त्या वादांत शिरून. आपण आपला धंदा बघावा. इतर गोष्टींकडे बघण्याचं कारण नाहीं. "

" स्वदेशी कापड वापरण्यानें आपल्या धंद्याला कांहीं बाध येतों असें मला वाटत नाहीं. आपल्या दुकानांतला हा विलायती माल संपल्यावर मीं त्यांत निव्वळ स्वदेशी मालच ठेवावयाचें ठरविलं आहे. त्या बाजूनें आपण मला मुखत्यार केलं आहे ! "

" तसं असलं तरी तुला त्यांत अशी भलतीच ढवळाढवळ करण्याची मुखत्यारी खात्रीनें नाहीं. कापडाचं दुकान तुझ्याकरितां काढलं असलं तर मालक मी आहें. स्वदेशी कापडांत नफा फारच कमी आहे. मी नाहीं करूं देणार तुला तसलं कांहीं समजलास ? " शेटजींना आंतून बराच राग येत असला तरी माणकच्या शांत आणि विनम्र वृत्तीमुळें त्याला दाबून ठेवून ते बोलत होते.

" जशी आपली इच्छा ! " एवढेंच उत्तर त्यावर माणकनें दिलें.

" माणक, या तडजोडींच्या हिशेबांतही तूं फार नुकसान केलें आहेत ! सारे हिशेब सरळ व्याजानें करून तूं तडजोड केली आहेस. चक्रवाढ व्याजानें हिशेब करण्याची सावकारी रीत तुला ठाऊक आहेना ? आले तेवढे पैसे व्याजांत घालून मुद्दल कायमच असूं देणें. अशी आपल्या धंद्याची रचना मी तुला सांगितलेली आहे. अर्ध्यापेक्षांही कमी रकमेवर झालेले हे निकाल अत्यंत मूर्खपणाचे आहेत. "

" बाबाजी ! मला क्षमा करा, अशा रीतीनें कुळांवर बोजा घालणं फार निष्ठुरपणाचं आहे असं मला वाटतें. "

" दयार्द्र बुद्धीनें रक्कम वसूल तरी होईल काय ? अरे कित्येक कुळं अशीं खष्वी असतात कीं जरा दया दाखवावयाला गेलं कीं रक्कम बुडवावयालाच तयार होतात. अरे बाबा, या धंद्यांत जसे सरळव्याज धोक्याचें तशी सरळ वागणूक ही धोक्याचीच असते. आपल्या या अनुभवी रोकडयाजींनीं तुला कांहीं सांगण्या शिकविण्याचा प्रयत्न केला तर तूं त्यांचा अपमान केलास आणि आपलंही नुकसान केलंस ! मला वाटलं नव्हतं, तुझ्याबद्दल मला कागाळी ऐकावयास मिळेल म्हणून ! त्या पोरांच्या संगतीचा हा परिणाम दिसतो. ही स्वदेशी तो बहिष्कार, त्या लोककल्याणाच्या गोष्टी यापासून आपल्याला मुळींच लाभ होणार नाहीं. तुझे सोबती तुला धोका देणार नाहींत किंवा वाईट वळणावर नेणार नाहींत ही माझी खात्री आहे. पण त्यांच्या संगतींत राहिल्यापासून आपणाला आपल्या धंद्याला धोका आहे याचा विचार कर!"

" बाबाजी ! सज्जनाच्या संगतीपासून धोका होत नाहीं अशी माझी पूर्ण समजूत झाली आहे. फार काय पण त्यांच्या जवळून आजवर मी जितकं शिकलों तितकं कदाचित् कॉलेजमध्यें जावून देखील मला शिकतां आलं नसतं. लोक सुखी तर आपण सुखी ही कल्पना मला पटली आहे. मी आपल्या अधिकारांत आहे आपण मला काय ती शिक्षा करावी. मीं आपल्या पैशाला हात लावला नाहीं, तो उधळला नाहीं पण आपल्या गैर हजिरींत माझ्या बुद्धीला पटल्याप्रमाणें कुळांच्या तडजोडी मीं केल्या आहेत. यापुढें आपली इच्छा नसल्यास मी या बाबतींत केव्हांही कांहीं बोलणार नाहीं."

माणकचंदाचा रुबाब यावेळीं मोठा भारदस्त निर्मळ आणि गंभीर दिसत होता. माणकचें भाषण ऐकून शेटजी विचारांत पडल्यासारखे झाले. रोकडयाजी आपल्या चष्म्यांतून शेटकडे सारखे टक लावून पाहूं लागले. माणकनें तेवढ्यांतच पुस्तकांतील बोट काढून, पुस्तक आपल्यापुढे धरून उभ्या उभ्याच पुढील मजकूर वाचावयास प्रारंभ केला. शेटनें मध्येंच एकवार त्याच्याकडे पाहिलें तिकडे त्याचें लक्ष नव्हतें.

" माणक, सध्यां जा तूं. मला काय सांगायचं आहे तें तुला नंतर सांगेन. " रोकडयाजीला हिशेब बंद करायला सांगून शेट तांतडीनें आंत गेले.

# प्रकरण १० वें



त्या संध्याकाळीं शिवराव आणि सूर्यभान शेतावरून परत येतांना देवदर्शनास गेले व नंतर दोघेही आपापल्या घराकडे गेले. उदेभानराव निजामशाहींतील वतनाच्या भानगडीसंबंधानें हैद्राबादेकडे गेले होते व यशवंतराव कांहीं कामाकरितां देवगांवास गेले होते.

शिवराव घरीं येऊन आपल्या खोलींत बसतो न बसतो तों गोखले मास्तर त्याच्या खोलीच्या दारांत शिरले. मास्तरांना पहातांच अण्णानें त्यांना नमस्कार केला व आराम खुर्चीवर त्यांना बसवून जवळच एक खुर्ची घेऊन आपण बसला.

" आज तूं एकटाच ! सूर्यभान कुठं आहे ?" बहुधा हे दोघे नेहमीं एकत्र असतात या त्यांच्या कल्पनेप्रमाणें व कांहीं विशेष हेतूनें मास्तरांनीं प्रश्न केला.

" नुकताच घरीं गेला आहे. दादा गांवांत नाहींत आणि बापूही देवगांवीं गेले आहेत म्हणून जरा लवकर घरीं गेला. "

" शिवराव, मी आज तुझ्याशीं कांहीं विशेष मुद्यांवर बोलणार आहे. तुला थोडा वेळ आहे ना ? " मास्तरांनीं सरळ सुरुवात केली.

" जरा थांबा, मी घरांत जाऊन वहिनींना चहा करायला सांगून आलोंच लवकर ! "

" नको, नको, मी फारसा चहा घेतच नाहीं, तुला माहीत आहेच. शिवाय—"

अण्णानें मास्तरांच्या मनांतील इंगित तात्काळ जाणलें.

त्यानें सरळ भावानें विचारलें.

" आम्हांला वाळींत टाकलं आहे म्हणून आपला नकार असल्यास माझा कांहीं आग्रह नाहीं. पण मला वाटतं आमच्या वहिनींनीं केलेला चहा घ्यावयास आपल्यापैकीं कट्टरांना सुद्धां हरकत नसावी. मी आणणारही नाहीं चहा आपणच घरांत जाऊन घ्यावा म्हणजे संसर्गदोषही रहाणार नाहीं. "

" तसं नव्हेरे---पण---आतां---नकोच---बरं---सांग जा करायला " मास्तरांनीं अडखळतच अनुमति दिली.

अण्णा चहाचें सांगून आला आणि आपल्या खुर्चीवर येऊन बसला.

" शिवराव, तूं माझा विद्यार्थी आहेस तेव्हां थोडसं त्या अधिकारानं बोललों तर तुझी परवानगी आहेना त्याला ? "

" आपणाला पूर्ण अधिकार आहे. आपल्या सारख्यांचं प्राथमिक शिक्षण मला मिळाल्याबद्दल मी स्वतःला फारच भाग्यवान् समजतों. आपणासारखे शिक्षक हल्लीं फारच विरळा " आणि खरोखरच गोखले मास्तर अत्यंत नामांकित शिक्षक होते. त्यांना विशेष इंग्रजी आलें असतें तर डेप्युटी होण्याची त्यांची योग्यता होती. पंतांच्या आर्या लावण्यांत तर त्यांचा हात धरणारा जवळपास त्या पट्टींत कोणी व्युत्पन्न मनुष्य नव्हता.

" शिवराव ! माझी अशी खरोखरच कल्पना नव्हती कीं आपल्या धर्मावर तुझी अशी चमत्कारिक अश्रद्धा असावी ! तुला आपल्या धर्माचा जाज्वल्य अभिमान आहे असेंच मला वाटत होतें, पण प्रत्यक्ष अनुभव मोठा दुःखदायक आहे. "

" आपला काय आशय आहे हें माझ्या लक्षांत आलं. पण माझ्या बाबतींत आपला बराच गैरसमज झाला आहे असें मला वाटतें. माझ्या धर्माबद्दलच्या अभिमानांत मी कोणालाही हार जाणार नाहीं अशी माझी प्रामाणिक समजूत आहे. जगाचा धर्म होण्याची योग्यता असलेल्या परम-पावन हिंदुधर्माबद्दल ज्या हिंदूची अश्रद्धा असेल तो महापातकीच सम-जला पाहिजे. मला आपण स्पष्ट सांगा माझं कुठं चुकलं आहे तें म्हणजे मी आपल्या संशयाचें यथाशक्ती निराकरण करीन. "

" पाटलांचं घराणं यवनसंसर्गानं दूषित झालं आहे हें तुला कबूल आहे ? "

" खोटी गोष्ट आहे. बापूंच्यामुळें आपण असें म्हणत आहांत हें माझ्या ध्यानांत आलें. पण आपली यांत फार गैरसमजूत होत आहे. नुसत्या कांहीं कारणामुळं प्राप्त झालेल्या परकी नांवानं जर एखादा मनुष्य दूषित होत असेल तर तसल्या कल्पनेला कुठेंही आधार नाहीं हें—क्षमा करा— मी स्पष्ट म्हणतों. बापू मुसलमान नव्हते ही गोष्ट पुराव्यानें इतकी स्पष्ट

झालेली आहे कीं त्याच्याबद्दल शंका घ्यायला तिळमात्र जागा नाहीं. घरांत हाड टाकल्यानें यवन झालें, विहिरींत पाव टाकल्यानें सारा समाजचा समाज बाटला, या कल्पनेनें आपल्या समाजाची केवढी हानी झाली आहे, कसल्या दुर्धर संकटांत आपण पडलों आहोंत हें आपणासारख्या इतिहासज्ञ विद्वानांस सांगण्याचा माझा अधिकार नाहीं. एवढ्याचकरितां पाटलांना वाळींत टाकण्याचा मूर्खपणा आपल्या येथील मंडळींनीं केलेला आहे. मास्तरसाहेब ! या वावटळीनें आपला गांव पुन्हां आपसांतील कलहांत चूर झाला आहे. उदार मतांची आवश्यकता या अडाणी समाजाला जाणविण्याची जबाबदारी आपणावर आहे. काल काय करायचं आहे तें केल्यावांचून रहाणार नाहीं. पण आपण त्याबद्दल जबाबदार होऊं नये अशी माझी नम्र कल्पना आहे. ”

मास्तरांना बोलण्याचें धैर्य होईना. त्यांचें बोलणें अण्णानें बंदच करून टाकलें होतें. पण पुराणकल्पना त्यांच्या रक्तांतच भिनून गेल्या असल्यामुळें त्यांचें मन त्यांना गप्प बसूं देईना. त्यांनीं लगेच मुद्दा बदलला.

“ पण कायरे ब्राम्हणांनीं मराठ्याचे येथें जेवण खाण केल्यानं त्यांचं ब्राम्हणत्व नष्ट होतं ही गोष्ट तरी तुला पटतेना ? ” आपण अगदीं बिनतोड मुद्दा फेकला, अशा आशयाचे विकार मास्तरांच्या चेहऱ्यावर झळकूं लागले.

“ हा वाद इतका थोड्या वेळांत संपण्यासारखा आहे असें मला वाटत नाहीं. मी पाटलांच्या घरीं आजवर जेवलों नसलों तरी प्रसंग आल्यास तसें करण्यास मला कोणताही प्रत्यवाय वाटणार नाहीं.. ” अण्णानें स्पष्ट शब्दांत निकाल दिला. मास्तर त्याच्या तोंडाकडेच पहात राहिले.

“ शिवराव, आतां धन्य झाली तुम्हां तरुण मंडळीची ! अरे तुझ्या मतानें सगळ्या स्मृती जाळून का टाकायच्या आहेत. काय ही धर्माबद्दल मानसिक अवनति ? ”

“ स्मृतींतील वचनांचा आपल्या इतका मला परिचय नाहीं हें मी जाणून आहें. पण जेवढा माझा त्यांच्याशीं परिचय आहे त्यावरून मी हें जाणतों कीं स्मृतींतून अनेक परस्परविरोधी वचनें आहेत, वर्ज प्रकरणें कधीं लांबविलीं आहेत तर कधीं आंखूड केलेलीं आहेत. यावरून मी त्यांना

दोष देतों आहे असा भाग नाहीं. मी त्या सर्व ग्रंथांना अत्यंत पूज्य मानतों पण प्रामाण्य ठरवितांना त्यांतील वचनें कालानुकूल लाविलीं पाहिजेत."

"मग त्यांत शूद्रसहभोजन सांगितलें आहे कां कुठें ?"

"प्रथम पाटलांना शूद्र म्हणण्याच्या कल्पनेला माझा विरोध आहे. 'कलावाद्यंतयोःस्थितिः" हें वचन अनैतिहासिक आहे व तें प्रत्यक्षाला पटणारें नाहीं. आणि ते शूद्र असले तरी त्यांच्यासह भोजन व्हावयाला प्रत्यवाय माझ्या मतें कांहीं नाहीं. ब्राह्मणांना जर सर्व वर्णांतील स्त्रिया करण्याचा अधिकार आहे तर त्या त्या वर्णाच्या स्त्रीनें केलेला स्वयंपाक त्यांना चालणार नाहीं, त्यांचें ब्राह्मण्य नष्ट होतें ही कल्पना पटण्यासारखी नाहीं. आहारभेदामुळें बंद झालेला हा व्यवहार आहारसाम्याच्या प्रसंगीं अमान्य व्हावयाचं कारण नाहीं. पाटलांचं घराणं निर्मांसभोजी आहे हें आपणांस माहीत आहे."

हें डोकें दुरुस्त होण्यासारखें नाही असें मास्तरांना वाटलें. ते निरुत्तर झालेच होते. त्यांना कांहीं उत्तर देऊन आपला बचाव करण्याची इच्छा होती पण आपल्या मनाला त्यांनीं तात्पुरतें आवरतें घेतलें.

चहा घ्यायला घरांत जातांना मास्तर म्हणाले–"शिवराव, वरवर वाचून स्मृती समजणं कठीण आहे. त्याचा विशेष अभ्यास करावयाला हवा. विद्वानांच्या म्हणण्याप्रमाणें चालावं लागतं तें याच कारणामुळें. सांप्रत कालाकडे दुर्लक्ष करून चालणार नाहीं हें मत मला कबूल आहे पण ब्राह्मण्याचा लोप झाल्यानं काय प्रसंग उद्भवेल हें तुला मी सांगायला पाहिजे असें नाहीं."

"हाही वाद तसाच क्लिष्ट आहे मास्तरसाहेब ! समतेच्या वागणुकीनें ब्राह्मण्य नष्ट होतें असें समजावयास मी तयार नाहीं. जातिश्रेष्ठता ही एकाच्या मिळकतीवर सर्वांनीं खाऊन त्या मिळकतीवर सारखाच हिस्सा मागायला सांगण्यासारखी आहे. ब्राह्मणांनीं खरें ब्राह्मण्य राखण्याचा प्रयत्न केला तर तें नष्ट होणें शक्य नाहीं. त्याच्याकारितां स्मृतीची ओढाताण नको, व त्यामुळें उद्भवणाऱ्या भेदभावाचें बंड नको. ब्राह्मण्याची किंमत मला कबूल आहे पण इतरांना कमी लेखून तें टिकवूं पहाणें कठीण आहे. आजच्या भाषणांत मी जरा स्पष्ट बोललों याबद्दल आपण मला क्षमा करावी. मी

आपला नम्र विद्यार्थी आहें. आपली योग्यता मला मान्य आहे, माझे विचार अपक्व आहेत हेंही मी जाणतों, पण मला प्रामाणिकपणानें काय वाटतें तें मीं आपणापुढें ठेविलं आहे, राग नसावा!"

एकीकडून कौतुक आणि दुसरीकडून विस्मय अशा मनःस्थितींत चहा पिऊन मास्तरांनीं निरोप घेतला.



# प्रकरण ११ वें



बॅरिस्टर बाबूराव देशमूख आज गांवांत यावयाचे होते. सातासमुद्रापलीकडून आपला बाबू सुखरूप येऊन आपणांला भेटणार म्हणून त्या देवासमोर बसून कृतज्ञतापूर्वक त्याला आळवीत होत्या. लीलेनें त्याच्याकरितां निरनिराळे पदार्थ करण्याबद्दल आईच्या मागें सारखा लकडा लावला होता. तिच्याकरितां तो किती तरी निरनिराळ्या वस्तू आणणार म्हणून त्यानें पत्रांत लिहिलें होतें. बाहुल्या इथें ठेवीन, पोलकीं या ट्रंकेंत मावतील कीं नाहीं, पातळाची घडी केवढी असेल, आणखी काय काय वस्तू आणणार असेल त्याची यादी पाठविली असती तर बरें झालें असतें इत्यादि विचारांत तिची नुसती गडबड उडून गेली होती. त्याच्याकरितां गाड्या काल सायंकाळींच देवगांव स्टेशनवर रवाना झाल्या होत्या. देवगांवीं जेवण करून तो आज सायंकाळीं पवनपुरास येणार होता. शिवरावालाही तशाच अर्थाचें त्याचें पत्र आलें होतें. शिवरावाच्या घरीं भानू आणि माणक बसले होते व शिवराव बाबूरावाचें पत्र त्यांना वाचून दाखवीत होता. त्यांत त्यानें भानू आणि माणक यांना मी येणार असल्याचें कळवा म्हणून अगत्यपूर्वक लिहिलें होतें. ते सर्व एकमेकांचे बालमित्र होते. शिवराव आपल्या गांवीं कायद्याची श्रेष्ठ पदवी घेऊन येत आहे हें पाहून त्या सर्वांना अत्यंत आनंद झाला होता. माणकनें आपल्या बगीच्यांतून मोटाले दोन हार तयार करून बरोबर आणले होते. अण्णांनेंही आपल्या लहानशा बागेंतून स्वतःकरितां व भानूकरितां एकेक हार तयार करविला होता. आपल्या बालमित्राला भेटण्याकरितां गांवाच्या जवळ जाऊन त्याचें अभिनंदन करावयाचें त्यांनीं ठरविलें होतें. त्याप्रमाणें दरवाज्याच्या बाहेर त्यांचीं वाहनें उभीं होतीं. सूर्यास्त अजून व्हावयाचा होता. थोडासा फराळ करून ते तिघेही मित्र घोड्यावर स्वार झाले व हळूहळू देवगांवाच्या रस्त्याला लागले. दोन फर्लांग ते गेले नसतील तोंच देशमुखांच्या गाडीच्या बैलांच्या घुंगरांचा ध्वनि त्यांना ऐकूं आला. त्यांनीं घोडे फेंकले. गाडी दृष्टीच्या टप्प्यांत आली. त्यांनीं घोडे

हळूं चालविले. गाडीवाल्यानें बाबुरावास ते त्रिवर्ग येत असल्याची वर्दी दिली. बाबूरावांना आपले बालमित्र आपल्याला भेटायलाच येत आहेत हें कळल्यावांचून राहिलें नाहीं. त्याचें हृदय भरून आलें. त्याच्या जन्मभूमीच्या गांवांतील घरें त्याला दुरून दिसत होतीं. त्याच्या गांवांतील देवता श्रीमहारुद्रेश्वर आपल्या मंदिराच्या सुवर्णमय कळसाच्या रूपानें दर्शन देऊन आपली वाट पहात उभा आहे असा त्याला भास झाला. त्यानें देवाला हात जोडून नमस्कार केला. विलायतेहून आला तरी हिंदु अंतःकरण मागें ठेवून तो आला नव्हता. घोडें जवळ येतांच तो गाडींतून खालीं उतरला व त्यांच्याकडे धांवला तो इतका कीं जर त्या तिघांनी चपळाई करून घोडे एकदम थांबविले नसते तर चालत असलेले घोडे आणि गाडी यांच्यामध्यें तो सांपडून त्याला इजा झाली असती. चतुर्दिशीं तिघांनींही घोड्यावरून उड्या घेतल्या व बाबूरावाला कडकडून भेटण्याची त्यांच्यामध्यें अहमहमिका सुरू झाली. लगेच त्यांनीं बाबूरावाच्या गळ्यांत हार घातले. बराच वेळ हृदयें सद्गदित झाल्यामुळें कोणाच्याच तोंडांतून शब्द निघेना. घोडीं आणि गाडीचे बैलही तटस्थ उभे होते. पश्चिमभागीं सहस्ररश्मी भगवान् सूर्यनारायण लगबगीनें आपलीं सुवर्ण वस्त्रें गुंडाळीत होते तरी त्यावेळीं त्यांनीं थोडें थांबून या चौघा मित्रांवरून आपला आशिर्वाद हस्त फिरविला होता.

"अण्णा! भानू! माणक! कशाला एवढे परिश्रम घेतलेत तुम्ही? मी ताबडतोब तुमच्या घरीं आलों असतों तुम्हांला भेटायला. अण्णा, तुझ्या पत्रामुळें मला इतकं जागृत ठेवलं कीं मी परदेशाहून जाऊन आलों आहे असें मला मुळींच वाटत नाहीं."

"तूं तितका समंजस आहेस स्वतः बाबूराव!" अण्णा म्हणाला.

चौघेही बालमित्र हळूं हळूं बोलत चालले होते. आपापला घोडा प्रत्येकानें लगाम हातांत घालून आपल्याबरोबर चालविला होता. गाडी मागून इळूंहळूं येत होती. विलायतेच्या हवेचा परिणाम बाबूरावावर उत्तम झाला होता. त्याचा मुळचाच गौर चेहरा आणखी गोरा झाल्यासारखा भासत होता. विद्येची व त्याबरोबरच विनयाची चमक त्याच्या डोळ्यांत भरून राहिली होती. त्याचा पोषाखही समंजस होता. तो एक तलम धोतर नेसला

असून पायांत मोजे आणि पंपशू त्यानें घातला होता. अंगांत एक पांढरा शर्ट आणि काळा सर्जेचा कोट होता. डोकीवर फरक्याप होती. डोळ्यांवर स्प्रिंगचा सोनेरी प्रिन्सनेझ झळकत होता. बोटींतून उतरतांना तात्यासाहेब भेटले त्या वेळींही त्याचा हाच पोषाख होता.

" आम्हांला वाटलं, बॅरिस्टरसाहेबांचं इंग्रजी पोषाखांतच आम्हाला दर्शन होईल ! " भानू हांसत म्हणाला.

" म्हणजे मला वेडाच समजलांत वाटतं एकूण ? मी आपल्या घरीं येणार आहे हें कां मला माहित नव्हतं ? शिवाय, मला ह्या सूचना द्यायला अण्णा कांहीं विसरला नाहीं. "

" अण्णानें विलायतेंतही आपल्या शिक्षणाचा फैलाव केला म्हणायचा !" माणक म्हणाला.

चौघेही आतां महारुद्रेश्वराच्या देवालयाच्या जवळ आले. बाबूरावानें पुन्हां देवाला नमस्कार केला. माहेरीं आल्यानंतर मुलगी जशी एकदम आपल्या आईकडे धांव घेते त्याप्रमाणें बाबूरावानें धांवतच जाऊन श्रीशंकरा-पुढें साष्टांग नमस्कार घातला.

देवदर्शनानंतर ते चौघेही बाबूरावाच्या घरीं गेले. गाडी पूर्वीच घरीं पोंह-चली होती.

शिवरावानें सावित्रीबाईच्या पायांवर डोकें ठेवलें. साश्रुनयनांनीं आपल्या प्रिय पुत्रास पोटाशीं धरून त्यानीं आशिर्वाद दिला. बाबूरावांच्या डोळ्यांतून अश्रूंचा पूर वहात होता. सर्वांच्या नेत्रांत यावेळीं अश्रू आले होते. लीला भावाच्या पायां पडली. त्यानें तिला मोठ्या प्रेमानें कुरवाळलें व " तुझ्यासाठीं नवरा पाहून आलों आहें " म्हणून तिचा थोडा विनोद केला. लवकरच सावित्रीबाईनीं त्या सर्वांना फराळास बसविलें. व हांसत बोलत त्या सर्वांनीं फराळाच्या पदार्थांवर ताव मारला.



# प्रकरण १२ वें

लीलेची प्रकृती आतां कांहींशी बरी झाली होती. तात्यासाहेब मुंबईहून बाबूरावाबरोबरच येऊन कांहीं दिवस नागपुरास स्थळ बघण्याकरितां मुक्काम करून होते. त्यांच्यापुढें विशेषें करून सुभेदारांचें स्थळ जास्त प्रामुख्यानें होतें. पण पत्रिका न बघण्याच्या प्रश्नाबद्दल ते आपला हट्ट सोडायला तयार नव्हते व पत्रिका बघितल्यावांचून स्थळ नक्की करण्याची तात्यासाहेबांच्या मनाची तयारी नव्हती. आज बाबुरावाला आलेल्या त्यांच्या पत्रांत हाच मजकूर विशेषें करून होता. एकदोन अवांतर स्थळांचीही माहिती होती. तात्यासाहेबांनीं स्थळें बघण्याकरितां कांहीं दिवस नागपुरास राहण्याचा आपला मनोदय बाबूरावाला कळविला तेव्हां तो कांहीं बोलला नाहीं. बहिणीच्या लग्नाच्या विचारापेक्षां आपल्या प्रिय मातेला आणि बहिणीला व आपल्या जन्मभूमीला भेटण्याकरितां तो आतुर झाला होता. त्याच्या दृष्टीनें लीला अजून लग्नाला झालीच नव्हती. पण घरीं आल्यानंतर आईला मुलीच्या लग्नाचा ध्यास लागलेला पाहून त्यालाही त्याबाबत विचार करावा लागला. आईच्या तोंडून अण्णाचें नांव निघे व त्यालाही त्यापासून आनंद होई. तात्यासाहेबांनीं सावित्रीबाईंना नानासाहेबांच्या आर्थिक परिस्थितीची दिलेली कल्पना तो महत्त्वाची समजत नसला तरी गरीब घराण्यांतील स्थितीची कल्पना येतांच तिला त्याला लवकर झिडकारतां येईना. अशा मनाच्या स्थितींत इंग्रजी पद्धतिप्रमाणें गमतीनेंच का होईना लीलेच्या मनानं काय ठरवलं आहे हें अजमावण्याकरितां त्या नुकताच विलायतेहून आलेल्या तरुणानें लीलेला हांक मारली.

" लिली ! थोडा चहा करतेस कां लवकर दोन कप ठेव हॅं ! एक स्नेही येणार आहे माझा इतक्यांत ! "

" दोन्ही कप तुम्हांलाच प्यावे लागतील दादा ? अण्णा कांहीं चहा पीत नाहींत ! "

लीलेनें कोण येणार आहे हें इतकें लवकर ताडलें कीं बाबुराव अगदीं आश्चर्यचकित झाला. वास्तविक त्यांत मोठंसं आश्चर्य करण्यासारखं कांहीं नव्हतं.

भानू अगर अण्णा यांपैकीं कोणीतरी, विशेषतः अण्णा यायचा हें समजायला फार मोठ्या डोक्याची आवश्यकता नव्हती. पण "अण्णाच येणार" हें लिलीनें बरोबर ताडून दिलेल्या उत्तरानें बाबूरावाला विस्मय झाल्यावांचून राहिला नाहीं.

घरांत लग्नाच्या गोष्टी होत होत्या. त्या तिला ऐकूं येऊं नयेत अशा रीतीनें थोड्याच होत होत्या. अशा वेळीं उपवर मुलींच्या मनांतल्या विचारांचं चित्र कोणाही पुरुष लेखकाच्या कल्पनेबाहेर आहे. ती आपल्या भावी पतीचें चित्र कसल्या प्रकारचं कसल्या कुंचल्यानें चितारीत असेल ही कल्पना अगम्य आहे. एखाद्या गोऱ्या मोठ्या डोळ्याच्या, धरधरीत नाकाच्या, हांसऱ्या तोंडाच्या, भरींव बांध्याच्या, संपन्न स्थितींतल्या तरुणाचें चित्र ती काढीत असेल काय ? छे ! ! त्याच्या चेहऱ्यावर ती कसले विकार रेखाटीत असेल बरें ? भोळ्या अंतःकरणाचा, आपल्या मुठींत राहण्यासाठीं सदा तत्पर असलेला, येतां जातां आपलं आराधन करणारा, नाना प्रकारचीं लुगडीं पोलकीं पुरविणारा, गाडीघोड्यांतून मिरविणारा,—छे ! नाहीं थांग लागत ! ! सदा सर्वदा हिडिस फिडिस करणारा, प्रसंगीं मारणारा, दारूबाज दुर्गुणी मनुष्य त्यांच्या हृदयचक्षूंपुढं टिकायचाच नाहीं. बाहेरून चांगला दिसणारा पण अनुभवानें वाईट ठरणारा पती कित्येकांना दुर्दैवानें लाभल्याचीं उदाहरणेंही या मुलींच्या कल्पनेंत येत नसतील असें नाहीं. या इतर गोष्टी बघण्याचा भार लीलेच्या परिस्थितींतील मुली वडिलांवरच टाकत असतील. कारण कितीही परिचय झाला तरी आंतील हृदय तसें खऱ्या स्वरूपांत दृश्यमान होणें अशक्य असतें. मग त्यांच्यापुढें कोणत्या प्रकारचें चित्र उभें राहत असेल. त्या विचार करीत नसतील हें संभवनीय नाहीं. सूक्ष्म संवेदक शक्ती असलेलें हृदय स्त्रियांच्याजवळ देवानें ठेवून दिलें आहे. लग्नाच्या कल्पनेंत त्यांच्या हृदयचक्षूंसमोर प्रथम कोणत्या प्रकारचें सूक्ष्म साहित्य उभें राहत असेल कीं त्याच्या चितारण्यांत रममाण होऊन त्याला स्थूलाचें आवरण घालून त्याला ते पूर्ण करीत असतील ? आम्हीं आमचें अज्ञान कबूल करून एवढेंच सांगूं इच्छितों कीं त्यांच्या पतीभावनेंत अगदीं प्रथमतः ईश्वरी गुणांचें—सच्चिदानंदाचें बीजरूप प्रतीत होतें. आपल्याजवळ आहे, आसमंतांत आहे, आपल्या

हृदयांत आहे, आपल्याला हंसवितें, खेळवितें, बोलवितें, डोलवितें, आवडतें, इष्ट करितें, करवितें, लाडवतें, घेतें, देतें; अशा संवेदनेचें तें बीजस्वरूप बहुधा असावें. या बीजाभोंवतीं प्रत्येक मुलगी आपल्या परिस्थितीप्रमाणें व देशकालाप्रमाणें सगुण स्वरूपाचें चित्र काढीत असावी. कुणाचें चित्र अंबारींतील असेल, सिंहासनावरील असेल तर कुणाचें घोड्यावरील असेल, कुणाचें गाडी मोटारींतील तर कोणाचें विमानांतील, कुणाचें खुर्चीवरील तर कुणाचें रकट्यावरील असेल. कुणाचे हातांत नांगर असेल तर कुणाच्या हातांत लेखणी असेल. कुणाला दाढी असेल तर कुणाला शेंडी असेल. कुणी धोतर नेसलेला असेल तर कुणी पाटलोणवाला असेल. कुणाचें नाक चपटें असेल, कुणी रांठ केंसाचा आणि जाड ओंठाचा कभिन्न पुरुष असेल. अशी आवडीची चित्ररचना झाली तरी कल्पिलेली वस्तु प्राप्त होण्याचें भाग्य कोणाही मानवाच्या कपाळीं लिहिलेलें नाहीं ! ! पुरुषांच्या या बाबतींतल्या साऱ्याच कल्पना स्थूल असल्यामुळें भावनेच्या बाजूनें विवाहाच्या बाबतींत तो स्त्रीहृदयापेक्षां बराच कमी दर्जाचा ठरतो आणि म्हणूनच त्याचा वर्चस्वाचा हव्यास दांडगा असतो. उलट लग्नाची कल्पना उद्भूत झाल्याबरोबर किंवा बाळपणापासूनच 'नवरा' हें अक्षर कानावर पडल्यापासून स्त्रीहृदय जें एकदां वर दिग्दर्शित केल्याप्रमाणें चित्र रेखाटायला आरंभ करतें त्याच्या सजावटींतच तिचें आयुष्य गुंतलेलें रहात असल्यामुळें कसल्याही प्राप्त परिस्थितीकडे ती आपल्या हृदयांत प्रतिबिंबित झालेल्या स्वरूपानें पहाते व अनेक कष्ट सोसण्यांत आनंद मानतें. निसर्गानें विशेषत्व प्रदान केलेल्या हृदयाचा हा भावनामय उदारजीव सरळच आपलें सर्वस्व ब्रह्मार्पण करून पदलीन होतो. अस्तु !

लीलेनेंही अर्थात् असलं कांहीं चित्र काढायला आरंभ केला असेल. तिच्या पुढें कदाचित् अण्णा चित्ररूपानें उभाही असेल. त्याच्याशीं तिच्या विवाहाबद्दल होत असलेलीं बोलणीं ऐकून कदाचित् तिनें आपल्या भावनाचित्राला त्याचेंच स्थूलावरण तात्पुरतें घातलें असेल. हिंदु स्त्रिया विवाह होतपर्यंत आपल्या चित्राच्या स्थूलस्वरूपाचा आकार पूर्ण करून त्याच्यावर अखेरची कुंचली कधींच फिरवित नाहींत हा त्यांचा इतर स्त्रियांपेक्षां

विशेष असावा असें वाटतें. हें ओळखूनच कदाचित हिंदुधर्मशास्त्रानें विवाह संस्काराला एवढें प्रचंड महत्त्व दिलें आहे.

लीलेनें चहा करून आणला. दोन पेले चहा व दुधाचा एक प्यालाही तिनें बरोबर आणला होता.

" लिली बैस, " लीला खालीं जाजमावर बसली.

" आतां तुझं लग्न व्हायचं आहे, ठाऊक आहे ना तुला ? " बाबूरावानें स्मित करीत प्रश्न केला.

" हा हो काय प्रश्न करितां तुम्ही ? बायका कां कुठं लग्नावांचून रहातात ?"

खेडयांत राहणाऱ्या आपल्या धाकट्या बहिणीचें उत्तर ऐकून बाबूरावाला मोठी करमणूक झाली. कुमारी, प्रौढ स्त्री किंवा आजन्म कुमारी या जगांत असेल, असलं आश्चर्य लीलेनें ऐकलं नव्हतं व पाहिलं नव्हतं; उलट तरुण व वृद्ध कुमारींचे थवेच्या थवे असलेल्या देशांमधून तो फिरून आला होता. त्याला हसूं कोसळलं पण त्यानें लीलेला ती माहिती दिली नाहीं.

" कां हसतां आहांत दादा तुम्ही ? कांहीं वावगं कां बोललें मीं ? "

लीलेच्या पाठीवरून हात फिरवून तिला कुरवाळून बाबूराव म्हणाला—

" ओशाळी होऊं नकोस, मी तुझ्या उत्तरावरून नाहीं हंसलों. याच वेळीं विलायतेंतील एका मुलीची 'मला आठवण झाली. तुझ्या सारखीच भोळी मुलगी ती ! तिलाही मी असेच प्रश्न करून तिचा विनोद करीत असे. तिची आठवण होऊन मला हंसायला आलं झालं ! "

" ती एवढी मुलगी तुझ्याशीं बोलत होती ? "

बाबूला आतां हंसें आवरेना. पण लवकरच तें आवरतें घेऊन तो म्हणाला " तूं नाहीं कां माझ्याशीं बोलत ? तुझ्याप्रमाणेंच तिच्याशींहीं माझं बहिणीचं नातं होतं, मी तिथं ज्या कुटुंबांत रहात असे त्या घरची ती मुलगी. तुझ्या एवढीच आणि जवळजवळ तुझ्यासारखी. फक्त ती गोरी आणि तूं—"

" असूं दे मी काळी असलें तर. माणूस काळं असलं तर कुणीं टाकून तर नाहींना देत. अण्णा कधीं कधीं म्हणतात आपण काळे लोक ! आणि तूंही काळा—च ! " लीलेनें लडिवाळ फटकाऱ्यानें बाजू सांवरली.

" अण्णाचं सारंच बोलणं खरं धरून चालायचं वाटतं ? हें बघ, विनोद

बाजूला ठेऊन मी तुला खरंच सांगतों अण्णा कसा खोटा आहे तें! तूं एवढी गोरी असून त्यानं तुला काळी म्हणावं—"

" चल! मलाच थोडंच त्यांनीं तसं म्हटलं? आणि म्हटलं तरी काय आहे त्यांत मोठंसं! आम्ही आपले काळेच बरे, तूं आहेसना चांगला गोरागोरा—"

बाबूरावाला खूप करमणूक होती. त्यांनीं तिला थापटीत म्हटलें " बरं, तुझे आणि त्याचे विचार बहुधा जुळतात; करतेस त्याच्याशीं लग्न? बोलावतों त्याला ताबडतोब?"

" इश्श: !" म्हणून लीला घरांत पळून जावूं लागली. दारांत येतें तोंच तिला शिवराव येतांना दिसला. त्याला बघतांच ती इतकी लाजली कीं तिला अण्णानें " लीला " म्हणून हांक मारली ती तिला ऐकूं आली किंवा नाहीं याचं उत्तर द्यायचं तर ती अण्णाला उत्तर न देतांच घरांत पळाली यावरून वाचकांना देतां येईल तेंच उत्तर बहुधा बरोबर असेल!



# प्रकरण १३ वें

गांवांत सुरू झालेला भेद कलह बराच तीव्रतेनें पेट घेत होता. मास्तर आणि भटजीद्वय यांच्यासारख्या सभा भरून अज्ञानी लोकांना धर्माचे धडे देण्याचें कार्य चालू होतें. ब्राह्मणांत ग्रामण्य, मराठ्यांत ग्रामण्य तसेंच मारवाड्यांची जीं दोन चार घरें गांवांत होतीं त्यांतूनही मोतीचंद शेटच्या घराला बहिष्कृत करण्याच्या गोष्टी चालू होत्या. मोतीचंद-शेट इतरांच्या मानानें बराच श्रीमंत असल्यामुळें अझून बाकीच्यांनीं तसें स्पष्टपणें त्यांना जाणवलें नव्हतें; पण शेटच्या कानावर त्या गोष्टी गेल्या-वांचून राहिल्या नाहींत. एकुलत्या एका मुलाबद्दल त्यांना जास्त कठोरता दाखवितां येईना. माणकच्या हातून त्यांच्या कापडाच्या दुकानावरील मुख-त्यारी त्यांनीं काढून घेतली होती व तो कारभार त्यांनी प्रत्यक्ष रोकड्याजींच्या स्वाधीन केला होता. रोकड, हिशेब वगैरे संभाळण्याच्या व्यतिरिक्त या विशेष कामाबद्दल रोकड्यार्जीना आतां जास्त मुशाहिराही मिळत होता. त्यांनीं आपली शेटच्या पायांवर वाहिलेली लेखणी परत घेतली होती आणि त्यांचा बिल्लोरी चष्मा माणककडे पहातांना हल्लीं विशेष चमकूं लागला होता. माणक त्या दृष्टीनें निर्विकार होता. त्याला आतां खूप वाचायला व अण्णा आणि भानू यांच्याबरोबर लोकांचें काम करायला मनमुराद वेळ मिळत असल्यामुळें उलट आनंदच झाला होता.

कलह एकदा वाढायला लागला म्हणजे लवकरच त्याला भयंकर अम-र्याद स्वरूप येतें तसें या गांवाचें झालें होतें. असल्या कलहाचें बीज वस्तुतः एखाद्या क्षुल्लक कारणांत किंवा पुष्कळ वेळां एखाद्याच्या निष्कारण अट्टा-हासांत असतें. दोन चांगले मित्र, सुखी पतिपत्नी, निगर्वी विद्वान्, प्रामा-णिक परिश्रमानें उर्जितावस्था प्राप्त करून घेणारा एखादा मनुष्य अगर त्याचें घर किंवा तसल्याच प्रकारची आपल्या परस्पर प्रेमानंदांत नांदणारी लघु वा गुरु सृष्टी शेजारींच नीच, असहिष्णु लोकांच्या सांन्निध्यावांचून राहूंच शकत नाहींसें दिसतें.

आत्मप्रौढी, हट्टवादीपणा व मत्सर यांच्या भांडवलाच्या अंधारांत हे

जेव्हां आपली कलहाची चुडी पेटवून बाहेर पडतात तेव्हां या राक्षसांच्या जुलमानें समाज त्रस्त होऊन जातो, त्याला दे माय धरणी ठाय होतें, अत्याचारांच्या चटक्यांनीं समाजाचें अंग होरपळत असतांना यांना होत असलेल्या आसुरी आनंदांतून तप्त रसाचे फवारे वाहूं लागतात व त्यामुळें समाज इतका जायबंदी होतो त्याला पुनर्जन्माची सोयच नाहींशी होते.

अण्णाचें मास्तरांशीं झालेलें भाषण जेव्हां त्यांनीं ब्रह्मसभेंत निवेदन केलें तेव्हां आबाभटजी आणि दादाभटजींनीं एकाद्या रणोद्यत योध्याप्रमाणें गर्जना केली. धर्माच्या या जीर्ण रखवालदारांनीं आपापले शंख पृथक् पृथक् फुंकून त्या वेळीं नाना प्रकारच्या प्रतिज्ञा केल्या. " माझ्या समोरचा विद्यार्थी, मला शास्त्र शिकविण्याचा आंव आणतो काय ? भटजी ! केवळ आपण तिघेच एकाकी राहिलों तरी हरकत नाहीं पण यांना वठणीवर आणावयाचेंच. सरकारी मदत मागून या लोकांना देवळांत मज्जाव करवितों—बघा तर ! " मास्तर खणखणले ! !

" होय, अशीच खोड मोडली पाहिजे गुलामांची ! " असा आबाभटजी आणि दादाभटजींनीं अनुमतिदर्शक भुभुःकार केला ! आबाभटजींची बैलजोडी, दादाभटजींची गाडी व मास्तरांचा एक जुना शेतकरी विद्यार्थी गाडी हांकायला याप्रमाणें योजना ठरून मास्तरांनीं दुसरे दिवशीं देवगांवास—तालुक्याच्या ठिकाणीं—जावयाचें निश्चित केलें ! तात्यासाहेबांनीं दादाभटजींच्या व नानासाहेबांनीं आबाभटजींच्या सदुपदेशाला दाद दिली नव्हती असें दिसतें !

कोणत्याही अडचणीनें न डगमगणारा अण्णा या कठोर परिस्थितीशीं झगडायला तयार झाला होता. रोगबीज नेहमींच सूक्ष्म असतें पण त्याची वाढ गणितालाही अशक्य असल्या प्रमाणांत कल्पनातीत होत असतें. यावेळीं गांवांतील अज्ञानी जनतेच्या मनावर भेदरोगाचा परिणाम चांगलाच झाला होता. अण्णा आणि त्याच्या जीवाला जीव देणारे त्याचे दोन स्नेहीभानू आणि माणक—यांनीं घरोघर हिंडून लोकांची होत असलेली दिशाभूल काढून टाकण्याचा प्रयत्न सारखे करीत होते. खेडेगांवांतून जुन्या कल्पनांची जपणूक विशेष प्रकारानें होत असल्यामुळें प्रारंभीं त्यांना निराश होण्यासारखे अडथळे येत गेले. बाबूरावांना त्यांनीं मुद्दामच या कार्यांत

साह्यकारी केलं नाहीं. " तो काय विलायतेहून आलेला. धर्मबिर्म तो काय जाणतो, सब गोलंकार व्हायचा आणि मग–अरे बापरे ! प्रलय व्हायचा !" हा कुणी तरी शिकविलेला मंत्र गांवांतील भोळे अज्ञानी लोक शिकले होते हें अण्णाला आणि त्याच्या साह्यकाऱ्यांना दिसत होते. अण्णावरून धर्माबद्दल अभिमान दाखवितो पण आंतून धर्मलंड भानू यवनसंसर्गीत घराण्यांतला, आणि रोकडयाजींच्या मनानें माणक या दोघांच्या संसर्गा-मुळें दोषी, अशी ही आरोपींची मालिका होती व ते जिथें जात तिथें वरून नाहीं तरी आंतून त्यांच्याशीं केवळ कांहीं वेळ सरळ बोलण्याला सुद्धां लोक खुषी नाहींत असें दिसत होतें.

अण्णाचे सहकारी शेतकरी व माणकनें अनृणी केलेले लोक आपलें " रामाय स्वस्ति रावणाय स्वस्ति " करून तोंड लपवित होते. अखेर अण्णानें काय युक्ति योजिली कुणाला ठाऊक, मास्तर दुसऱ्या दिवशीं देवगांवास गेले नाहींत इतकें मात्र खरें !

त्याच संध्याकाळीं मास्तर आणि अण्णा महारुद्रेश्वराच्या मंदिरांत बराच वेळ बोलत बसले होते. !



# प्रकरण १४ वें

उदेभानराव अझून गांवीं परत आले नव्हते. ते न आल्यामुळें गिरिजाबाईच्या डोहाळेजेवणाचा बेत कांहीं दिवस पुढें ढकलला होता. त्यांच्यापत्राप्रमाणें भानू आणि माणक जुन्या दप्तरखान्यांतून त्यांनीं मागविलेले कागद शोधण्यांत गुतले होते. बाबूराव तात्यासाहेबांबरोबर देवगांवास सहज गेला होता.

सायंकाळीं नित्याप्रमाणें सावित्रीबाई लीलेला बरोबर घेऊन देवदर्शनाला गेल्या होत्या. अण्णा शेतावरून फेरफटका मारून हळू हळू मंदिराच्या पायऱ्या चढत होता. सावित्रीबाई आणि लीला मंदिरांतून बाहेर पडून पायऱ्या उतरत होत्या. अण्णाला पहातांच लीला आईच्यामागें मागच्या पायरीवर आड उभी राहिली.

“ कुठं असतोसरे आतांशा, अण्णा ! येतच नाहीस अगदीं घराकडे !” सावित्रीबाई म्हणाल्या.

“ बाबू आल्यापासूनच मला तिकडे विशेष यायला होत नाहीं, आत्या ! येऊं कसा ? सकाळसंध्याकाळ तोच माझ्याकडे येतो, आणि असल्या गोष्टी सांगत असतो विलायतेच्या कीं त्यामुळं वेळच मिळत नाहीं इतर कामाला ! ”

“ झालं मित्र भेटला आतां उरलं आहे का कोणी विचारपूस करायला देशमुखांच्या कडं ? ”

अण्णा किंचित् ओशाळला. सावित्रीबाईचें त्याच्यावर मोठें प्रेम होतें. त्यांच्या माहेरच्या घराण्यांतील म्हणून नव्हे तर त्याच्या गुणांकडे पाहून त्यांना त्याचा फार लोभ वाटे. शिवाय त्याच्याकडे पाहिल्याबरोबर त्याच्या आईची,–त्यांच्या बहिणीप्रमाणें मानलेल्या सखीची त्यांना आठवण येई. कोणत्याही मातृविहीन मुलांच्याकडे पाहतांना त्यांचें मन नेहमींच आर्द्र होत असे. सावित्रीबाईच्या प्रेमळपणाला सीमा नव्हती. अण्णानें किंचित् आपली दृष्टी खालीं लावली. सावित्रीबाई म्हणाल्या–“ मीं कुणींच नाहीं कारं तुझी ! बरं नसो, पण लीलेकरितां स्थळं बघायची तरी कांहीं खटपट

करायची होतीस कीं नाही ? बाबू कसला करतो खटपट ? तो म्हणतो, लिली अजून लहानच आहे, चांगली तीन चार वर्षे नको घाई करायला ! हेंच कारे विलायतेंतलं शहाणपण ?"

अण्णाला हंसूं आलें. सावित्रीबाईच्या खांद्यावरून दोन मोठाले डोळे मधूनमधून त्याच्याकडे पहात होते. अण्णानें एकदां तिकडे पाहिलें. डोळे ताबडतोब खालीं लवले. अण्णाला तिला कौतुकानें तिकडे पहावेंसें वाटलें. क्षणभर त्याची दृष्टी तिकडे वळली न वळली तों सावित्रीबाई म्हणाल्या,–

"ये दर्शन घेऊन आणि चल असाच आमच्याबरोबर घरीं ! बाबू आला असेल कदाचित् . त्यानंच नेहमीं यावं वाटतं तुमच्या घरीं !"

"हा आलोंच लवकर" असें म्हणून अण्णा उड्या मारीतच पायऱ्या चढूं लागला. तो घाईनें देवदर्शनास जात होता पण त्याच्या मनांत देव होता का आणखी कोणते तरी विचार होते ?

अण्णा भक्तिमान् आणि सात्विक असल्यामुळें त्याच्या मनांतून देवाची कल्पना निघालेली नव्हती. त्याचें अंतःकरण इतकें चंचल नव्हतें. पण या वेळीं त्याच्यापुढें श्रीमहारुद्रेश्वरही नव्हते. मानवी अंतःकरणांत बसून तो जी अपरंपार लीला करतो त्या विलासाची लीलेच्या एकदम खालीं वळलेल्या दृष्टींत त्यानें जी चुणूक पाहिली त्यावर त्याचें मन स्थिर झालें होतें. याचवेळीं भगवान शेषशायीच्या स्वरूपाची आठवण त्याला झाली. विद्युद्वेगानें मानवी हृदयाचा अंतर्भाग आणि घटना आणि त्यांत विलसणारा चैतन्यघन परमात्मा त्याच्या दृष्टीसमोर उभा राहिला. एकंदर सृष्टीला अंतर्बाह्य गुंडाळून उरलेली चैतन्यशक्ति जगताच्या साम्राज्याचे धागे आपल्या हातांत घेऊन अमृतरसाच्या डोहांत सुखशयनीं विराजमान होऊन अर्धोन्मीलित नेत्रांनीं आपला पसारा पहात सांवरून धरण्याचें कार्य करीत होती. हा झोंपलेला नाहीं. शुद्ध सात्विक गुणशेषावर विराजमान असलेला हा सगुण परमात्मा आपल्या सासुरवाडी 'सुखंचमे, शयनंचमे' करीत पडलेला नव्हता. त्या ठिकाणीं त्यानें जगताची जीवनशक्ती, प्रेरकशक्ती आणि उत्पादनशक्ती यांचें मुख्य कार्यालय थाटलें होतें आणि त्याचाच एकएक छोटा नमूना प्रत्येक हृदयांत त्यानें ठेऊन दिला होता. ब्रह्मांडाचें बृहत्कार्यालय विश्वांतल्या या लघुकार्यालयांच्या द्वारें आपला

कारभार चालवीत आहे. येथील तारा जरी प्रतिक्षणी महाकार्यालयाकडे जात असल्या तरी प्रत्यक्ष दर्शनाला ज्ञानाचे महासागर ओलांडून जाण्याच्या परीक्षा ठेविलेल्या आहेत. त्या उतरल्यावर तेथल्या शक्तींचें सामर्थ्य प्रतीत होतें. वेदांतांत वर्णिलेलें सविकल्प समाधीचें स्थान ( अहं ब्रह्मास्मि ) हेंच होय. येथून पैलतीर जवळ आहे. इच्छामात्रें गरुडवेगानें तिथें व ऐल तिरीं जाऊन येतां येतें व नारदाप्रमाणें अंतरिक्षभ्रमणाची सिद्धी प्राप्त होते.

लीलेच्या नेत्रांनीं खात्रीं जाऊन अण्णाच्या सकौतुक दृष्टीला कोणता संदेश पोंहचविला असेल ? ओळखण्याची खूण हीच कीं संदेश पोंहचतांना मध्येंच तुफान झालें असेल तर तो फक्त प्रेरक शक्तीकडेच पोंहचून थांबतो. तिला ( मायेला ) तेथला अखेरचा अधिकार असल्यामुळें जीवनशक्तीपुढें त्याचें मामुली प्रतिवृत्त पेश होतें. शांत, सलील, सानुग्रह संदेशाचा स्वीकार स्वतः श्री करीत असतात. काळीं आणि निळी बुबुळें एका रेषेंत येऊन त्यावरूनच होणारें बाह्य विकारांचें तुफान श्रीच्या मंजुरीचें नसतें. सात्त्विक आणि साधिकार साहचर्यानेंच प्राणी अखेर ऐक्यानंदाचा उपभोग घेऊं शकतात.

असले विचार अण्णाच्या मनांत इतक्या जलद येत होते कीं ते तितक्यांत अवकाशांत सांगणें शक्तीबाहेरचें काम आहे.

अण्णा उड्या मारीत पायऱ्या चढत होता. वरची पायरी आता तो गांठणार इतक्यांत त्याचा पाय चुकला. वरच्या पायरीशीं त्याचें तोंड ठेंचलें असतें पण तावडतोब अवधानावर येऊन आपल्या हातावर त्यानें स्वतःला सांवरून घेतलें. पण पायरीच्या धारेनें त्याच्या पायाच्या नळीला फार मोठी इजा केली. पायावरच्या नळीवरील कातडें सोलून निघून त्यांतून रक्त वाहूं लागलें.

लीलेचें अकस्मात् लक्ष तिकडे गेलें.

" आईअ, बघ ते—" इतकेच शब्द तिच्या तोंडातून बाहेर पडले व ती तावडतोब वर धांवली. अण्णा या वेळीं सांवरून बसून आपली जखम पहात बसला होता. लीला एकदम गेली आणि ती त्याच्या पायांवरील जखमेंतील रक्त आपल्या पदरानें पुसूं लागली. अण्णाला तिला नको म्हणण्याचेंही भान राहिलें नाहीं. सावित्रीबाई हळू हळू येऊन पोंह-

चल्या. लीलेच्या डोळ्यांत अश्रू येऊन त्यांतले थेंब अण्णाच्या जखमेवर पडून त्यांतील रक्तांत मिसळून वहात होते. सावित्रीबाईंनीं आपल्या जवळचें फडकें काढून अण्णाची जखम तात्पुरती बांधून काढली. आई आल्याबरोबर लीला बाजूला उभी राहिली होती.

"येथूनच देवाला नमस्कार कर आणि चल घरीं" सावित्रीबाई म्हणाल्या.

"कांहीं फार लागलं नाहीं मला. मी येतोंच दर्शन घेऊन हळूहळू!" असें म्हणत अण्णा कष्टानें उठून उभा राहिला.

"थांब, हिला येऊं दे तुझ्याबरोबर. झांकबीक यायची कदाचित्. रक्त फार वाहिलं आहे. लीले जा बाळ मी बसतें इथं."

अण्णानें नको म्हटलें पण सावित्रीबाईंनीं त्याचें ऐकलें नाहीं. "चला, मीही येतें पुन्हां देवदर्शन होईल" असें सावित्रीबाईंनीं म्हटल्यावर तर त्याचा नाइलाज झाला. लीलेनें अण्णाच्या दुखऱ्या पायाकडील हात धरला व ते दोघे देवळांत गेले.

गाभाऱ्यांत श्रीमहारुद्रेश्वराची भव्य शाळुंका आणि पिंडी विराजमान होती. कोनाड्यांत नंदादीप तेवत होता. टांचणी पडली तरी त्या आवाजाचा प्रतिध्वनि स्पष्ट ऐकूं येईल इतकी गंभीर प्रशांतता त्या ठिकाणीं विलसत होती. लीलेनें अण्णाचा हात सोडलेला नव्हता. आईची आज्ञा तिला तशी होती. अण्णानें देवाला नमस्कार करितांना लीलेचा हातही सहज उचलला गेला. तिचा दुसरा हातही त्याच्या जोडीला आला. दोघांनींही एक समयावत्सत् श्रीपरमेश्वराला नमस्कार केला. 'नमः शिवाय' असा अण्णानें केलेला त्रिवार जयघोष प्रतिनिनादित झाला. भक्तिभावनेनें दोघांचींही अंतःकरणें पुलकित झालीं. परततात तों सावित्रीबाई सभामंडपाच्या द्वारांत उभ्या असलेल्या त्यांना दिसल्या.



# प्रकरण १५ वें



नानासाहेब देशपांड्यांच्या घरीं आज गडबड होती. पाटलांच्या गिरिजाबाईंचे डोहाळेजेवण आज त्यांच्या घरीं करायचें ठरलें होतें. त्याप्रमाणें जानकीबाईंनीं सर्व सिद्धता केली होती. उदेभानराव यावयाची वाट बरीच पाहिली पण महिना उलायटला आतां अवधि नसल्यामुळें त्यांच्या येण्यापूर्वीच समारंभ उरकून घेण्याबद्दल नानासाहेबांनीं सांगितलें होतें. जानकीबाईंनी मुलीकरितां मोठ्या आवडीनें तिच्या आवडीचे पदार्थ भोजनाकरितां तयार केले होते. आंतल्या चौकांत बायका आणि बाहेरल्या पडवींत पुरुष अशी पंक्तींची वाटणी होती. पुरुषांपैकीं भोजनास अण्णाच्या बरोबर यशवंतराव, भानू, बाबूराव, माणक, आणि मास्तरही होते! आबाभटजी आणि दादाभटजींच्या अंगाचा मास्तरांच्या या वागणुकीनें अगदीं तिळपापड झाला होता. त्या दोघांनींही आपापल्या यजमानांच्या येथील यजमानकृत्य सोडून दिलें होतें. या त्यांच्या असहकाराला भीक न घालतां नानासाहेब आणि तात्यासाहेब यांनीं मास्तरांनाच तात्पुरती उपाध्यायाची वरणी दिली होती. मास्तरांनीं संहिता म्हटली होतीच पण त्यांना स्वतंत्र याज्ञिकही करतां येत होतें. भटजींच्या जोडीची प्रतिष्ठा संपुष्टांत येऊं लागली होती तरी अजून अण्णाला बराच गड जिंकावयाचा होता.

स्त्रियांमध्येंही सावित्रीबाईच्या शिवाय बाकी साऱ्या त्यांच्या पक्षांतील घराण्यांतल्या तरुण मुलीच होत्या. त्यांची धांदल काय विचारावयाची! हसून, थट्टा करून, नानाप्रकारचे उखाणे घेऊन, आणि घ्यायला सांगून त्या आपली करमणूक करून घेत होत्या. सावित्रीबाई स्वयंपाकघराच्या दरवाज्याजवळ बसून जानकीबाईंशीं बोलत आणि मुलींचें कौतुक पहात होत्या. लीला आणि तारा तर गिरिजाबाईच्या सारख्या आवतीभोंवतींच वावरत होत्या. जरूर असलेल्या वस्तूंची नेआण करणें, हळदकुंकू देणें आणि सारी वरची व्यवस्था करणाऱ्या स्वयंसेविका म्हणजे तारा आणि लीला ह्या होत. एकदां तर एका मुलीनें लीलेला म्हटलें—

" काय ग लीला! अगदीं घरांतल्या सुनबाईसारखी कामं करीत आहेस सारखी ? "

लीलेनें यावर कांहीं उत्तर दिलें नाहीं. फक्त तिनें त्या मुलीकडे आडव्या नजरेनें पाहून मान हालविली आणि त्यानंतर ती बराच वेळ गडबडींत दिसली नाही. तिला राग आल्याचें चिन्ह तिच्या मुखावर दिसलें नाही. पण त्या फटकळ मुलीच्या समोर जाऊन कांहीं काम करावेसें तिला वाटेना.

भोजनोत्तर चौकांत पितळेचे साखळदंड असलेला झोंपाळा लाविला होता. त्यावर गालीचा घातलेला असून साखळदंडाना फुलांच्या माळा टांगलेल्या होत्या. गिरिजाबाईना त्यावर बसविलें होते आणि लवकरच गाणीं म्हणावयाला आरंभ व्हावयाचा होता. जानकीबाईनीं शिवलेली हिरवी जरीकाटी चोळी आणि अण्णानें आपल्या आवडत्या बहिणीकरितां आणलेलें महेश्वरी लुगडें गिरिजाबाईना परिधान केलें होतें. लीलेनें आवडीनें गुंफलेला फुलांचा गजरा तारेनें त्यांच्या वेणींत बांधून दिला होता. आधींच सौंदर्यसंपन्न त्यांतून सुगंधींत उटणी लावून स्वतः सावित्री बाईनीं न्हावूं घातलेलें असल्यामुळें ती गर्भिणी त्यावेळीं हरित पत्रावर विराजमान होणाऱ्या कमलिनीप्रमाणें तेजःपुंज आणि प्रफुल्लित दिसत होतीं. तिच्या अंगावर समाधिमंदिरांत सांपडलेल्या मौल्यवान् अलंकारांतून निवडक रत्नें घेऊन आवडीनें यशवंतरावांनीं तिच्याकारितां घडविलेले नव्या घाटाचे दागिने होते. तिच्या पायांत कोल्हापुरी घाटाचे सईल तोडे सरोवरपृष्ठभागावर तरळणाऱ्या चंद्राच्या प्रभेप्रमाणें शोभत होते. तिची मुद्रा यावेळीं अत्यंत शांत, गंभीर आणि मृदुमनोहर होती. गाणीं म्हणायला आरंभ वडील या नात्यानें सावित्रीबाईच्याकडून व्हावयाचा होता. त्यांनीं रुक्मिणीच्या डोहळ्यांची कडवीं म्हणून साखळदंड लीलेच्या हातीं दिला. लीलेचा आवाजही गोड होता. तिनें झोंपाळा हळूं हळूं हालवून श्रीजिजामातोश्रीचे डोहाळ्याचें कडवें गावयाला आरंभ केला. मघांच्या थट्टेखोर मुलीकडे तिनें बघितलेंही नाहीं. लीला डोहाळे म्हणत असतांना साऱ्या मुली तटस्थ ऐकत होत्या. स्वतः गिरिजाबाईही त्यांत रंगून गेल्या होत्या. जिच्या पोटीं प्रातःस्मरणीय, परमप्रतापी, धर्मस्वराज्यसंस्थापक, गोब्राह्मणप्रतिपालक श्रीशिवरायांनीं अवतार घेतला त्या परमपावन माउलीच्या डोहाळ्यांचीं कडवीं तिथें जमलेल्या स्त्रियाच काय पण सारें स्थावरजंगम ऐकत होतें. बाहेरच्या खोलींत अण्णा, बाबूराव,

भानू आणि माणक बसलेले होते त्यांनाही तें पद स्पष्ट ऐकूं येत होतें.

" आमची लीली गात आहे अण्णा ! मी शिकविलें होतें तिला हे डोहाळे एका पुस्तकांतून. "

" फार छान केलंस, असलींच गाणीं शिकवायला हवीं आमच्या स्त्रियांना. " अण्णा म्हणाला.

" 'मुलींना' हा शब्द या ठिकाणीं विशेष चांगला दिसला असता ! " माणक हांसत म्हणाला. भानूनें दुजोरा दिला.

"बरोबर आहे. चूक आहे माझी. मला भानच राहिलं नाही शब्दाचं" अण्णानें दिलगिरी प्रदर्शित केली.

" दोन्ही प्रयोग शोभतात, व्याकरणशुद्ध आहेत म्हणून वादविरहित आहेत " बॅरिस्टरसाहेबांनीं निकाल दिला. आंत लीला गात होती.

" मज वाटे कीं स्वयें यशोदा व्हावें । भगवंत अंकिं खेळावें ।
मज सुत व्हावा देशभक्त खंबीर । स्वातंत्र्यरणीं रणशूर ।
परवशतेचा डाग पुसुनि काढील । निजमातृभूमि हंसवील । "

" तथास्तु " ! अण्णानें आशिर्वाद दिला. सर्वांच्या तोंडांतून तोच ध्वनि निघाला. मराठी हृदयें तीं, त्या गाण्याच्या योगानें त्यांचीं भावनापूर्ण मनें तल्लीन झालीं. शिवरायासारखा पुत्र प्रसवून धन्य होण्याइतकी गिरिजाबाई पुण्यपावन पतिव्रता आणि अनाथ दुबळ्यावर दया करणारी आणि सर्वांशीं समभावानें वागणारीं धन्य कुळकन्या होती. तारेचें गाणें ऐकूं येत होतें.

" मी मरेन देशासाठीं, मी रडेन दुबळ्यासाठीं, मी हंसेन प्रेमासाठीं ।
सामर्थ्य मला देवो सीतामाई, डोहाळे पुरवा बाई ।। "

गाणीं आटपल्यावर गिरिजाबाईनीं देवाला, सावित्रीबाईना व जानकीबाईना नमस्कार केला. जानकीबाईनीं तिला पोटाशी धरून कुरवाळलें. इतक्यांत " दादा आले, पाट मांडा " असें जानकीबाईना कळविण्याकरितां अण्णा आंत आला. यशवंतरावांनीं त्यांना ताबडतोब लावून दिलें होतें.

---

# प्रकरण १६ वें

लोकांची समजूत घालून त्यांना आपलेकडे वळविण्यांत अण्णा वगैरे मंडळींना बरेंच यश आलें होतें. त्यांत उदेभानराव आल्या-नंतर झालेल्या घटनेनें बरीच भर पडली. उदेभानरावांनीं बरोबर नेलेल्या दप्तरांत कांहीं उर्दू सनदा आणि पत्रे होतीं ती हैद्राबादेस त्यांनीं वाचवून घेतलीं त्यांत त्यांना एक पत्र आढळलें. त्यावर बशीर महंमदखान ही सही असून त्याचा एक कोंपरा फाटलेला होता. पत्र बहुतेक पूर्णच होतें त्याचा सारांश असा:—

माझे वडील नुकतेच स्वर्गवासी झाल्याचें आपणास कळविण्यास मला फार वाईट वाटतें. त्यांनीं मला आठवणीनें आपणांस कळविण्यास सांगि-तलें कीं, आपणांवर आलेल्या संकटांमुळें आपण आपली पत्नी व मुलगा माझे संभाळीं ठेऊन दाक्षिणेंत गेलांत त्यानंतर दुर्दैवानें आपली पत्नी आपल्या दोन वर्षांच्या मुलाला ठेऊन स्वर्गवासी झाली. अडचणींमुळें मला तिकडे प्रत्यक्ष यावयास झालें नाहीं म्हणून चि. यशवंत यांस माझ्या स्नेह्यावरोबर मी तिकडे पाठवून दिलें. मला असें कळतें कीं आपण त्या मुलाला अजूनही मुसलमान म्हणून दूर ठेविलें आहे तरी खुदाची शपथ घेऊन सांगतों कीं, मी त्यांना कोणत्याही प्रकारें आमच्या समाजाचा संसर्ग होऊं दिला नाहीं. आपल्या आशीर्वादेंकरून हिंदु कुटुंबाकडून त्यांची सर्व प्रकारें सोय करविली. आयण बिनदिक्कत त्याला आपले जवळ करावें. त्याला हसन म्हणून माझी लहानगी मुलें प्रेमानें म्हणत असत. एवढाच काय तो त्याला मुसलमानी संस्कार आहे. आपण सुज्ञच आहांत."

यामुळें लोकांचा संशय सर्वस्वी मिटला. यशवंतरावांना ईश्वराच्या लीलेचें मोठें कौतुक वाटलें. सामाजिक बहिष्काराच्या भीतीनें थोरल्या पाटलांना आपल्या औरस पुत्राला माहित असून जवळ करविलें नाहीं ही गोष्ट त्यांनी जाणली. त्यांनीं कोणाला दोष दिला नाहीं. त्यांनीं एकदम पांडुरंगापुढें हात जोडले व त्याला आळविलें. "बहुतां सुकृताची जोडी, म्हणुनि

विठ्ठलीं आवडी ॥ " आबाभटजींची व दादाभटजींची यामुळेंही खात्री झाली नाहीं पण आतां त्या परस्परांवांचून त्यांच्याकडे कोणीही लक्ष दिलें नाहीं.

× × × ×

नागपुराहून स्थळें पाहून तात्यासाहेब परत आले. पत्रिकेच्या आग्रहावरून सुभेदारांचें त्यांचें पटलें नाहीं. कांहीं दिवस विश्रांति घेऊन पुन्हां फिरतीवर निघण्याचा त्यांचा विचार होता पण घरीं आल्यावर सावित्रीबाईंच्या बरोबर लीला अण्णालाच द्यावी, श्रीमंती नसली तरी साधारण सुखवस्तु स्थिती आहे तेवढें पुरें आहे, त्यालाच द्यावी असें बाबूरावानें तात्यासाहेबांना विनविलें. बाबूचा आग्रह मात्र त्यांना मोडवेना. त्यांनीं थोडावेळ विचार करून त्यांच्या म्हणण्याला रुकार दिला व ते दुसऱ्यादिवशीं सकाळीं नानासाहेबांच्या घरीं आले.

तात्यासाहेब अकल्पित घरीं आलेले पाहतांच नानासाहेब आश्चर्यचकित झाले. " तात्या ! बरा आलास ? बरेच दिवसांत आलास बुवा आमच्या इथं ? "

" नाना ! जास्त बोलायला मला वेळ. नाहीं हं, एक पाट मांड मला, जानकी चहा कर थोडा माझ्या करितां ! पिऊन घेऊं दे तुझ्या येथला चहा तरी, नंतर नाहीं जुळायचं ! "

" अरे, जरा बसशील तरी समाधानानं "

तात्यासाहेब पाटावर बसले. लवकरच चहा आला.

" नाना ! चहा घेतों एका अटीवर ! कबूल करशील ? "

नानासाहेबांना कांहींच उमगेना. " बोल तर स्पष्ट काय बोलायचं असेल तें. तुझ्या आमच्यांतील गैरसमज दूर होऊन तूं आम्ही जिव्हाळ्याचे स्नेही आहोंत हें तुझ्या आजच्या येण्यामुळें माझ्या प्रत्ययास आलें आहे. तूं सांगशील तें मीं कबूल करितों. बोल ! "

" मग माझी लीला पदरांत घे. "

नानासाहेब त्यांच्याकडे पहातच राहिले. लीलेला पदरांत घ्यायला अडचण नव्हती. तात्यासाहेबांनीं त्यांना फार वेळ मुळीं बोलूच दिलें नाहीं. मास्तरांनीं येऊन लगेच मुहूर्त काढून दिला व जवळच्याच शुभमुहूर्तीं

शिवराव आणि लीला यांचें मोठ्या थाटानें लग्न झालें. यशवंतरावांनीं उदे-भानरावांकरवीं अण्णाला जो अहेर केला त्यांत एक लांबोळें पाकीट होतें. अण्णानें तें उघडून पाहिलें तो त्यांतून त्यांच्या मोतीचंदशेटकडे गहाण ठेवलेल्या इस्टेटीचें गहाणखत होतें. पावतीसह तें अण्णाला नजर करण्यांत आलें होतें. माणकनें केलेल्या आहेरांत अण्णाची बिगबाळी होती. आणि सूर्यभानानें स्वतः केलेल्या आहेरांत शिवलीला विवाहावर त्यानें झालेल्या एकशेंएक आर्या होत्या.

* * * *

माणकसारख्या सद्गुणी मुलावर पित्याचा राग किती दिवस राहील. त्याला शेटजींनीं अण्णाच्या संगतींत राहून ज्ञानार्जन आणि लोकसेवा करण्याबद्दल सदर परवानगी दिली होती. व त्यांनीं स्वतः अण्णाच्या योजना समजावून घेऊन एक चांगली रकम देण्याचें अश्वासन दिलें होतें. बाबूराव नागपुरास प्रॅक्टीस करणार आहेत.

---

ॐ सहना भवतु सहनौ भुनक्तु सहवीर्यं करवावहै
तेजस्विनाःमावधीतमस्तु माविद्विषावहै
ॐ शांतिः शांतिः शांतिः ।



समाप्त